श्री.

( ज्योतिषविषय नवीन शिकणाऱ्यांकरितां. )

# ज्योतिर्मयूख.

हें पुस्तक,


## गोविंद रामचंद्र मोघे

सायन, पोष्ट धारावी ( मुंबई ),


यांनीं लिहिलें,


व सर्व हक्कासह

तुकाराम पुंडलीक शेटये यांनीं विकत घेऊन

मुंबईंत

निर्णयसागर छापखान्यांत छापिलें.

---

आवृत्ति दुसरी

---

शके १८४० सन १९१८

---

किंमत २ रुपये

# प्रस्तावना.

सुमारें पधरा वर्षांपूर्वी व्यवहारज्योतिष या नावाचें ज्योतिषविषयात्मक एक ल्हानसें पुस्तक मीं प्रसिद्ध केलें होतें. त्या पुस्तकाच्या एक हजार प्रति माझ्या अदमासापेक्षां फारच अल्प काळांत सपल्यावरून ती माझी कृति लोकांस बहुतांशीं पसत पडली असें त्यात अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं. त्यानतर त्याच पुस्तकाची द्वितीयावृत्ति काढावी असा माझा बहुत दिवस सकल्प होता, परंतु अनेक अपरिहार्य अडचणींमुळें माझे मनोरथ जागच्याजागींच राहून आज पर्यंत त्या पुस्तकाची पुनरावृत्ति निघण्याचा योग आला नाहीं. पुढें पुढें तर त्या पुस्तकाच्या प्रति अगदींच दुर्मिळ झाल्या व पुस्तकें पाठविण्याविषयीं लोकांच्या मागण्याही वारवार येऊं लागल्या, हें पाहून मूळ पुस्तकांत थोडा फेरफार करून कसें तरी तें एकदा छापून काढावें असाही मीं निश्चय केला, आणि तदनुसार फेरफार करण्यास आरंभही केला, इतक्यात, त्याच नावाचें आणखी एक पुस्तक, थोड्या दिवसापूर्वींच अन्यत्र प्रसिद्ध झालेलें, माझ्या अवलोकनांत आलें! तेव्हां एकाच विषयावर एकाच नावाचीं दोन पुस्तकें असल्यानें नामसादृश्यामुळें लोकांच्या समजुतींत घोंटाळा उत्पन्न होण्याचा सर्वथैव संभव आहे असें वाटल्यामुळें, व्यवहारज्योतिष हें नाव जरी मूळ माझ्याच पुस्तकाचें होतें, तरी तें बदलून, या पुस्तकाला नवीनच नाव देणें मला भाग पडलें आणि त्याप्रमाणें व्यवहारज्योतिष हें पहिलें नाव रद्द करून या पुस्तकाचें ज्योतिर्मयूख असें नवें नाव ठेविलें. परंतु एवढा नाव बदलल्यानंतर पुस्तकाचें मूळरूप तसेंच असू देणें हेंही मला ठीक दिसेना! ह्मणून आरंभापासून पुस्तक निराळ्याच पद्धतीनें लिहून समग्र पुस्तकांत एकदर विषयव्यवस्था पूर्वीपेक्षां अगदींच भिन्न केली. हे ह्मणण, माझें पूर्वींचें व हें पुस्तक ह्यांची तुलना केली असतां, वाचकांच्या सहज लक्ष्यांत येईल. सारांश, ह्या पुस्तकाची ही प्रथमावृत्तीच आहे असें ह्मटलें असतां अधिक शोभेल. असो, ह्याची रचना सुलभ व पद्धतशीर करण्याविषयीं जरी मीं शक्य तेवढी खबरदारी घेतली आहे तरी एकदरीनें माझ्या मनाप्रमाणें ती झाली नाहीं, हें मी प्राजलपणें कबूल करितों! ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं हें पुस्तकांतील मजकूर जसजसा लिहून तयार होत गेला तसतसा तो छापखान्यांत पाठवून एक एक फार्म मीं छापवून काढिला! समग्र पुस्तक प्रथम लिहून कांहीं वेळ तपासून नतर छापावयास द्यावयाचें, ही जी लिहिण्याची साधारण

जर मी स्वीकार केला असता, तर हें पुस्तक अधिक निर्दोष व अधिक व्यवस्थित झालें असतें हे खरें, पण तसें करण्याचा यत्न केला असता तर तो यत्न ह्या रूपानें लोकावलोकनास आला असता किंवा नाहीं याविषयीं मला बरीच शंका आहे! असें होण्याचीं दुसरीं अनेक कारणें आहेत तीं येथें लिहून वाचकाला कळविण्यात तादृश महत्त्व नाहीं इतकें मात्र खरें आहे कीं, एक फार्म छापून तयार झाल्यानंतर त्याच्या पुढील फार्माकरिता मजकूर पाठविण्यासाठीं छापखान्यांतून वारंवार माझ्या मागें नेट असल्यामुळें, "अकरणान्मंदकरणं श्रेय" या न्यायानें हें पुस्तक माझ्या हातून पुरें होऊन वाचकाच्या हातीं पडत आहे. आतां वर निर्दिष्ट केलेल्या कारणांमुळें या पुस्तकात न्यूनाधिक असण्याचा मात्र बराच संभव आहे परंतु त्या भयास्तव, पुस्तक प्रसिद्ध न करणें ही गोष्ट मात्र मला इष्ट वाटली नाहीं कालेंकरून जर ह्या पुस्तकाची पुनरावृत्ति काढण्याचा सुयोग आलाच तर ही माझी प्रस्तुत कृति त्यावर्ळी मला पुष्कळ साह्यभूत होईल व तिला आतां अधिक नीटनेटकें रूप देण्याला फारसे प्रयास पडणार नाहींत असा मला पूर्ण भरंवसा आहे असो, आता पुस्तकांतील मजकुराविषयीं दोन शब्द लिहिणें अगत्याचें आहे

व्यवहारात नित्य लागणारें कारणापुरतें ज्योतिष शिक्षकाच्या साहाय्यावाचून स्वतः ला शिकता यावें म्हणून केवळ उद्देशानें हें पुस्तक तयार केलें आहे. मराठी भाषेत फलज्योतिषावर अनेक ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत, परंतु ते सर्व एकदेशीय असून असावे तितके सुलभ नसल्यामुळें सामान्य जनसमूहास त्याचा सर्वप्रसंगीं खरखा उपयोग घडत नाहीं ही उणीव असत तरी या पुस्तकानें दूर होईल अशी मला पूर्ण आशा आहे हें पुस्तक ज्योतिषविषयावर म्हणून जरी मी लिहिलें आहे तरी त्याचा ज्योतिषाशीं काहीं संबंध नाहीं असे, दुसरेही अनेक व्यवहारोपयोगी विषय बुद्धिपुरःसर यात घातले आहेत. त्यापैकीं काहीं विषय निर्लेकास कदाचित् अप्रासंगिकही वाटतील, परंतु ह्या पुस्तकाची योजना नवीन शिकणाऱ्यांकरिता असल्यामुळें तसें करणेंच मला इष्ट दिसलें बहुतेक स्थळीं समजण्यास व ध्यानात ठेवण्यास सुलभ असे आधाराकरिता निरनिराळ्या ग्रंथांतून सुमारें पांचशाहून अधिक श्लोक देऊन खालीं त्याचा भावार्थ दिला आहे गणित विषयाचा जेथें संबंध आला आहे, तेथें मात्र मूळ श्लोक पारिभाषिकशब्दयुक्त असल्यामुळें शिकणाऱ्यास अवघड वाटतील असें समजून, त्याचा ह्या पुस्तकात समावेश न करिता, नुसता भावार्थच लिहिला आहे. शिवाय ह्या पुस्तकाचा विशेष उपयोग व्हावा या हेतूनें शेवटीं गोत्र व उपनावें यासंबंधी माहिती दिली आहे. ह्या पुस्तकांत

माझ्या पदरचें किंवा अगदीं नवें असें मीं फारसें लिहिलें आहे असें नाहीं. इतस्ततः जी माहिती निरनिराळ्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांतून मला आढळली तिचें एकीकरण मीं या पुस्तकांत केलें आहे. वस्तुतः या जगांत नवीन असें कांहींच नाहीं. जसें, तूप, साखर, गहूं इत्यादि पाकसामग्रीचे पदार्थ जरी जुनेच आहेत, तरी त्यांचीं ताजीं ताजीं पकान्नें, भोजनसमारंभांतील वृद्ध तरुण भोक्त्यांच्या रुचीप्रमाणें मृदु कठिन अशीं सिद्ध केलेलीं असलीं ह्मणजे जशीं त्यांना ग्राह्य होतात, त्याचप्रमाणें ह्या पुस्तकांत जरी प्राचीन ग्रंथकारांचाच अनुवाद मीं केलेला आहे, तरी सर्व अनभिज्ञ वाचकांच्या रुचीला ग्राह्य व्हावें ह्मणून हें पुस्तक सुलभ पद्धतीनें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे, तो कितपत साधला आहे याचा निर्णय करणें सुज्ञ व बहुश्रुत वाचकांकडे आहे.

हें पुस्तक ज्या अनेक ग्रंथांच्या साहाय्यानें लिहिलें आहे त्यांची संख्या बहुत असल्यामुळें त्या सर्व ग्रंथांचा स्थलसंकोचास्तव येथें नामनिर्देश न करितां फक्त मोघम रीतीनें त्या त्या ग्रंथकाराचे व त्यांच्या प्रकाशकाचे मी मनःपूर्वक आभार मानितों. तसेंच, या पुस्तकाचीं मुद्रितें तपासण्यास मला स्वतःला जसावा तितका अवकाश नसल्यामुळें, माझे स्नेही रा. रा. सीताराम बाबाजी गुर्जर यांनीं केवळ मित्रकार्य ह्मणून बहुतेक सर्व मुद्रितें तपासिलीं, याकरितां त्यांचेही आभार मी येथें मानितों. शेवटीं वाचकांस एक सविनय सूचना करावीशी वाटते ती ही कीं, ज्योतिष हा विषय कादंबऱ्या किंवा नाटकें इत्यादि विषयाप्रमाणें अर्थातच मनोरंजक नाहीं; ह्मणून न कटाळतां अत्यंत लक्षपूर्वक एकवार हें पुस्तक समग्र वाचलें असतां ह्यांत किती उपयुक्त विषय आले आहेत व पुस्तक संग्राह्य आहे किंवा नाहीं, याविषयीं त्यांची सहज खात्री होईल. तसेंच, ज्यांच्या ज्यांच्या हातीं हें पुस्तक जाईल त्या सर्वांस अशी एक आणखी नम्र विनंति आहे कीं या पुस्तकांत हस्तदोषानें वगैरे जें न्यूनाधिक्य पडलें असेल तें त्यांनी मित्रत्वानें मला कळविण्याची कृपा करावी ह्मणजे पुढील आवृत्तींत त्याचा विचार करितां येईल.

उदरनिर्वाहाच्या साधनांत सर्वस्वी गुंतून गेल्यामुळें ग्रंथरचनेसारख्या कामास हवा तसा वेळ मला मिळत नसतांही हें कार्य ज्याच्या कृपाकटाक्षानें निर्विघ्नपणें सिद्धीस गेलें, त्या जगत्सूत्रधाराला, शेवटीं, कृतज्ञताबुद्धिपूर्वक अनेक प्रणाम करून हा लेख येथें संपवितों.

शींव–मुंबई, आषाढ शुद्ध ११
शके १८३३.
तारीख ७ जुलै सन १९११.

गोविंद रामचंद्र मोघे.

*

॥ श्री ॥

# अथ ज्योतिर्मयूखप्रारंभः ।

## मंगलाचरण.

प्रणम्य पार्वतीपुत्रं भारतीं भास्करं भवम् ।
वैकुंठवासिनं विष्णुं सानंदं सकलान् सुरान् ॥ १ ॥
ज्योतिषं व्यवहारार्थं ग्रंथान् संशोध्य यत्नतः ।
क्रियते बालबोधाय गोविंदेन यथामति ॥ २ ॥

आरंभीं गणपति, सरस्वती, सूर्य, शंकर, विष्णु इत्यादि सर्व देवतांस मोठ्या आनंदानें नमस्कार करून माझ्या अल्पमतीप्रमाणें अनेक ग्रंथांच्या आधारानें ज्योतिषविषय ज्यास अपरिचित आहे त्याच्यासाठीं मी ज्योतिर्मयूखनामक ग्रंथ लिहितों.

## ज्योतिःशास्त्र म्हणजे काय.

ज्योतिःशास्त्रांत कालाचें विधान सांगितलेलें असतें. ज्योतिष हा शब्द 'ज्योति' ह्या संस्कृत शब्दावरून मूळ निघाला आहे. ज्योति या शब्दाचा अर्थ तेज किंवा प्रकाशकारक अवयव असा आहे, आणि त्यावरूनच मराठींत ज्योत असा शब्द झाला आहे. दिव्याप्रमाणें जे प्रकाशदायक पदार्थ आहेत, त्यांच्या प्रकाशकारक अवयवास आपण ज्योत म्हणतों, हें सर्वांस ठाऊक आहेच. आकाशांतील गोलरूप चंद्रसूर्यादिक तेजःपुंज तारा ह्यांच्या ज्योतींमध्यें तेजस्वी आणि प्रकाशदायक असल्यामुळें त्यासंबंधीं विचार करणें ज्योतिष म्हणूं लागले असावे, असें दिसतें. शास्त्र या शब्दाचा अर्थ शिक्षण किंवा नियम असा आहे. तेव्हां ज्योतिषासंबंधीं जें शिक्षण किंवा नियम तें ज्योतिःशास्त्र होय.

## ज्योतिःशास्त्राचें महत्त्व.

यथा शिखा मयूराणां नागानां मणयो यथा ।
तद्वद्वेदाङ्गशास्त्राणां ज्योतिषं मूर्धनि स्थितम् ॥

शिक्षा, कल्प ( सूत्र ), व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष अशीं वेदाचीं सहा अंगें आहेत, म्हणून वेदाला षडंगवेद असें म्हणतात. ह्या सहा अंगांपैकींच जरी ज्योतिष हें एक अंग आहे तरी इतर शास्त्रांहून ज्योतिःशास्त्राचें महत्त्व मोठें मानिलेलें आहे. ऋग्वेदज्योतिषाच्या शेवटच्या म्हणजे सातव्या खंडांतील जो श्लोक वर दिला आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, मोराची शिखा म्हणजे तुरा जसा सर्वांगांत प्रधान अंग जें मस्तक त्या मस्तकावर शोभतो, किंवा सर्पमणि जसा सर्पांच्या फणेमध्यें असतो, त्याप्रमाणें वेदाचीं जीं सहा अंगें म्हणजे शास्त्रें आहेत त्या सर्वांच्या शिरोभागीं ज्योतिषाची गणना आहे. यावरून ज्योतिःशास्त्राचें महत्त्व प्राचीन कालापासून फार मोठें मानिलेलें आहे हें स्पष्ट दिसतें.

## ज्योतिःशास्त्राच्या शाखा.

सिद्धान्तसंहिताहोरारूपं स्कंधत्रयात्मकम् ।
वेदस्य निर्मलं चक्षुर्ज्योतिःशास्त्रमनुत्तमम् ॥ ४ ॥

सिद्धान्त, संहिता आणि होरा असे ज्योतिःशास्त्राचे तीन स्कंध म्हणजे तीन शाखा आहेत. हीं तीन अंगें मिळून झालेलें ज्योतिःशास्त्र वेदाचे केवळ नेत्र होत. सिद्धान्तग्रंथांत ग्रहांच्या कक्षा म्हणजे त्यांचे भ्रमणमार्ग, ग्रहादिकांच्या स्पष्टगतिस्थिति म्हणजे अमुक वेळेस अमुक ग्रह आकाशांत कोठें असेल हें ठरविणें, इत्यादि गोष्टींचा गणिताच्या साहाय्यानें निर्णय केलेला असतो, म्हणून सिद्धांतस्कंधाला गणितस्कंध असेही म्हणतात. संहिताग्रंथांत धूमकेतु, ग्रहणें, ग्रहादिकांचे उदयास्त इत्यादि आकाशस्थ गोलांच्या स्थितीमुळें जगाला होणाऱ्या बऱ्यावाईट फलांचें वर्णन केलेलें असतें, आणि होरास्कंधांत एकाद्या मनुष्याच्या जन्मकाळच्या ग्रहनक्षत्रलग्नादिकांवरून त्याला त्याच्या जन्मांत कायकाय सुखदुःखें होतील इत्यादि गोष्टींचें कथन केलेलें असतें. होरास्कंधाला जातकस्कंध असेंही म्हणतात. ह्याप्रमाणें ज्योतिःशास्त्राच्या तीन शाखा आहेत. जातकाची ताजिक म्हणून एक पोटशाखा आहे. ताजिकग्रंथांत वर्षफलाची माहिती सांगितलेली असते. एकाद्याच्या जन्मकाळीं आकाशांत जितक्या राशीअंशादिकांवर रवि असेल तितक्या राशीअंशादिकांवर तो पुनः आला म्हणजे त्या मनुष्याच्या आयुष्याचें कोणतेंही एक वर्ष पूर्ण होतें. त्या वेळेच्या लग्नकुंडलीवरून त्या वर्षांत त्याला काय काय सुखदुःखें होतील हें समजतें. त्या कुंडलीला वर्षफल कुंडली म्हणतात.

---

1. शिक्षा कल्पो व्याकरणं नैरुक्त छंदो ज्योतिषमिति षडंगानि भवन्ति [illegible] खंड २.

# ग्रहज्योतिष आणि फलज्योतिष[१]

अप्रत्यक्षाणि शास्त्राणि विवादास्तेषु केवलम् ।
प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं चंद्रार्कौ यत्र साक्षिणौ ॥



ज्योतिषाचे दोन प्रकार आहेत. एक ग्रहज्योतिष व दुसरें फलज्योतिष. ग्रहज्योतिषाला खज्योतिष म्हणजे आकाशज्योतिष असेंही म्हणतात. चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्रें व इतर तारा आकाशांत रोज उदयास्त पावून ज्याची प्रत्यक्ष साक्ष देत आहेत तें खगोल किंवा ग्रहज्योतिष होय. ग्रहज्योतिषाच्या आधारानें अमुक योग असतां अमुक घडेल, त्यापासून अमक्याला अमुक प्रकारचें सुख किंवा दुःख होईल किंवा अमुक दिवसांनीं अमक्याची पीडा दूर होईल इत्यादि गोष्टींचें ज्ञान स्वानुभवावरून विद्वान् ऋषींनीं जें अनेक ग्रंथांतून लिहून ठेविलें आहे तें फलज्योतिःशास्त्र होय. अमक्या योगाचीं अमुक फळें असें ज्या ग्रंथांत सांगितलेलें असतें त्या ग्रंथाला फलग्रंथ असें म्हणतात.

## अंकसंज्ञा.

एकं भूमीन्दुरूपं द्वावश्विपक्षाक्षिदोर्यमाः ।
त्रयः क्रमधामरामपुरलोकगुणाग्नयः ॥ ६ ॥
चत्वारोऽब्धिश्रुतियुगकृताः पंचेषुबाणयः ।
भूताक्षा षड्रसांगर्तुतर्काः सप्तर्षयः स्वराः ॥ ७ ॥
तुरंगपर्वतौ चाष्टौ वसुसर्पमतंगजाः ।
नवसंख्या नंदरंध्रनिधिगोद्वनभश्वराः ॥ ८ ॥
दशाशाः शून्यमभ्रं स्यादेकादश महेश्वराः ।
द्वादशार्कास्तथा विश्वे त्रयोदश चतुर्दश ॥ ९ ॥
मन्विंद्रभुवनं पंचदशतिथ्योऽथ षोडश ।
कलाष्टिराजोऽथात्यष्टिर्घनाः सप्तदश स्मृताः ॥ १० ॥
अष्टादश धृतिश्चातिधृतिरेकोनविंशतिः ।
विंशतिः स्युः कृतिनखांगुलयोथैकविंशतिः ॥ ११ ॥
प्रकृतिर्मूर्छनास्त्वष्टाविंशतिर्जातिराकृतिः ।
विकृतिश्च त्रयोविंशत् संकृतिश्चार्हदित्यपि ॥ १२ ॥
जिना सिद्धाश्चतुर्विंशतिस्तत्त्वं पंचविंशतिः ।
पंचविंशत्यतिकृतिः षड्विंशतिरिहोत्कृतिः ॥ १३ ॥
स्युः सप्तविंशतिर्भानि द्वात्रिंशद्दशना द्विजाः ।
त्रयस्त्रिंशत्सुरास्तानि ऊनपंचाशदित्यपि ॥ १४ ॥

---

१ ग्रहज्योतिष म्हणजे Astronomy आणि फलज्योतिष म्हणजे Astrology

पर्यायशब्दैरपि कल्पनीयाः संख्यांकसंज्ञा सुधिया धियासाम् ।
सामान्यसंज्ञामभिधाय तां तां विशेषसंज्ञामधुनाभिधास्ये ॥ १५॥

ज्योतिषग्रंथांत संख्या दाखविण्याकरितां अंकांच्या पारिभाषिक संज्ञा योजितात.[८] ही योजना फार सोयीची आहे. कारण तिच्या योगानें तद्विषयक पद्यें वरींच आटपशीर होतात. आणि त्यामुळेंच बहुतेक ग्रंथकारांनीं ही पद्धति स्वीकारलेली आहे. या पुस्तकांत आलेलीं पद्यें निरनिराळ्या ग्रंथांतून घेतलेलीं असल्यामुळें अर्थात् अनेक ठिकाणीं त्यांत ह्या संज्ञा आलेल्या आहेत. म्हणून वाचकांच्या समजुतीकरितां आरंभींच त्याविषयीं माहिती देणें योग्य दिसतें. तथापि वाचकांचा घोटाळा होऊं नये म्हणून बहुतेक संख्यादर्शक कठिण शब्दांवर ती ती संख्या मांडिली आहे. ह्या सर्व संज्ञा अन्वर्थक आहेत. उदाहरणार्थ, इंदु किंवा भूमि हे शब्द एक या संख्येचे वाचक ठरविलेले आहेत. याचें कारण इंदु म्हणजे चंद्र एकच आहे किंवा भूमि म्हणजे पृथ्वी एकच आहे म्हणून एक ही संख्या दाखविण्याकरितां इंदु, भूमि इत्यादि शब्द योजितात. तसेंच, वेद चार आहेत किंवा युगें चार आहेत म्हणून चार ही संख्या दाखविण्याकरितां युग, वेद इत्यादि शब्द घेतले आहेत. त्याचप्रमाणें त्या त्या शब्दाचे दुसरे पर्यायशब्द घालण्याचाही परिपाठ आहे. उदाहरणार्थ, इषु म्हणजे पांच. पण इषु या शब्दाचे समानार्थक दुसरे शब्द बाण, शर हे होत म्हणून पांच ही संख्या दाखविण्याकरितां इषु, बाण, शर किंवा या अर्थाचे दुसरे शब्द घालण्याची रीति आहे. याचप्रमाणें इतर अंकांचें जाणावें. संख्या कशा वाचितात किंवा मांडितात हें पुढें दाखविलें आहे. प्रथम अंकसंज्ञा सांगतों.

(१) एक, भूमि, इंदु, रूप, कु. इ० (२) द्वी अश्वि, पक्ष, अक्षि, दो, यम इ०
(३) त्रय, क्रम, ग्राम, राम, पुर, लोक, गुण, अग्नि इ०
(४) चत्वार', अब्धि', श्रुति, युग, कृत, वेद इ०
(५) पंच, वायु, भूत, इषु, अक्ष, बाण, इंद्रिय इ०
(६) षट्, रस, ऋतु, अंग, तर्क इ०
(७) सप्त, ऋषि, स्वर, तुरग, पर्वत, मुनि, अश्व इ०
(८) अष्ट, वसु, सर्प, मतगज, नाग इ०
(९) नव, संख्या, नंद, रंध्र, निधि, गो, अंक, ग्रह, खग, नभश्चर इ०
(१०) दश, आशा, दिशा, (०) शून्य, आकाश, ख, अंबर इ०
(११) एकादश, महेश्वर, रुद्र, शिव इ० (१२) द्वादश, अर्क, आदित्य, सूर्य इ०
(१३) त्रयोदश, विश्वे, इ० (१४) चतुर्दश, मनु, इंद्र, भुवन इ०
(१५) पंचदश, तिथि. इ०
(१६) षोडश, कला, अष्टि, राज इ० (१७) सप्तदश, घन, अत्यष्टि इ०

(१८) अष्टादश, धृति इ० (१९) अतिधृति, एकोनविंशति इ०
(२०) विंशति, कृति, नख, अंगुलय इ० (२१) एकविंशति, प्रकृति, मूर्छना स्वः इ०
(२२) द्वाविंशति, जाति, आकृति इ० (२३) त्रयोविंशति, संकृति, अरहत् इ०
(२४) चतुर्विंशति, जिन, सिद्ध इ० (२५) पंचविंशति, तत्त्व, अतिकृति इ०
(२६) षड्विंशति, अहोत्कृति इ० (२७) सप्तविंशति, भानि, नक्षत्राणि इ०
(३२) द्वात्रिंशत्, दन्त, द्विज इ० (३३) त्रयस्त्रिंशत्, सुर इ०
(४९) ऊनपंचाशत्, तान इ०

## कार्यप्रकाशक चिन्हें.

+ हें बेरजेचें चिन्ह आहे.
− ,, वजाबाकीचें चिन्ह आहे.
× ,, गुणाकाराचें ,, ,,
÷ ,, भागाकाराचें ,, ,,
= ,, उत्तर दाखविणारें चिन्ह आहे.

उदाहरणार्थ, ९+२=११ येथें नऊ आणि दोन या अंकांमध्यें + हें चिन्ह आहे, म्हणून त्यांची बेरीज करावयाची. याप्रमाणें इतर चिन्हांविषयीं जाणावें.

## संख्या मांडण्याची रीति.

अंकानां वामतो गतिः ।

संस्कृतांत अंकांची गति उलट असते. मराठींत जशी संख्या डावीकडून उजवीकडे मांडितात आणि तशीच वाचितात तसा प्रकार संस्कृत भाषेंत नाहीं. कोणतीही संख्या संस्कृतांत उच्चारितांना उजवीकडून शेवटचा अंक प्रथम उच्चारितात व मांडितानाही अंकांचा उच्चार केल्याप्रमाणेंच उजव्या हाताकडून डाव्या हाताकडे मांडित येतात. उदाहरणार्थ १९५३ ही संख्या घ्या. हे अंक संस्कृत पद्धतीप्रमाणें उच्चारावयाचे म्हणजे ३, ५, ९, आणि १ या अनुक्रमानें उच्चारिले पाहिजेत. जसें, "गुणबाणग्रहेंदु" गुण म्ह० ३, बाण म्ह० ५ ग्रह म्ह० ९ आणि इन्दु म्ह० १ हे मराठीप्रमाणें मांडिले तर ३५९१ होतील पण तसे मांडावयाचे नाहींत. अंकांचा उच्चार केल्याप्रमाणें प्रथम ३ हा अंक मांडावा आणि नंतर तिहींच्या पुढील उच्चारिलेला अंक ५ तो पुढें न मांडितां तिहींच्या मागें मांडावा. तसेंच, ९ पांचांच्या मागें आणि १ हा नवांच्या मागें मांडिला म्हणजे १९५३ झालें.

## युगांचें प्रमाण.

द्वात्रिंशद्भिः सहस्रैश्च युक्तं लक्षचतुष्टयम् ।
प्रमाणं कलिवर्षाणां प्रोक्तं पूर्वमहर्षिभिः ॥ १६ ॥
युगानां कृतमुख्यानां क्रमान्मानं प्रजायते ।
कलेर्मानं क्रमाद्विघ्नं चतुस्त्रिद्विमितैस्तदा ॥ १७ ॥

पर्यायेकरून पुन पुन होणारें जें कालमान त्यास युग म्हणतात. हीं युगें चार आहेत. १ कृतयुग किंवा सत्ययुग, २ त्रेतायुग, ३ द्वापारयुग आणि ४ कलियुग. कलियुगाचें प्रमाण ४,३२,००० वर्षे आहे. या संख्येला चोहोंनीं गुणिलें म्हणजे सत्ययुगाचीं, तिहींनीं गुणिलें म्हणजे त्रेतायुगाचीं आणि दोहोंनीं गुणिलें म्हणजे द्वापारयुगाचीं वर्षे निघतात. म्हणजे कृतयुगाचीं १७,२८,००० वर्षे, त्रेतायुगाचीं १२,९६,००० वर्षे आणि द्वापारयुगाचीं ८,६४,००० वर्षे होतात. चार युगें म्हणजे एक महायुग होतें, आणि एक हजार महायुगें मिळून एक कल्प होतो. प्रस्तुत कल्पाचीं एकंदर २७ महायुगें पुरीं होऊन २८ व्या महायुगांतील कृत, त्रेता आणि द्वापार अशीं तीन युगें गत होऊन सांप्रत चवथें कलियुग चाललें आहे. म्हणून पूजेच्या वगैरे नित्य संकल्पांत अष्टाविंशतितमे कलियुगे असें म्हणतात. प्रत्येक युगाचें लक्षावधि वर्षांचें प्रमाण असल्यामुळें कांहीं तरी दीर्घकाल अशा अर्थीही व्यवहारात युग शब्दाचा उपयोग करितात. वेदांगज्योतिषांत पंचवर्षात्मक कालाला युग अशी संज्ञा दिलेली आहे.

## गतकलीचें प्रमाण.

खगर्दालेंदुरामाप्ते ३१७९ शाकेऽब्दास्ते कलेर्गताः।
तैर्विहीनं कलेर्मानं शेषे शेषकलेर्मितिः ॥ १८ ॥

शालिवाहन शक सुरू झाला त्यावेळीं कलियुगाचीं ३१७९ वर्षे गत झालीं होतीं म्हणून शालिवाहन शकामध्यें ३१७९ मिळवून जी बेरीज येईल ती संख्या गेलेल्या कलियुगाच्या वर्षांचें प्रमाण होय आणि तीच बेरीज कलियुगाच्या एकंदर वर्षसंख्येतून वजा केली असतां राहील ती संख्या शेष कलीचें प्रमाण होय. उदाहरणार्थ, शालिवाहन शके १८३२ ह्या सालीं कलीचीं किती वर्षे गेलीं आहेत हें काढावयाचें आहे म्हणून वर लिहिल्याप्रमाणें १८३२ त ३१७९ मिळविले म्हणजे ५०११ ही बेरीज झाली. हें गतकलीचें प्रमाण झालें, आणि हीच संख्या म्हणजे ५०११ एकंदर कलीच्या वर्षसंख्येतून म्हणजे ४,३२,००० ह्या संख्येतून वजा केली म्हणजे बाकी ४,२६,९८९ वर्षे रहातात. हीं वर्षे १८३२ सालीं कलियुगाचीं बाकी भोगावयाचीं राहिलीं असें समजावें.

## शककर्ते.

युधिष्ठिरो विक्रमशालिवाहनौ ततो नृपः स्याद्विजयाभिनंदनः।
ततस्तु नागार्जुनभूपतिः कलौ कल्की षडेते शककारकाः स्मृताः॥१९॥

कलियुगांत एकंदर सहा शककर्ते होतील असें विद्वान् ज्योतिर्विदांनीं लिहून ठेविलें आहे. त्या सहांतून तीन होऊन गेले आणि तीन अद्यापि व्हावयाचे

ते शककर्ते कोणते व कोणाचा शक कोठें स्थापित होऊन किती वर्षे चालेल हें खालीं दिलें आहे.

| | | |
|---|---|---|
| पहिला-इंद्रप्रस्थ म्हणजे दिल्ली येथें युधिष्ठिरशक | ... ... | ३,०४४ वर्षे. |
| दुसरा-उज्जयिनी येथें विक्रमशक ( संवत् ) ... | ... ... | १३५ ,, |
| तिसरा-पैठण येथें शालिवाहनशक ... ... | ... ... | १८,००० ,, |
| चवथा-वैतरणेच्या कांठीं विजयाभिनंदनशक | ... .. | १०,००० ,, |
| पांचवा-बंगाल देशांत धारातीर्थी नागार्जुनशक | ... | ...४,००,००० ,, |
| सहावा-कर्नाटकांत करवीरपत्तनीं कल्कीशक | ... ... | ८२१ ,, |
| | एकंदर कलियुगाचीं वर्षे... | ४,३२,००० |

हल्लीं शालिवाहनाचा शक चालू आहे.

## शालिवाहनशक.

शक ह्या शब्दाचा अर्थ व्यवहारांत काल असा समजतात, पण वास्तविक अर्थ निराळा आहे. प्राचीन काळीं शककुलोत्पन्न राजे होते. त्यांच्या वर्षास शककाल किंवा शकनृपकाल म्हणजे शककुलांतील राजांचीं वर्षे असें म्हणत असत. त्यांचा काल संपल्यानंतर पुढें शालिवाहनाचा काल सुरू झाला, त्यास शालिवाहनाचा काल असें न म्हणतां काल शब्दाऐवजीं पूर्वीचा शक शब्द कायम ठेवून लोक शालिवाहनाचा शक असें ह्मणू लागले. सुमारें ४०० वर्षांपूर्वी शालिवाहन-शकालाही शककाल किंवा शकनृपकाल असें म्हणत असत. सारांश, शक हें वस्तुतः प्रथम एका कुलाचें नांव असून हल्लीं तो शब्द कालबोधक समजतात.

गोदातीरीं पैठणक्षेत्रामध्यें शालिवाहन या नांवाचा राजा होता. त्यानें विक्रमाच्या शकानंतर १३५ वर्षांनीं आपला शक सुरू केला म्हणून त्याच्या शकास त्याच्या नांवावरून शालिवाहनशक असें म्हणतात. ह्या शकाचा वर्षारंभ चैत्र-शुद्ध प्रतिपदेस होतो म्हणून त्या दिवसास वर्षप्रतिपदा म्हणतात. शालिवाहन-शक नर्मदानदीच्या दक्षिणेकडे म्हणजे महाराष्ट्रांत फार प्रचारांत आहे. शालि-वाहनशक आणि इसवीसन ह्यांमध्यें ७८। वर्षांचें अंतर आहे.

## विक्रमसंवत्.

उज्जयिनीस विक्रमादित्य नांवाचा राजा होऊन गेला. त्यानें इसवीसनापूर्वी [सु]मारें ५६।५७ वर्षे आपला शक सुरू केला. ह्याच्या शकास संवत् असें म्हण-[त]ात. संवत् हा संवत्सर ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. ह्या शकाचा वर्षारंभ [का]र्तिकशुद्ध प्रतिपदेस होतो. व्यापारी लोकांचें व्यापारसंबंधीं ह्या दिवशीं [वर्ष] बदलतें. गुजराथेंत कित्येक ठिकाणीं ह्या वर्षाचा आरंभ चैत्रांत व कित्येक [ठि]काणीं आषाढांत होतो. नर्मदेच्या उत्तरेकडे म्हणजे गुजराथप्रांतांत विक्रम-

संवत् फार प्रचारांत आहे. नर्मदेच्या दक्षिणेकडे व्यापारी लोक मात्र आपल्या व्यापारसंबंधीं लिहिण्यांत संवत् मानितात. शालिवाहनशकांत १३५ मिळविले म्हणजे कार्तिकांत शुद्ध प्रतिपदेस होणाऱ्या वर्षारंभाचा संवत् निघतो.

## युरोपियनशक.

इंग्रजी राज्यामुळें तिथींपेक्षां तारखेची गरज अलीकडे विशेष लागते म्हणून लोकांच्या सोयीसाठीं पंचांगांतून इंग्रजी तारखा व महिने वगैरे लिहिण्याची चाल पडली आहे. म्हणून त्याविषयीं खालीं संक्षिप्त माहिती देतों.

युरोपिअनांच्या म्हणजे ख्रिस्ती लोकांच्या शकास इसवीसन असें म्हणतात. सन हा शब्द मूळचा यवनी आहे आणि इसवी हा कदाचित् येशूशब्दाचा अपभ्रंश असेल. हा शकाचा आरंभ येशूख्रिस्ताच्या जन्मापासून धरिला आहे. आणि त्याचा वर्षारंभ ज्यान्युआरी महिन्याच्या पहिल्या तारखेस होतो. शालिवाहनशकांत ७८। मिळविले किंवा विक्रमसंवतांतून ५६ वजा केले म्हणजे इसवीसन निघतो. ह्याचा अर्थ असा कीं, शालिवाहनशक इसवीसनानंतर ७८। वर्षांनीं सुरू झाला व विक्रमसंवत् ५६ किंवा ५७ वर्षें इसवीसनापूर्वी सुरू झाला. ह्याचें सौरमासाचें म्हणजे ३६५ दिवसांचें वर्ष आहे. सूक्ष्म मानानें ३६५ दिवस ६ तास आणि ९ मिन्युटें इतक्या काळाचें एक सौरवर्ष होतें. व त्यांच्या वर्षाचे दिवस फक्त ३६५ असतात; आणि वरचा ६ तास ९ मिन्युटांचा फरक नाहींसा व्हावा, म्हणून दर चार वर्षांनीं फेब्रुआरीचे २९ दिवस धरितात. त्यांच्या बारा महिन्यांचे दिवस सारखे नसतात. ज्यानुआरी ३१ फेब्रुआरी २८ मार्च ३१ एप्रिल ३० मे ३१ जून ३० जुलई ३१ आगस्ट ३१ सप्टेंबर ३० ऑक्टोबर ३१ नोव्हेंबर ३० डिसेंबर ३१ याप्रमाणें असतात. ज्या वर्षी फेब्रुआरीचे २९ दिवस धरितात त्या वर्षास लीप म्हणजे अधिकाहवर्ष म्हणतात. ज्या सनास चोहोंनीं पूर्ण भाग जातो तें लीपवर्ष होय. उदाहरणार्थ १८९२, १८९६ इत्यादि. पण जेव्हां सनाच्या शेवटीं दोन शून्यें असतात, तेव्हां जर त्या सनाला ४०० नीं निःशेष भाग जात असेल तर मात्र तें लीपवर्ष समजावें. उदाहरणार्थ सन १७००, १८०० किंवा १९०० ह्या सनांला ४०० नीं भागिलें असतां निःशेष भाग जात नाहीं म्हणजे भागाकाराची बाकी शून्य रहात नाहीं म्हणून ह्यांपैकीं कोणतेंही लीपवर्ष नव्हे. पण सन १६०० किंवा २००० ह्यांला ४०० नीं भागून पूर्ण भाग जातो म्हणून हीं लीपवर्षें होत. याप्रमाणें प्रत्येक ४०० वर्षांत तीन दिवस वजा होतात. याचें कारण असें आहे कीं, दर चार वर्षांनीं फेब्रुआरी महिन्याचा जो एक दिवस अधिक धरितात त्यांत हिशेबापेक्षां सुमारें पाऊण तास अधिक धरिला जातो; म्हणजे दर चारशें वर्षांत तीन दिवस ज्यास्त मोजले जातात. ही चूक नाहींशी व्हावी म्हणून दर चारशें वर्षांत तीन दिवस वजा करावे लागतात.

# यवनी शक.

मुंबई, पुणें इत्यादि ठिकाणच्या पंचांगांतून कांहीं यवनी शक दाखवितात याकरितां त्यांची संक्षिप्त माहिती येथें सांगतों.

१ हिजरी सन—हिजरा या यवनी शब्दाचा अर्थ पळून जाणें, असा आहे. महंमद पैगंबर इसवी सन ६२२ तारीख १५ जुलई रोजीं मक्केहून मदिना येथे पळून गेला आणि त्या दिवसापासून ह्या शकाची सुरुवात झाली, म्हणून त्यास हिजरी सन म्हणतात. ह्या सालाचा वर्षारंभ मोहरम महिन्याच्या पहिल्या तारिखेस होतो. ह्याचें चांद्रमासाचें वर्ष आहे. अमावास्येनंतर ज्या रात्रीं प्रथम चंद्रदर्शन होईल तो महिन्याचा प्रथम दिवस समजतात. चंद्रदर्शन झाल्यावेळेपासून महिन्याची सुरवात होत असल्यामुळें वाराचा आरंभ अर्थात् रात्रीपासून होतो. म्हणजे आपली शनिवारची रात्र ती त्यांची आदित्यवारची रात्र असते महिन्याच्या दिवसांला पहिला चंद्र, दुसरा चंद्र असें म्हणतात; किंवा तारीख शब्दाचाही उपयोग करितात. त्यांचे बारा महिने हिंदूंच्या चांद्रमासाबरोबर असून सर्व महिन्यांचे दिवस सारखे नसतात. म्हणजे आपल्या महिन्याच्या जशा कधीं २९ आणि कधीं ३० तिथि होतात, त्याप्रमाणेंच त्यांच्या महिन्यांचे कधी २९ आणि कधीं ३० चंद्र होतात; आणि वर्षाचे दिवस ३५४ भरतात पण मुसलमान लोक आपल्याप्रमाणें अधिक महिना धरीत नाहींत, त्यामुळें त्यांच्या वर्षांचा सौरवर्षाशीं मेळ नसतो. ज्या वर्षीं आपला अधिकमास येतो, त्या वर्षीं त्यांचा मोहरम एक महिना मागें जातो. ह्याप्रमाणें दर तिसऱ्या वर्षीं एक महिना मागें गेल्यामुळें दर ३२ किंवा ३३ वर्षांनीं त्यांच्या सनाचा एक अंक वाढतो त्यांच्या बारा महिन्यांचीं नांवें—१ मोहरम २ सफ्फर ३ रबिलावल ४ रबिलाखर ५ जमादिलावर ६ जमादिलाखर ७ रजब ८ साबान ९ रमजान १० सवाल ११ जिल्काद १२ जिल्हेज.

२ फसली सन—पेरणीचे सुमारास ह्या सनाचा वर्षारंभ होतो म्हणून याला फसलीसन म्हणतात. फसल शब्दाचा अर्थ पेरणें, शेत करणें असा आहे. दक्षिण हिंदुस्थानांत शहाजान नांवाच्या बादशहानें इसवी सन १६३६ त ह्या सनाची सुरवात केली; पण त्यापूर्वीच सुमारें ८० वर्षें अकबरानें उत्तर हिंदुस्थानांत हा सन प्रचारांत आणिला होता. फसलीस फारशी असें सांपत म्हणतात. पंचांगांतून फारशी तारखा असतात, त्या फसली महिन्यांच्याच होत. पारशी व फारशी सन निराळे आहेत पण महिन्यांचीं नांवें एकच असतात. मुंबई प्रांताच्या पंचांगांतून फसली सनाचा फक्त वर्षारंभ दाखवितात, पण तारखा दाखवीत नाहींत. हा वर्षारंभ जून महिन्याच्या सुमारें सातव्या तारखेस असतो. थोड्या वर्षांपूर्वीं माजी निजामसरकारांनीं जुन्या फसलीच्या तारखेंत फेरफार करुन आजर महिन्यापासून सनाचा आरंभ ठरविला आहे. तो भाद्रपद किंवा आश्विन या महिन्यांत असतो.

फारशी महिन्यांचीं नांवें—आजूर ३० दय २९ बहमन ३० इसांपेदाद ३० फरवर्दी ३१ आर्दिबेहस्त ३१ खुर्दाद ३१ तीर ३१ अमरदाद ३१ शहरेवार ३१ मेहेर ३० आवान ३० ह्याप्रमाणें एकंदर वर्षाचे दिवस ३६५ असतात. दर वर्षांत पूर्ण वर्षाचा काल भरण्यास सुमारें सहा तास कमी पडतात म्हणून इग्रजी पद्धतीप्रमाणें ज्या फसली सनाच्या अंकांस चार या संख्येनें नि.शेष भाग जातो त्या सालीं दय महिना ३० तारखेचा धरितात. ह्या सनाचा मूळ आरंभ इसवी सन ५९० किंवा शके ५१२ या वर्षी झाला. फसली साल हिजरी सालाप्रमाणें चांद्रमानाचें नसून सौरमानाचें असल्यामुळें दर ३३ वर्षांनीं त्या दोहोंत एक वर्षाचें अंतर पडतें.

३ आरबी सन—ह्याला सुरमन किंवा शाहुरसन म्हणतात. ह्या सनाचा आरंभ इसवी सन ५९९ या वर्षी म्हणजे फसली सनानंतर नऊ वर्षांनीं झाला. फसली सनाप्रमाणेंच मृगनक्षत्रीं सूर्य जातो त्या दिवशीं याचा वर्षारंभ होतो. याचें वर्ष सौरमानाचें आणि महिने चांद्रमानाचे आहेत, त्यामुळें दर तिसऱ्या वर्षी एक वर्ष तेरा महिन्यांचें होतें.

## पारशी शक.

पारशी लोकांच्या शकाला यज्दीजर्द असें म्हणतात. हाही आपल्या पंचांगांत दाखवितात हा शालिवाहन शकाच्या ५५२ वर्षांनंतर किंवा इसवी सनाच्या ६३० वर्षांनंतर सुरू झाला हा सन पर्शियांत (इराणांत) सुरू झाल्यानंतर सुमारें ४०।५० वर्षांनीं पारशी लोक हिंदुस्थानांत आले. ते पर्शिआ देशांतून आले म्हणून त्यांस पारशी म्हणतात पारशी लोकांला हिंदुस्थानांत येऊन सुमारें १२५० वर्षे होऊन गेलीं. ह्यांचा महिना सावन म्हणजे पूर्ण तीस दिवसांचा असतो. अर्थात् वर्षाचे दिवस ३६० होतात. परंतु सौरवर्षाशीं मेळ बसावा म्हणून हे लोक वर्षाच्या शेवटीं पांच दिवस अधिक धरतात, त्यास गाथागंबर असें म्हणतात. हे दिवस पारशी लोक फार महत्वाचे समजतात. त्यांच्या महिन्यांचीं नांवें:—१ फरवर्दीन २ आर्दिबेहस्त ३ खोरदाद ४ तिर ५ अमरदाद ६ शरेवर ७ मेहर ८ आवान ९ आदर १० देहे ११ हमन १२ अस्पंदादमाद.

## संवत्सरांचीं नांवें.

प्रभवो विभवः शुक्लः प्रमोदोऽथ प्रजापतिः ।<br>
अंगिराः श्रीमुखो भावो युवा धाता तथैव च ॥ २० ॥<br>
ईश्वरो बहुधान्यश्च प्रमाथी विक्रमो वृषः ।<br>
चित्रभानुः सुभानुश्च तारणः पार्थिवोऽव्ययः ॥ २१ ॥<br>
सर्वजित्सर्वधारी च विरोधी विकृतिः खरः ।<br>
नन्दनो विजयश्चैव जयो मन्मथदुर्मुखौ ॥ २२ ॥

हेमलंबी विलंबी च विकारी शार्वरी प्लवः ।
शुभकृच्छोभकृत्क्रोधी विश्वावसुपराभवौ ॥ २३ ॥
प्लवंग• कीलकः सौम्यः साधारणविरोधकृत् ।
परिधावी प्रमादी स्यादानंदो राक्षसो नल• ॥ २४ ॥
पिंगलः कालयुक्तश्च सिद्धार्थी रौद्रदुर्मती ।
दुंदुभी रुधिरोद्गारी रक्ताक्षी क्रोधनः क्षयः ॥ २५ ॥
षष्टिसंवत्सरा ह्येते क्रमेण परिकीर्तिताः ।
स्वाभिधानसमं ज्ञेयं फलमेषां मनीषिभि• ॥ २६ ॥

•सम्+ वसति+ ऋतव म्हणजे चांगले ऋतु ज्यांत आहेत असें जें कालगणनेचें प्रमाण त्यास संवत्सर असें म्हणतात. ह्याशिवाय दुसरी एक संवत्सर शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे कीं, वत्स म्हणजे वासरूं आणि सरसवर्धा काळ तो वत्सर. गाईम्हशींला सुमारें १२ महिन्यांनीं एक येत पिया वासरूं होतें त्यावरून वत्सर या शब्दाची कल्पना कदाचित् निघाली असावी. पृथ्वीची सूर्यासभोंवती एक प्रदक्षिणा पूर्ण होण्यास सुमारें एक वर्ष लागतें त्यावरून पुढें वत्सर हा शब्द वर्षाचा वाचक समजला गेला. असो. आपल्या ज्योतिःशास्त्रांत साठ वर्षांचें एक मंडळ करून प्रत्येक संवत्सरास एकेक नांव अशीं साठ संवत्सरास निरनिराळीं साठ नांवें दिलेलीं आहेत. हींच नांवें संवत्सरास पर्यायेंकरून पुनः पुनः येतात. त्यांचीं फलें त्याच्या नावाप्रमाणें जाणावीं. तीं नांवें येणेंप्रमाणें —

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्रभव | १६ चित्रभानु | ३१ हेमलंबी | ४६ परिधावी |
| २ विभव | १७ सुभानु | ३२ विलंबी | ४७ प्रमादी |
| ३ शुक्ल | १८ तारण | ३३ विकारी | ४८ आनंद |
| ४ प्रमोद | १९ पार्थिव | ३४ शार्वरी | ४९ राक्षस |
| ५ प्रजापति | २० व्यय | ३५ प्लव | ५० नल |
| ६ अंगिरा | २१ सर्वजित् | ३६ शुभकृत् | ५१ पिंगल |
| ७ श्रीमुख | २२ सर्वधारी | ३७ शोभकृत् | ५२ कालयुक्त |
| ८ भाव | २३ विरोधी | ३८ क्रोधी | ५३ सिद्धार्थी |
| ९ युव | २४ विकृति | ३९ विश्वावसु | ५४ रौद्र |
| १० धाता | २५ खर | ४० पराभव | ५५ दुर्मति |
| ११ ईश्वर | २६ नंदन | ४१ प्लवंग | ५६ दुंदुभी |
| १२ बहुधान्य | २७ विजय | ४२ कीलक | ५७ रुधिरोद्गारी |
| १३ प्रमाथी | २८ जय | ४३ सौम्य | ५८ रक्ताक्षी |
| १४ विक्रम | २९ मन्मथ | ४४ साधारण | ५९ क्रोधन |
| १५ वृष | ३० दुर्मुख | ४५ विरोधकृत् | ६० क्षय |

## संवत्सराचें नांव काढण्याची रीति.

शाको द्वादशभिर्युक्तः षष्टिह्रत्सरो भवेत् ।
रेखाया दक्षिणे भागे मानताख्यः स्मृतो बुधैः ॥ २७ ॥
स एव नवभिर्युक्तो नर्मदायास्तयोत्तरे ।
यो वै वाचस्पतेर्मध्यराशिभागेन कथ्यते ॥ २८ ॥

शालिवाहनशकांतील ज्या संवत्सराचें नांव पाहिजे असेल त्या शकांत बारा मिळवावे, आणि त्या बेरजेस साठानीं भागावें; जी बाकी राहील तो अंक त्या संवत्सराचें नांव समजावें. तसेंच, विक्रमसंवतांत नऊ मिळवून त्या बेरजेस साठानीं भागावें आणि जो अंक बाकी राहील तें विक्रमसंवत्सराचें नांव होय.

उदाहरण—शके १८३२ या संवत्सराचें नांव पाहिजे आहे. वर लिहिलेल्या रीतीप्रमाणें त्यांत १२ मिळविले म्हणजे १८४४ झाले. ह्या बेरजेस साठानीं भागिलें म्हणजे बाकी ४४ राहिली. वर संवत्सरांच्या नांवांचें जें कोष्टक दिलें आहे त्यांत ४४ अंकासमोर 'साधारण' असें नांव आहे म्हणून शके १८३२ ह्या वर्षास 'साधारणनामसंवत्सरे' असें म्हणावें. ह्याप्रमाणें पाहिजे त्या वर्षाचें नाव काढितां येतें. तसेंच, विक्रमसंवत् १९६६ यांत नऊ मिळविले म्हणजे १९७५ झाले. ह्या बेरजेस साठानीं भागून बाकी ५५ रहाते. वरील कोष्टकांत पचावन्नाव्या संवत्सराचें नाव दुर्मति असें आहे. म्हणून तेंच १९६६ या सालाचें विक्रमसंवत्सराचें नांव होय.

## संवत्सरांचीं फलें.

प्रभवाद् द्विगुणं कृत्वा त्रिभिर्न्यूनं च कारयेत् ।
सप्तभिस्तु हरेद्भागं शेषं ज्ञेयं शुभाशुभम् ॥ २९ ॥
एकं चत्वारि दुर्भिक्षं पंचद्वाभ्यां सुभिक्षकं ।
त्रिषष्ठे तु समं ज्ञेयं शून्यं पीडा न संशयः ॥ ३० ॥

अर्थ—प्रभव म्हणजे पहिल्या संवत्सरापासून चालू संवत्सरापर्यंत मोजून जितके अंक होतील त्यांची दुप्पट करून त्यांत तीन वजा करावे, बाकी राहील त्या संख्येस सातानीं भागावें. शेष १ किंवा ४ असतां त्या वर्षी महागाई होईल, २ किंवा ५ असतां स्वस्ताई होईल; ३ किंवा ६ असतां साधारण सम राहील आणि बाकी शून्य राहिली तर रोग उत्पन्न होतील.

## अयन.

भानोर्मकरसंक्रांतेः षण्मासा उत्तरायणं ।
तद्देचदिवसस्तत्र शुभं कार्यं प्रशस्यते ॥ ३१ ॥

कर्कादिराशिषट्केऽर्के षण्मासा दक्षिणायनं ।
देवरात्रिस्तदेवात्र प्रोक्तं कार्यं प्रसिद्ध्यति ॥ ३२ ॥

अयने दोन आहेत १ उत्तरायण व २ दक्षिणायन. शिशिर, वसंत आणि ग्रीष्म ह्या तीन ऋतूत म्हणजे मकर संक्रांतीच्या आरंभापासून तो कर्क संक्रांतीच्या आरंभापर्यंत सूर्याची गति म्हणजे जाणे उत्तरेकडे असते, म्हणून त्या कालास उत्तरायण किंवा उदगयन म्हणतात, आणि वर्षाऋतु, शरदृतु व हेमंतऋतु ह्या तीन ऋतूत म्हणजे कर्क संक्रांतीच्या आरंभापासून तो मकर संक्रांत लागेपर्यंत सूर्याचे जाणे दक्षिणेकडे असते म्हणून त्या कालास दक्षिणायन म्हणतात. मकरसंक्रांत पौष महिन्यात म्हणजे प्रायः जान्युआरीच्या बाराव्या किंवा तेराव्या तारखेस व कर्क संक्रांत आषाढात म्हणजे बहुतकरून जुलईच्या चवदाव्या किंवा सोळाव्या तारखेस येते, म्हणजे उदगयनाला पौषात व दक्षिणायनाला आषाढात आरंभ होतो. ह्याप्रमाणे सहा महिने उत्तरायण व सहा महिने दक्षिणायन असते. *उत्तरायण हा देवाचा दिवस आणि दक्षिणायन ही देवाची रात्र कल्पिलेली आहे.*

## उत्तरायणांतील कृत्ये.

गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठा विवाहचौलव्रतबन्धदीक्षा ।
सौम्यायने कर्म शुभं विधेयं यद्गर्हितं तत्खलु दक्षिणे च ॥ ३३ ॥

उत्तरायण हे प्रायः सर्व कार्यांस उक्त मानिलेले आहे. नव्या घरात जाणे, देवांची अर्चा म्हणजे प्रतिष्ठा करणे, विवाह, चौल, उपनयन, मंत्र, तंत्र शिकणे इत्यादि सर्व कृत्ये उत्तरायणात करावी. ह्याशिवाय अन्य कृत्ये दक्षिणायनात करावी. तथापि मार्गशीर्ष मासात दक्षिणायन असूनही विवाह करणे उक्त आहे.

## ऋतु आणि त्यांचे काल.

वसंतो ग्रीष्मसंज्ञश्च ततो वर्षा ततः शरत् ।
हेमंतः शिशिरश्चैव षडेते ऋतवः स्मृताः ॥ ३४ ॥
मीनमेषगते सूर्ये वसंतः परिकीर्तितः ।
वृषभे मिथुने ग्रीष्मो वर्षाः सिंहे च कर्कटे ॥ ३५ ॥
शरत्कन्यातुलयोश्च हेमंतो वृश्चिके धने ।
शिशिरो मकरे कुंभे षडेवमृतवः स्मृताः ॥ ३६ ॥

ऋतूंचा संबंध सूर्याच्या गतीशी आहे. जसजसा सूर्य क्रांतिवृत्तातून फिरतो तसतसे ऋतु बदलतात. हे ऋतु सहा आहेत. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत आणि शिशिर. सूर्य कोणत्या राशीस आला म्हणजे कोणता ऋतु असतो हें वरील लिहिल्यावरून ध्यानीं येईल.

## संवत्सराचें नांव काढण्याची रीति.

शाको द्वादशभिर्युक्तः षष्टिहृद्वत्सरो भवेत् ।
रेखाया दक्षिणे भागे मानसाख्यः स्मृतो बुधैः ॥ २७ ॥
स एव नवभिर्युक्तो नर्मदायास्तथोत्तरे ।
यो वै वाचस्पतेर्मध्यराशिभागेन कथ्यते ॥ २८ ॥

शालिवाहनशकांतील ज्या संवत्सराचें नांव पाहिजे असेल त्या शकांत बारा मिळवावे, आणि त्या बेरजेस साठांनीं भागावें, जी बाकी राहील तो अंक त्या संवत्सराचें नांव समजावें. तसेंच, विक्रमसंवतांत नऊ मिळवून त्या बेरजेस साठांनीं भागावें आणि जो अंक बाकी राहील तें विक्रमसंवत्सराचें नांव होय.

उदाहरण—शकें १८३२ या संवत्सराचें नांव पाहिजे आहे तर लिहिलेल्या रीतीप्रमाणें त्यांत १२ मिळविले म्हणजे १८४४ झाले. ह्या बेरजेस साठांनीं भागिलें म्हणजे बाकी ४४ राहिली. वर संवत्सरांच्या नांवाचें जें कोष्टक दिलें आहे त्यांत ४४ अंकासमोर 'साधारण' असें नांव आहे म्हणून शकें १८३२ ह्या वर्षास 'साधारणनामसंवत्सरे' असें म्हणावें. ह्याप्रमाणें पाहिजे त्या वर्षाचें नांव काढितां येतें. तसेंच, विक्रमसंवत् १९६६ यांत नऊ मिळविले म्हणजे १९७५ झाले. ह्या बेरजेस साठांनीं भागून बाकी ५५ रहाते. वरील कोष्टकांत पंचावन्नाव्या संवत्सराचें नांव दुर्मति असें आहे. म्हणून तेंच १९६६ या सालचें विक्रमसंवत्सराचें नांव होय

## संवत्सरांचीं फलें.

प्रभवाद् द्विगुणं कृत्वा त्रिभिर्न्यूनं च कारयेत् ।
सप्तभिस्तु हरेद्भागं शेषं ज्ञेयं शुभाशुभम् ॥ २९ ॥
एकं चत्वारि दुर्भिक्षं पंचद्वाभ्यां सुभिक्षकं ।
त्रिषष्ठे तु समं ज्ञेयं शून्यं पीडा न संशयः ॥ ३० ॥

अर्थ—प्रभव म्हणजे पहिल्या संवत्सरापासून चालू संवत्सरापर्यंत मोजून जितके अंक होतील त्याची दुप्पट करून त्यांत तीन वजा करावे, बाकी राहील त्या संख्येस सातांनीं भागावें. शेष १ किंवा ४ असतां त्या वर्षी महागाई होईल, २ किंवा ५ असतां स्वस्ताई होईल, ३ किंवा ६ असतां साधारण सम राहील आणि बाकी शून्य राहिली तर रोग उत्पन्न होतील.

## अयन.

भानोर्मकरसंक्रांतेः षण्मासा उत्तरायणं ।
तद्देवदिवसस्तत्र शुभं कार्यं प्रशस्यते ॥ ३१ ॥

कर्कादिराशिषट्केऽर्के षण्मासा दक्षिणायनं ।
देवरात्रिस्तदेवात्र प्रोक्तं कार्यं प्रसिद्ध्यति ॥ ३२ ॥

अयनें दोन आहेत. १ उत्तरायण व २ दक्षिणायन. शिशिर, वसंत आणि ग्रीष्म ह्या तीन ऋतूंत म्हणजे मकर संक्रांतीच्या आरंभापासून तों कर्क संक्रांतीच्या आरंभापर्यंत सूर्याची गति म्हणजे जाणें उत्तरेकडे असतें, म्हणून त्या कालास उत्तरायण किंवा उदगयन म्हणतात; आणि वर्षाऋतु, शरदृतु व हेमंतऋतु ह्या तीन ऋतूंत म्हणजे कर्क संक्रांतीच्या आरंभापासून तों मकर संक्रांत लागेपर्यंत सूर्याचें जाणें दक्षिणेकडे असतें म्हणून त्या कालास दक्षिणायन म्हणतात. मकरसंक्रांत पौष महिन्यांत म्हणजे प्रायः जान्युआरीच्या बाराव्या किंवा तेराव्या तारखेस व कर्क संक्रांत आषाढांत म्हणजे बहुतकरून जुलईच्या पंधराव्या किंवा सोळाव्या तारखेस येते; म्हणजे उदगयनाला पौषांत व दक्षिणायनाला आषाढांत आरंभ होतो. ह्याप्रमाणें सहा महिने उत्तरायण व सहा महिने दक्षिणायन असतें. *उत्तरायण हा देवांचा दिवस आणि दक्षिणायन ही देवांची रात्र कल्पिलेली आहे.*

## उत्तरायणांतील कृत्यें.

गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठा विवाहचौलव्रतबन्धदीक्षा ।
सौम्यायने कर्म शुभं विधेयं यद्गर्हितं तत्खलु दक्षिणे च ॥ ३३ ॥

उत्तरायण हे प्रायः सर्व कार्यास उक्त मानिलेलें आहे. नव्या घरांत जाणें, देवाची अर्चा म्हणजे प्रतिष्ठा करणें, विवाह, चौल, उपनयन, मंत्र, तंत्र शिकणें इत्यादि सर्व कृत्यें उत्तरायणांत करावीं. ह्याशिवाय अन्य कृत्यें दक्षिणायनांत करावीं. तथापि मार्गशीर्ष मासांत दक्षिणायन असूनही विवाह करणें उक्त आहे.

## ऋतु आणि त्यांचे काल.

वसंतो ग्रीष्मसंज्ञश्च ततो वर्षा ततः शरत् ।
हेमंतः शिशिरश्चैव षडेते ऋतवः स्मृताः ॥ ३४ ॥
मीनमेषगते सूर्ये वसंतः परिकीर्तितः ।
वृषभे मिथुने ग्रीष्मो वर्षाः सिंहेथ कर्कटे ॥ ३५ ॥
शरत्कन्यातुलयोश्च हेमंतो वृश्चिके धने ।
शिशिरो मकरे कुंभे षडेवमृतवः स्मृताः ॥ ३६ ॥

ऋतूंचा संबंध सूर्याच्या गतीशीं आहे. जसजसा सूर्य क्रांतिवृत्तांतून फिरतो तसतसे ऋतु बदलतात. हे ऋतु सहा आहेत. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत आणि शिशिर. सूर्य कोणत्या राशीस आला म्हणजे कोणता ऋतु असतो हें खालीं लिहिल्यावरून ध्यानीं येईल.

| राशी | ऋतु | राशी | ऋतु |
|---|---|---|---|
| मीन व मेष =वसंतऋतु | | कन्या व तूळ=शरदृतु | |
| वृषभ व मिथुन=ग्रीष्मऋतु | | वृश्चिक व धन=हेमंतऋतु | |
| कर्क व सिंह =वर्षाऋतु | | मकर व कुंभ=शिशिरऋतु | |

ह्याप्रमाणे सूर्याने दोन संक्रांति किंवा राशि भोगिल्या म्हणजे चैत्रादि करून बारा महिन्यांत सहा ऋतु पूर्ण होतात राशि किंवा संक्रांति म्हणजे काय हे येथे सांगितले पाहिजे ज्या *मार्गांतून सूर्य फिरतोसा दिसतो त्या मार्गाचे म्हणजे क्रांतिवृत्ताचे बारा भाग कल्पिलेले आहेत ते बारा भाग ह्याच बारा राशि होत सूर्य एका वर्षांत सर्व क्रांतिवृत्तावरून म्हणजे बारा राशींवरून जातो या ठिकाणीं सूर्य फिरतो असें लिहिलें आहे ते केवळ विषयाच्या सम तुलीकरिता लिहिलें आहे वास्तविक सूर्य फिरत नाहीं पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते आणि त्यामुळे सूर्यच फिरतो आहे असें भासते एका भागांतून दुसऱ्या भागांत जे सूर्याचे जाणे त्यास संक्रांति म्हणतात ह्या बारा राशींचीं किंवा संक्रांतीचीं निरनिराळीं नावें आहेत तीं येणेप्रमाणें —

मेषो वृषोथ मिथुनं कर्क सिंहोथ कन्यका ।
तुलाथ वृश्चिको धन्वी मकरः कुंभमीनकौ ॥ ३७ ॥

१ मेष २ वृषभ ३ मिथुन ४ कर्क ५ सिंह ६ कन्या ७ तूळ ८ वृश्चिक ९ धन १० मकर ११ कुंभ आणि १२ मीन

## महिने.

मासश्चैत्रोऽथ वैशाखो ज्येष्ठ आषाढसंज्ञक ।
ततस्तु श्रावणो भाद्रपदोऽथाश्विनसंज्ञक ॥ ३८ ॥
कार्तिको मार्गशीर्षश्च पौषो माघोऽथ फाल्गुन ।
एतानि मासनामानि चैत्रादीनां क्रमाद्विदु ॥ ३९ ॥

महिने बारा आहेत त्यांचीं नावें—चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन

यस्मिन्मासे पौर्णमासी येन धिष्ण्येन संयुता ।
तन्नक्षत्राह्वयो मास पौर्णमासी तदाह्वया ॥ ४० ॥

चैत्र, वैशाख इत्यादि मासनामें प्रथम नक्षत्रावरून उत्पन्न झालीं, म्हणजे प्रत्येक महिन्यांत ज्या नक्षत्राजवळ चंद्र पूर्ण होतो त्या नक्षत्रावरून त्या महिन्याचें नाव

---

* आकाशांत चंद्र सूर्य ज्या नियमित वर्तुळ मार्गाने फिरतात असें दिसते त्यास क्रांतिवृत्त म्हणतात क्रांति म्हणजे जाणे आणि वृत्त म्हणजे वर्तुळ

पडलें. पूर्णिमेस पूर्ण चंद्र असतो हे सर्वांस माहीत आहेच; तेव्हां प्रत्येक महिन्याच्या नांवाचें नक्षत्र सुमारें त्या महिन्याच्या पौर्णिमेस किंवा पौर्णिमेजवळ असतें. ह्याप्रमाणें बारा महिन्यांचीं निरनिराळीं बारा नांवें पडलीं तीं अशीं:—

| महिन्याचें नांव. | नक्षत्राचें नांव. | महिन्याचें नांव. | नक्षत्राचें नांव. |
|---|---|---|---|
| चैत्र | चित्रा. | आश्विन | अश्विनी. |
| वैशाख | विशाखा. | कार्तिक | कृत्तिका. |
| ज्येष्ठ | ज्येष्ठा. | मार्गशीर्ष | मृगशीर्ष. |
| आषाढ | उत्तराषाढा. | पौष | पुष्य. |
| श्रावण | श्रवण. | माघ | मघा. |
| भाद्रपद | पूर्वाभाद्रपदा. | फाल्गुन | उत्तराफाल्गुनी. |

पण नेहमीच ही स्थिति असते असें नाहीं. कधीं कधीं दोन किंवा तीन नक्षत्रेंसुद्धां पौर्णिमेच्या मागेंपुढें होतात. ही नक्षत्रांची अनियमित स्थिति ज्योतिष्यांच्या ध्यानीं आल्यावरून त्यांनीं माससंज्ञेचा दुसरा एक असा नियम बांधिला कीं,

मीनादिस्थो रविर्येषामारंभे प्रथमे क्षणे ।
भवेत्तेऽब्दाश्चांद्रमासाश्चैत्राद्या द्वादश स्मृताः ॥ ४१ ॥

म्हणजे ज्या चांद्रमासाची शुक्ल प्रतिपदा मीन संक्रांतीत सूर्य असतांना होईल तो चैत्र. ज्याची मेष संक्रांतीत होईल तो वैशाख. याप्रमाणें चैत्रादि द्वादश मासांविषयीं जाणावें. पण याचा अर्थ असा मात्र कोणीं समजूं नये कीं, त्या प्रतिपदेच्या आरंभक्षणींच त्या त्या संक्रांतीचा उदय झाला पाहिजे, किंवा संपूर्ण मासपर्यंत तीच संक्रांत असली पाहिजे. केवळ त्या महिन्याची प्रतिपदा वरील नियमाप्रमाणें त्या त्या संक्रांतीत असावी म्हणजे झालें. मग प्रतिपदेच्या दुसऱ्या दिवशीं सूर्य पुढील राशींत जात असला तरी चालेल.

## चांद्रमास.

'चैत्रादिसंज्ञाश्चांद्राणां मासानां संप्रकीर्तिताः ।
व्रतयज्ञादिकं चांद्रे मासे परिणयः क्वचित् ॥ ४२ ॥
चांद्रस्तु द्विविधो मासो दर्शांतः पौर्णिमांतिमः ।
देवार्थे पौर्णमास्यंतो दर्शांतः पितृकर्मणि ॥ ४३ ॥

आपले चैत्र, वैशाख इत्यादि वर सांगितलेले बारा महिने हेच चांद्रमास होत व्रतें, हवनें, शांति, विवाह इत्यादि धर्मशास्त्रांतील बहुतेक कृत्यें सांप्रत चांद्रमासाप्रमाणेंच होतात. चांद्रमास दोन प्रकारचे आहेत. एक पूर्णिमांत मास आणि दुसरा अमांत मास. एका पूर्णिमेपासून दुसऱ्या पूर्णिमेपर्यंत जो महिना मोजितात, तो पूर्णिमांत मास; आणि एका अमावास्येपासून दुसऱ्या अमावास्ये-

पर्यंत जे तीस दिवस, तो अमांत मास होय. पूर्णिमांत मास देवकार्यास उत्तम मानिलेला आहे, म्हणून कार्तिकस्नान किंवा माघस्नान वगैरे पूर्णिमांत मासाप्रमाणे करितात, म्हणजे आश्विनकृष्ण प्रतिपदेपासून कार्तिकशुक्ल पूर्णिमेपर्यंत कार्तिक महिना समजतात. याचप्रमाणे इतर मासाविषयीं समजावें. आतां चैत्र, वैशाख इत्यादि महिन्याला चांद्रमास म्हणतात त्याचें कारण असें आहे कीं, हे महिने चंद्राच्या गतीवरून आपणास समजतात. चंद्राच्या कलांचा पूर्ण क्षय होऊन ज्या रात्रीं चंद्र आपल्या दृष्टीस पडत नाहीं, त्या रात्रीपासून पुनः तो तसा दिसेनासा होईपर्यंत, म्हणजे एका अमावास्येपासून दुसऱ्या अमावास्येपर्यंत, अथवा चंद्राच्या कलांची पूर्ण वृद्धि होऊन ज्या रात्रीं चंद्र आपणास पूर्ण दिसतो, त्या रात्रीपासून पुनः तो आपणाला पूर्ण दिसेपर्यंत, म्हणजे एका पूर्णिमेपासून दुसऱ्या पूर्णिमेपर्यंत मध्यें जे तीस दिवस जातात, त्यासच आपण एक महिना समजतों. हें आपणास चंद्राच्या योगानें समजतें म्हणून त्याचें नांव चांद्रमास. चांद्रमासाचे दिवस म्हणजे तिथि आपण तीस धरतों; परंतु वास्तविक त्या २९॥ असतात. ह्याप्रमाणें बारा चांद्रमासांचें म्हणजे एका चांद्रवर्षाचे ३५४ दिवस भरतात.

## सौरमास.

मेषादि सौरमासास्ते भवति रविसंक्रमात् ।
मधुश्च माधवश्चैव शुक्र शुचिरथो नभ ॥ ४४ ॥
नभस्यश्चेष ऊर्जश्च सहश्चाथ सहस्यक ।
तपस्तपस्य क्रमतः सौरमासा प्रकीर्तिता ॥ ४५ ॥
सौरो मासो विवाहादौ यज्ञादौ सावन स्मृत ।
आब्दिके पितृकार्ये च चान्द्रो मास प्रशस्यते ॥ ४६ ॥

जे मास सूर्याच्या गतीच्या अनुरोधानें मोजले जातात त्यास सौरमास म्हणतात. मागें मेषादिक ज्या बारा संक्रांति सांगितल्या आहेत तेच बारा सौरमास होत. पण त्यांच्या संज्ञा निराळ्या आहेत. त्या येणेंप्रमाणें —१ मधु २ माधव ३ शुक्र ४ शुचि ५ नभ ६ नभस्य ७ इष ८ ऊर्ज ९ सह १० सहस्य ११ तप १२ तपस्य. पण व्यवहारात मधुमास किंवा माधवमास असें कोणी म्हणत नाहीं. मेष संक्रांत किंवा वृषभ संक्रांत असेंच म्हणतात. ह्या बारा सौरमासांचे दिवस सारखे नसतात. एकाद्या महिन्याचे तीस आणि एकाद्या महिन्याचे एकतीस असतात. बारा सौरमास मिळून स्थूल मानानें एका सौरवर्षाचे ३६५ दिवस भरतात. बंगाल्यात व मलबारांत व्यवहारांत सौरमासच धरितात. आपलीं विवाहादि धर्मकृत्यें सौरमासाप्रमाणें व्हावीं पाहिजेत पण हल्लीं तीं चांद्र

मासप्रमाणेंच होतात. पितृकार्याला मात्र चांद्रमास प्रमाण धरिलेला आहे. यज्ञयागादि कर्में सावनमासाप्रमाणें करावीं.

## सावन व नाक्षत्रमास.

त्रिंशद्दिनैः सावनिको नाक्षत्रो विधुभभ्रमात् ।

पूर्ण तीस दिवसांचा जो एक महिना त्यास सावनमास म्हणतात. बारा सावनमास मिळून एका सावनवर्षाचे दिवस ३६० भरतात.

अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस नक्षत्रें चंद्राला भोगण्यास लागणारा जो काळ त्यास नाक्षत्रमास म्हणतात. नाक्षत्रमासाचे दिवस २७ असतात.

## अधिकमास.

असंक्रांतिर्मांतो यो मासश्चेत्सोधिमासकः ।
मलमासाह्वयो ज्ञेयः प्रायश्चैत्रादिसप्तसु ॥ ४७ ॥
द्वात्रिंशद्भिर्गतैर्मासैर्दिनैः षोडशभिस्तथा ।
घटिकानां चतुष्केण पतत्यधिकमासकः ॥ ४८ ॥

चांद्रमान किंवा सौरमान या दोहोंचा मेळ असावा, म्हणून मध्यें ज्या एकाद्या अमांत महिन्यांत संक्रांत गणली जात नाहीं, त्या महिन्याला अधिकमास किंवा मलमास म्हणतात. चैत्रापासून आश्विनापर्यंत जे सात महिने त्यांपैकींच बहुत-करून एकादा अधिकमास असतो. क्वचित् फाल्गुन पण येतो. माघमास मात्र कधीं अधिकमास किंवा क्षयमास नसतो. स्थूलमानानें बत्तीस महिने, सोळा दिवस आणि चार घटिका इतका काळ गेल्यानंतर, म्हणजे दर तिसऱ्या वर्षी, अधिकमासाचा संभव होतो. एकदां आलेला अधिकमास प्रायः पुनः १९ वर्षांनीं येतो. अधिकमास धरण्याचें कारण असें आहे कीं, चांद्रवर्षाचे दिवस ३५४ व सौरवर्षाचे दिवस ३६५ असतात, म्हणजे चांद्रमानाचें वर्ष व सौरमानाचें वर्ष ह्या दोहोंत अकरा दिवसांचें अंतर असतें. हें अंतर भरून यावें व चांद्रवर्षाचा आणि सौरवर्षाचा मेळ असावा म्हणून सुमारें ३३ महिन्यांनीं एक अधिकमहिना धरितात. अधिक महिन्यास त्याच्या पुढील महिन्याचें नांव देतात. दर तीन वर्षांनीं येणारा अधिकमास शुभ कर्मांस वर्ज्य सांगितला आहे; परंतु ज्या वर्षी क्षयमास येतो, त्या वर्षी दोन अधिकमास येतात. त्यां-पैकीं क्षयमासापूर्वी येणारा जो अधिकमास, ज्याला संसर्प म्हणतात, तो शुभ कार्यास वर्ज्य नाहीं. मागाहून येणाऱ्या अधिकमासास अंहस्पति म्हणतात, तो मात्र शुभ कार्यास वर्ज्य आहे.

## अधिकमास काढण्याची रीति.

शाकोर्कघ्नोंकभूतष्टो क्षाल्पोभूनो दशाल्पकः ।
घूनश्चेन्नात्स एवाधिमासो नैवान्यथा भवेत् ॥ ४९ ॥

शालिवाहनशकास बारांनीं गुणून त्या गुणाकारास एकोणिसांनीं भागावें. आणि शेवटीं जी बाकी राहील ती जर नऊ किंवा नवांच्या आंतील एखादा अंक असेल तर त्या वर्षी अधिकमास पडेल असें समजावें. तसेंच, चैत्रादि बारा महिन्यांतून कोणता महिना अधिकमास होईल हें समजण्याची रीति अशी आहे कीं, भागाकाराची बाकी जर पांच किंवा पांचापेक्षां अधिक असेल तर त्यातून दोन वजा करावे, आणि पांच अंकांच्या आंत असेल तर एक वजा करावा. बाकी जो अंक राहील तो चैत्रापासून मोजून अधिकमास समजावा. उदाहरणार्थ, शके १८३४ या वर्षी अधिकमासाचा संभव आहे कीं नाहीं व असेल तर कोणता अधिकमास येईल हें सिद्ध करावयाचें आहे, म्हणून वरील रीतीप्रमाणें १८३४ ×१२=२२००८−१९=११५८ भागाकाराची बाकी ६ राहिली. ही बाकी नऊ अंकाच्या आंत आहे म्हणून १८३४ या वर्षी अधिकमास आहे हें प्रथम निश्चित झालें. तसेंच, बाकी ६ राहिली आहे, याकरितां रीतीप्रमाणें त्यातून २ वजा करितां बाकी ४ राहिली. म्हणून चैत्रापासून चवथा महिना जो आषाढ तो अधिकमास होईल. तथापि ही रीति स्थूलमानाची आहे. या रीतीनें कधीं कधीं थोडा फरक पडतो; उदाहरणार्थ, शके १८३१ या वर्षी वरील रीतीनें भाद्रपद [illegible] अधिकमास येतो पण या वर्षी सूक्ष्म गणितानें श्रावण अधिकमास आला होता. म्हणून शके १८३४ पासून पुढील शंभर वर्षांतील अधिकमासांचें कोष्टक खालीं दिलें आहे.

## अधिकमासाचें कोष्टक.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १८३१ श्रावण | १८३४ आषाढ | १८३७ वैशाख | १८३९ भाद्रपद | १८४२ श्रावण |
| १८४५ ज्येष्ठ | १८४८ चैत्र | १८५० श्रावण | १८५३ आषाढ | १८५६ वैशाख |
| १८५८ भाद्रपद | १८६१ श्रावण | १८६४ ज्येष्ठ | १८६७ चैत्र | १८६९ श्रावण |
| १८७२ आषाढ | १८७५ वैशाख | १८७७ भाद्रपद | १८८० श्रावण | १८८३ ज्येष्ठ |
| १८८६ चैत्र | १८८८ श्रावण | १८९१ आषाढ | १८९४ वैशाख | १८९६ भाद्रपद |
| १८९९ आषाढ | १९०२ ज्येष्ठ | १९०४ आश्विन | १९०७ श्रावण | १९१० ज्येष्ठ |
| १९१३ वैशाख | १९१५ भाद्रपद | १९१८ आषाढ | १९२१ ज्येष्ठ | १९२३ आश्विन |
| १९२६ श्रावण | १९२९ ज्येष्ठ | १९३२ वैशाख | १९३४ भाद्रपद | १९३७ आषाढ |

ह्यांशिवाय क्षयमासामुळें शके १८९५ आणि १९०४ या वर्षी अनुक्रमें आश्विन व फाल्गुन हे अधिकमास होतील.

## क्षयमास.

द्विसंक्रांति क्षयाख्यः स्यात् कदाचित् कार्तिकत्रये ।
युग्माख्ये सतु तत्राब्दे ह्यधिमासद्वयं भवेत् ॥ ५० ॥

एका महिन्यांत दोन संक्रांति येतात तेव्हां क्षयमास होतो. कार्तिक, मार्गशीर्ष किंवा पौष या तीन महिन्यांपैकींच एखादा क्षयमास असतो. याचें कारण असें आहे कीं, या तीन महिन्यांत सूर्याची गति शीघ्र असते, म्हणून वृश्चिक, धन आणि मकर या तीन राशि चालून जाण्यास सूर्यास नेहमींप्रमाणें तीस दिवस न लागतां कमी काळ पुरतो. अशा वेळेस एका महिन्यांत दोन संक्रांति येण्याचा संभव कधीं कधीं असतो, म्हणून क्षयमास होतो. क्षयमास येतो तेव्हां क्षयमासाच्या पूर्वी एक, आणि क्षयमासानंतर एक, असे दोन अधिक महिने येतात, व त्या वर्षी तेरा महिन्यांचें वर्ष असतें. क्षयमास एकदां येऊन गेला म्हणजे बहुतकरून १४१ वर्षांनीं किंवा १९ वर्षांनीं पुनः येतो. मागें शके १७४४ या वर्षी मार्गशीर्ष क्षयमास आला होता; आतां पुढें शके १८८५ आणि १९०४ या वर्षी अनुक्रमें मार्गशीर्ष व पौष हे क्षयमास होतील.

## तिथि.

प्रतिपच्च द्वितीया च तृतीया तदनंतरं ।
चतुर्थी पंचमी षष्ठी सप्तमी चाष्टमी तथा ॥ ५१ ॥
नवमी दशमी चैकादशी च द्वादशी ततः ।
त्रयोदशी ततो ज्ञेयास्ततः प्रोक्ता चतुर्दशी ॥ ५२ ॥
पौर्णिमा शुक्लपक्षे सा कृष्णपक्षेत्वमा स्मृता ।
अन्योन्यं चंद्रसूर्यौ तौ यदा तद्दर्श उच्यते ॥ ५३ ॥

तिथि तीस आहेत. १ प्रतिपदा, २ द्वितीया, ३ तृतीया, ४ चतुर्थी, ५ पंचमी, ६ षष्ठी, ७ सप्तमी, ८ अष्टमी, ९ नवमी, १० दशमी, ११ एकादशी, १२ द्वादशी, १३ त्रयोदशी, १४ चतुर्दशी, १५ पौर्णिमा आणि ३० अमावास्या. पौर्णिमेच्या पुढल्या म्हणजे सोळाव्या तिथीस षोडशी किंवा सतराव्या तिथीस सप्तदशी अशीं नांवें नसून प्रतिपदा, द्वितीया असेंच म्हणण्याची चाल आहे. तिसाव्या तिथीस मात्र अमावास्या किंवा दर्श म्हणतात.

तिथि ह्या मुख्यत्वेंकरून चंद्राच्या गतीवर अवलंबून आहेत. चंद्र व सूर्य हे महिन्यांतून एकदां एके ठिकाणीं जमतात. ज्या दिवशीं ते एकत्र असतात त्या

दिवसास अमावास्या म्हणतात. अमा म्हणजे एकत्र आणि वस् म्हणजे राहणें असा अमावास्येचा अर्थ आहे. चंद्र आणि सूर्य एकत्र मिळाल्यानंतर दोघेही चालत असतात. चंद्राची गति सूर्यापेक्षां फार जलद असल्यामुळें चंद्र नेहमीं सूर्यापुढें जात असतो. प्रत्येक बारा अंश सूर्यापुढें जाण्यास चंद्रास लागणारा जो काळ त्याच तिथि होत. उदाहरणार्थ, अमावास्येस चंद्रसूर्य एके ठिकाणीं जमून नंतर दोघेही चालूं लागले असें समजा. चंद्र वेगानीनें सूर्यापुढें जाऊं लागला कीं, पहिल्या तिथीस म्हणजे प्रतिपदेस आरंभ झाला. पूर्ण बारा अंश सूर्यापुढें चंद्र गेला कीं प्रतिपदा संपली. बारा अंशांच्या पलीकडे गेला कीं द्वितीयेस आरंभ झाला, व हे दुसरे बारा अंश संपले कीं द्वितीया संपून तृतीयेस आरंभ झाला. याप्रमाणें इतर तिथींचें जाणावें. एका तिथीचे बारा अंश म्हणजे ३० तिथींचे ३६० अंश होतात.

## तिथींच्या संज्ञा.

*नंदा भद्रा जया रिक्ता पूर्णाख्य तिथयः क्रमात् ।*
*वारत्रयं समावर्त्य तिथयः प्रतिपन्मुखाः ॥ ५४ ॥*

नंदा, भद्रा, जया, रिक्ता, आणि पूर्णा अशा तिथींच्या पांच संज्ञा आहेत. ह्याच संज्ञा प्रतिपदेपासून अनुक्रमानें पुनः पुनः येतात. जसें, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी ह्या नंदा तिथि होत. द्वितीया, सप्तमी, द्वादशी ह्या भद्रा तिथि ह तृतीया, अष्टमी, त्रयोदशी ह्या जया तिथि होत. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी रिक्ता आणि पंचमी, दशमी आणि पूर्णिमा ह्या पूर्णा तिथि होत.

## शुभाशुभतिथि.

*द्वितीया पंचमी चैव तृतीया सप्तमी तथा ।*
*दशम्येकादशी कृष्णा प्रतिपच्च त्रयोदशी ॥ ५५ ॥*
*पौर्णिमा तिथयो ह्येताः सर्वकार्यशुभावहाः ।*
*अन्यास्तु तिथयो नेष्टाः प्रोकरुत्यशुभा मताः ॥ ५६ ॥*

दोन्ही म्हणजे शुक्ल व कृष्ण पक्षांतील द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, दशमी, एकादशी, प्रतिपदा, ( ही फक्त कृष्णपक्षांतील ) त्रयोदशी आणि पौर्णि ह्या तिथि सामान्यतः सर्व शुभ कार्यांला उक्त आहेत. यांशिवाय ज्या या तिथि राहिल्या त्या म्हणजे चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी, चतुर्दशी अ अमावास्या ह्या अशुभ तिथि होत. तथापि संकटकाळीं पुढें सांगितल्याप्रम आरंभाच्या कांहीं घटिका सोडून ह्या तिथींवर शुभकृत्यें करावीं.

## अशुभ तिथींच्या त्याज्य घटिका.

वेदषड्वसुनंदार्कशक्रेषु तिथिषु त्यजेत् ।
वसुनंदेंद्रतत्त्वाशापंचनाड्यः क्रमात्सदा ॥ ५७ ॥
कृष्णा चतुर्दशी शुक्ला प्रतिपद्दर्शसंज्ञिकाः ।
एताः शुभेषु कार्येषु वर्जनीयाः प्रयत्नतः ॥ ५८ ॥

चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी आणि शुक्ल चतुर्दशी ह्या तिथींवर कोणतेंही कृत्य करावयाचें असेल तर त्या तिथींच्या अनुक्रमानें पहिल्या आठ, नऊ, चवदा, पंचवीस, दहा आणि पांच घटिका सोडाव्या. म्हणजे चतुर्थीच्या आरंभापासून पहिल्या आठ घटिका, षष्ठीच्या नऊ घटिका, अष्टमीच्या चवदा घटिका नवमीच्या पंचवीस, द्वादशीच्या दहा आणि चतुर्दशीच्या ( शुक्ल ) पांच घटिका सोडून बाकी राहिलेल्या तिथींवर शुभकार्यें करावीं. कृष्ण पक्षांतील चतुर्दशी, शुक्ल प्रतिपदा आणि अमावास्या ह्या तिथि मात्र संपूर्ण वर्ज्य कराव्या.

## तिथींची क्षयवृद्धि.

मागें सांगितलेंच आहे कीं चांद्रवर्षाचे दिवस ३५४ असतात, व तिथि ३६० असतात. याचा अर्थ असा कीं, ३५४ दिवसांत ३६० तिथि पुऱ्या होतात. म्हणजे सहा तिथींचें अंतर क्षयवृद्धि होऊन निघून जातें. ज्या वेळेस तिथींचें प्रमाण साठ घटिकांपेक्षां ज्यास्त असतें, त्या वेळेस तिथीची वृद्धि होते व साठ घटिकांपेक्षां कमी असतें त्या वेळेस तिथीचा क्षय होतो. वृद्धि म्हणजे वाढणें आणि क्षय म्हणजे कमी होणें.

वृद्धीचें उदाहरण. प्रतिपदा रविवारीं ५७ घटिका आहे असें समजा. म्हणजे रविवारीं सूर्योदयापासून इतका काळ गेल्यानंतर प्रतिपदा संपून द्वितीयेस आरंभ झाला. द्वितीयेचें प्रमाण ६५ घटिका आहे, अशी कल्पना करा. म्हणजे प्रतिपदेनंतर चंद्राला बारा अंश सूर्यापुढें जाण्यास इतका काळ लागला. तेव्हां प्रतिपदा संपल्यानंतर रविवारच्या राहिलेल्या ३ घटिका, सोमवारच्या सर्व दिवसाच्या ६० घटिका व मंगळवारीं सूर्योदयानंतर २ घटिका, अशा एकंदर ६५ घटिका जातील तेव्हां द्वितीया संपेल. या उदाहरणांत सोमवारीं व मंगळवारीं अशी दोन दिवस सूर्योदयीं द्वितीया असल्यामुळें पंचांगांत दोन दिवस लिहिली पाहिजे, म्हणून येथें द्वितीयेची वृद्धि झाली.

क्षयतिथीचें उदाहरण. रविवारीं २ घटिका प्रतिपदा आहे अशी कल्पना करा. नंतर द्वितीया लागली. द्वितीयेचें प्रमाण फक्त ५४ घटिका आहे, म्हणजे प्रतिपदेनंतर चंद्राला बारा अंश सूर्यापुढें जाण्यास इतकाच काळ पुरला. रविवारीं

प्रतिपदेच्या २ घटिका व द्वितीयेच्या ५४ घटिका असा एकंदर सूर्योदयापासून ५६ घटिका काळ गेल्यानंतर म्हणजे दुसऱ्या दिवसाचा सूर्योदय होण्यापूर्वीच तृतीया लागली. या उदाहरणात रविवारीं प्रतिपदा व सोमवारीं तृतीया लिहावी लागेल. द्वितीया सूर्योदयाला कोणत्याही दिवशीं नव्हती, म्हणून ती पंचांगांत दाखविण्याचे कारण नाहीं. कारण सूर्योदयीं जी तिथि किंवा नक्षत्र वगैरे असतें तेंच पंचांगांत दाखवितात. येथें द्वितीयेचा क्षय झाला, म्हणजे द्वितीया मुळींच नाहीं असा अर्थ नव्हे, तर ती-सूर्योदयाला मात्र कोणत्याही दिवशीं नव्हती इतकेंच.

## तिथींच्या क्षयवृद्धींचा दोष.

तिथीनां त्रितयं वारमेकं स्पृशति यत्र वै।
अवमं तद्दिनं ज्ञेयं शुभकार्येषु संत्यजेत् ॥ ५९ ॥
वाराणां त्रितयं यत्र तिथिमेकां स्पृशेद्यदा।
वृद्धिस्पृक् चेति सा ख्याता न ग्राह्या मंगलादिषु ॥ ६० ॥

कोणत्याही तिथीचा क्षय होतो तेव्हां एका वारीं तीन तिथि असतात. आणि वृद्धि होते तेव्हां तीन वारीं एक तिथि असते. वर क्षयतिथीचें उदाहरण दिलें आहे, त्यांत रविवारीं प्रथम २ घटिका प्रतिपदा, नंतर ५४ घटिका द्वितीया आणि नंतर ४ घटिका तृतीया होती, म्हणजे रविवाराला प्रतिपदा, द्वितीया आणि तृतीया अशा तीन तिथींचा स्पर्श झाला. तसेंच, वृद्धीचें उदाहरण पहा. प्रतिपदा रविवारीं १ घटिका, सोमवारचा सर्व दिवस आणि मंगळवारच्या २ घटिका याप्रमाणें रविवार, सोमवार आणि मंगळवार अशा तीन वाराला प्रतिपदेचा स्पर्श झाला. म्हणून एका वारीं तीन तिथि किंवा तीन वारीं एक तिथि असा तिहींचा संबंध असल्यामुळें धर्मशास्त्रकारांनीं क्षयवृद्धीचे दिवस शुभकार्याला वर्ज्य मानिले आहेत.

## पक्ष.

शुक्लकृष्णावुभौ पक्षौ दैवे पित्र्ये च कर्मणि।
माह्यौ तथा शुभं सर्वं शुक्लपक्षे प्रशस्यते ॥
आदौ शुक्लः प्रवक्तव्यः केचित्कृष्णोपि मासकम् ॥ ६१ ॥

महिन्याच्या तिथि तीस असतात हें मागें सांगितलेंच आहे. पंधरा तिथींचा एक भाग असे तीस तिथींचे म्हणजे महिन्याचे दोन भाग कल्पिलेले आहेत. त्यांस पक्ष किंवा पंधरवडे म्हणतात. एक शुक्ल म्हणजे चांदण्याचा पक्ष, व दुसरा कृष्ण म्हणजे काळोखाचा पक्ष. प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत जे पंधरा दिवस तो शुक्लपक्ष, व पौर्णिमेनंतर अमावास्येपर्यंत जे पंधरा दिवस तो कृष्णपक्ष. शुक्लप-

क्षांतील प्रत्येक तिथीस रात्रीच्या आरंभापासून चंद्रोदय होऊन तिथीच्या दुपटी-इतक्या घटिकांपर्यंत चांदणें असतें. उदाहरणार्थ, प्रतिपदेस दोन घटिका चांदणें असतें. द्वितीयेस चार घटिका, अष्टमीस सोळा घटिका, आणि पूर्णिमेस तीस घटिका म्हणजे सारी रात्र चांदणें असतें. या वेळेस चंद्राच्या कला पूर्ण होतात. नंतर कृष्णपक्षास आरंभ झाला म्हणजे प्रत्येक तिथीस चंद्राचें चांदणें दोनदोन घटिका कमी होत जातें; म्हणजे रोज तिथीच्या दुपटीइतक्या घटिका उशीरां चंद्र उगवतो. उदाहरणार्थ, प्रतिपदेस दोन घटिका रात्रीं, चतुर्थीस आठ घटिका रात्रीं, अष्टमीस सोळा घटिका रात्रीं चंद्रोदय होऊन चांदणें पडतें, व अमावास्येस सारी रात्र काळोख असतो. यावरून हें स्पष्ट झालें कीं, शुक्लपक्षांत तिथींच्या दुपटीइतक्या घटिकांस रात्रीं चंद्र मावळतो, आणि कृष्णपक्षांत पूर्णिमेपासून गेलेल्या तिथींच्या दुपटीइतक्या घटिकांनीं तो रात्रीं उगवतो. उदाहरणार्थ, शुक्ल अष्टमीस सोळा घटिका रात्रीं चंद्र मावळतो, आणि कृष्ण अष्टमीस सोळा घटिका रात्रीं तो उगवतो. याचें कारण मागें सांगितलेंच आहे कीं, प्रत्येक तिथीस चंद्र बारा अंश पुढें जातो म्हणजे आजच्या तिथीस जेथें तो उगवेल त्या वेळच्या बारा अंश मागाहून उद्यां उगवेल हें स्पष्ट आहे. पृथ्वीला आपणा-सभोंवतीं फिरण्यास ६० घटिका लागतात या हिशेबानें १२ अंशांला म्हणजे एका तिथीला २ घटिका पाहिजेत. शुक्लपक्षांत चंद्राच्या कलांची वृद्धि होत असल्या-मुळें रोज दोनदोन घटिका चांदणें अधिक पडतें व कृष्णपक्षांत क्षय होत असल्या-मुळें रोज रात्रीच्या आरंभींच्या दोन दोन घटिका चांदणें कमी पडतें.

नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशांत पूर्णिमान्त मास धरितात; म्हणजे आपण जसा आपला महिना अमावास्येस संपतो असें समजतों त्याप्रमाणें त्यांचा महिना पूर्णि-मेस संपतो असें ते समजतात. यावरून कित्येकांची अशी समजूत झालेली असते कीं, आपला जो शुक्लपक्ष तो त्या लोकांचा कृष्णपक्ष असतो. या म्हणण्याचा अर्थ असा झाला कीं, आमच्या येथें ज्या रात्रीं चांदणें त्या रात्रीं त्यांच्या प्रदेशांत काळोख. पण असें होणें अशक्य आहे. कारण ज्या रात्रीं एके ठिकाणीं चांदणें असेल त्या रात्रीं पृथ्वीच्या एका गोलार्धावर कोठेंही गेलें तरी चांदणेंच आढळेल. तेव्हां आमचा शुक्लपक्ष तो त्यांचा कृष्णपक्ष किंवा त्यांचा कृष्णपक्ष तो आपला शुक्लपक्ष कसा होईल? तसेंच, स्फटिकासारखें शुभ्र असें आल्हादजनक पौर्णिमेचें चांदणें पाहून कित्येक असें म्हणतांना आढळतात कीं, परमेश्वरानें प्रतिरात्रीं अशा चांदण्याची योजना कां केली नाहीं? परंतु, जसा प्रतिदिनीं सूर्याचा पूर्ण प्रकाश असतो त्याप्रमाणें, प्रतिरात्रीं जर चंद्राचें पूर्ण चांदणें असतें तर, आज ज्या असंख्य ताऱ्यांचा शोध लागला आहे, तो लागला असता काय? चंद्रप्रकाश असतांना बहुतेक तारे दिसत नाहींत हें जसें आपण पहातों तसेंच, अमावास्येच्या रात्रीं

अगणित तारे आपणांस दृष्टिगोचर होतात हें ही आपण पहातों. याशिवाय ही अशी व्यवस्था करण्यांत परमेश्वराचे दुसरे अनेक महत्वाचे हेतु असतील. तात्पर्य, ईश्वरकृति परिपूर्ण व निर्दोष आहे. तींत सुधारणेला लेशाही अवकाश नाहीं.

## वार.

आदित्यश्चंद्रमा भौमो बुधश्चाथ बृहस्पतिः ।
शुक्रः शनैश्चरश्चैव वासराः परिकीर्तिताः ॥ ६२ ॥
गुरुश्चंद्रो बुधः शुक्रः शुभा वाराः शुभे स्मृताः ।
क्रूरास्तु क्रूरकृत्येषु ग्राह्या भौमार्कसूर्यजाः ॥ ६३ ॥
वारदोषाश्च ये प्रोक्ता रात्रौ न प्रभवंति ते ।
शनिभौमार्कवारेषु विशेषादिति केचन ॥ ६४ ॥

'उदयादुदयंवारः' म्हणजे एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत मध्यें जाणारा जो काळ त्यास वार अशी संज्ञा आहे. हे वार सात आहेत त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें–१ आदित्यवार, रविवार किंवा भानुवार, २ सोमवार, इंदुवार किंवा चंद्रवार, ३ मंगळवार किंवा भौमवार, ४ बुधवार किंवा सौम्यवार, ५ बृहस्पतिवार किंवा गुरुवार, ६ शुक्रवार किंवा भृगुवार, ७ शनिवार किंवा मंदवार. पृथ्वीवर सर्व देशांत सातच वार असून ते याच अर्थाचे आहेत. एके ठिकाणीं जो वार असेल, तोच पृथ्वीवर कोठेंही गेलें तरी असेल. वाराला वासर असेंही म्हणतात. वर लिहिलेल्या सात वारांपैकीं सोमवार, बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार हे चार वार सर्व कार्यांत साधारणपणें शुभ मानिलेले आहेत. मंगळ आणि शनि हे क्रूर वार आहेत, म्हणून त्या वारांवर क्रूर कृत्यें मात्र करावीं. उदाहरणार्थ, शिकार करणें, शस्त्रप्रयोग, भेद, युद्ध इत्यादि. दुष्ट वाराचा दोष रात्रीं नसतो. शनि, भौम आणि रवि हे जरी क्रूर वार आहेत तरीही त्यांचा रात्रीं दोष नाहीं, असें कित्येक ग्रंथकार म्हणतात.

## वारांच्या नांवांची उत्पत्ति.

शनिर्जीवः कुजश्चैव रविः शुक्रबुधेन्दवः ।
एवं क्रमेण विज्ञेयाः कालहोरेश्वरा ग्रहाः ॥ ६५ ॥

दिवसाच्या प्रथम होऱ्याचें जें नांव तेंच त्या वाराचें नांव असतें. याचा स्पष्टार्थ असा आहे कीं, वारंवार ग्रहांचें आधिपत्य आहे. अहोरात्राचे २४ विभाग करून प्रत्येक विभागास होरा अशी संज्ञा दिलेली आहे. येथें समजुतीकरितां आपण होऱ्याला पाहिजे तर तास किंवा घटाक म्हणूं. पृथ्वीसभों-

वरी फिरणारे सात ग्रह हे त्या तासांचे किंवा होऱ्यांचे अधिपति मानिलेले आहेत. त्यांचा क्रम वरील श्लोकांत दिल्याप्रमाणें प्रथम शनि, नंतर त्याच्या खालीं अनुक्रमानें गुरु, मंगळ, रवि, शुक्र, बुध आणि चंद्र असा आहे. याच सात ग्रहांचे पुनः पुनः फेरे होतात. म्हणजे ग्रह ७ आणि अहोरात्राचे होरे २४ म्हणून अहोरात्रांत २४÷७=३ याप्रमाणें सात ग्रहांच्या तीन आवृत्त्या होऊन चवथ्या आवृत्तीचे तीन ग्रह होतात. ह्मणजे चवथ्या फेऱ्याचा चवथा ग्रह, जो दुसऱ्या दिवसाच्या पहिल्या होऱ्याचा किंवा तासाचा अधिपति असतो, तोच वार होय. उदाहरणार्थ, शनीपासून होऱ्याचा आरंभ धरिला म्हणजे त्यापासून चवथा रवि येतो, म्हणून शनीच्या पुढील रविवार होय. त्याचप्रमाणें रवीच्या पुढें चवथा चंद्र, चंद्रापासून चवथा मंगळ इत्यादि. वारांची उत्पत्ति होऊन सुमारें पांच हजार वर्षें झालीं असावीं, असें विद्वान् ज्योतिष्यांचें म्हणणें आहे. ऋग्वेदासारख्या प्राचीनतम ग्रंथांत ग्राह्य प्रमाणें वारांचीं नांवें आढळलीं तर वारांची उत्पत्ति याहूनही प्राचीन ठरेल.

## नक्षत्रें.

अश्विनी भरणी चैव कृत्तिका रोहिणी मृगः ।
आर्द्रा पुनर्वसुः पुष्यस्तथाश्लेषा मघा ततः ॥ ६६ ॥
पूर्वाफाल्गुनिका तस्मादुत्तराफाल्गुनी ततः ।
हस्तश्चित्रा तथा स्वाती विशाखा तदनंतरम् ॥ ६७ ॥
अनुराधा ततो ज्येष्ठा ततो मूलं निगद्यते ।
पूर्वाषाढोत्तराषाढा त्वभिजिच्छ्रवणस्ततः ॥ ६८ ॥
धनिष्ठा शततारारव्यं पूर्वाभाद्रपदा ततः ।
उत्तराभाद्रपाश्चैव रेवत्येतानि भानि च ॥ ६९ ॥

'न क्षरति तत् नक्षत्रं' जें ढळत नाहीं तें नक्षत्र. चंद्राच्या गतीचें प्रमाण

---

१ एशियाखंडातील तुर्कस्थानांत टैग्रिस नदीचे कांठीं मोसल नांवाचें शहर आहे. त्याचे समोरचे बाजूस जमिनीत निनेव्हे ( Nineveh ) नामक शहर सांपडलें, त्या वेळीं तेथें ज्या जुनाट वस्तु सांपडल्या, त्यांत तेथील सार्वजनिक पुस्तकालयांत एक ज्योतिःशास्त्रावरचा ग्रंथ सांपडला, त्याचें नांव "Observations of Bel." म्हणजे "बेल यानें केलेले वेध" असें असून त्याचे १० भाग आहेत. त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, रविवारापासून शनिवारापर्यंत ज्या क्रमानें हल्लीं वारांवर ग्रहांचें आधिपत्य आहे त्याप्रमाणें त्या वेळीं ख्रि॰ पू॰ सुमारें २५०० वर्षांचे सुमारास होतें.
—शि॰ बा॰ दप्तरदार.

ठरविण्याकरिता क्रांतिवृत्ताचे सत्तावीस विभाग कल्पिलेले आहेत त्या विभागां पैकीं प्रत्येक विभाग चालून जाण्यास चंद्रास लागणारा जो काळ त्यास नक्षत्र म्हणतात नक्षत्रें अर्थात् सत्तावीस आहेत त्यांचीं नावं —१ अश्विनी २ भरणी ३ कृत्तिका ४ रोहिणी ५ मृगशीर्ष ६ आर्द्रा, ७ पुनर्वसु ८ पुष्य ९ आश्लेषा १० मघा ११ पूर्वा किंवा पूर्वाफाल्गुनी १२ उत्तरा किंवा उत्तराफाल्गुनी १३ हस्त १४ चित्रा १५ स्वाती १६ विशाखा १७ अनुराधा १८ ज्येष्ठा १९ मूळ २० पूर्वाषाढा २१ उत्तराषाढा २२ श्रवण २३ धनिष्ठा २४ शततारका २५ पूर्वाभाद्रपदा २६ उत्तराभाद्रपदा २७ रेवती तिन्ही पूर्वा म्हणजे पूर्वा, पूर्वाषाढा आणि पूर्वाभाद्रपदा आणि तिन्ही उत्तरा म्हणजे उत्तरा, उत्तराषाढा आणि उत्तराभाद्रपदा असं समजावं तिथींची क्षयवृद्धि मागें सांगितली आहे, त्याप्रमाणच नक्षत्राची देखील क्षयवृद्धि कधीं कधीं होते

अभिजित् म्हणून एक अठ्ठाविसावं नक्षत्र आहे, त उत्तराषाढा आणि श्रवण याच्यामध्य मोजतात पंचांगात रोजचीं जीं चंद्राचीं नक्षत्रें दिलेलीं असतात, त्यात ह नसत याच कारण असें कीं, चंद्राच्या कक्षेंत म्हणज भ्रमणमार्गांत हं नसून त्याच्या अगदीं बाहेर म्हणजे उत्तरेकडे आहे सूर्यनक्षत्र ( ह्याविषयीं पुढें माहिती सांगितली आहे ) जीं पंचांगात दाखविलेलीं असतात त्यात ह दाखवितात, परतु इतर नक्षत्रातून फिरण्यास सूर्यास असे तेरा किंवा चवदा दिवस लागतात, त्याप्रमाण ह्या नक्षत्रांतून सूर्याला जाण्यास इतका काळ न लागतो फक्त चार साडेचार दिवस पुरतात म्हणजे अभिजित् नक्षत्राला आरभ झाल्यापासून सुमार चार दिवसांनीं दुसर सूर्यनक्षत्र लागतें अभिजित् नक्षत्राचा वास्तविक भोग्य काळ म्हणजे "वैश्व्यांत्यपाद श्रुत्याद्यतिथ्यंशाभिजिद्भवेत् । यत्राष्टा विंशतिर्भांना गण्योय यत्र नान्यथा ॥" वैश्व म्हणजे उत्तराषाढा नक्षत्राचा अंत्य चरण आणि श्रवण नक्षत्राचा पहिला पंधरावा अंश मिळून जितका काळ होईल, तितका धरावा आणि जेथ अठ्ठावीस नक्षत्रें घेण असतील तेथेंच अभिजित् नक्षत्र धरावं, अन्यत्र ह्याचें ग्रहण करू नये

## शुभाशुभ नक्षत्रें.

मघा मृगशिरो हस्त स्वाती मूलानुराधयो ।
रोहिणी रेवती चैव उत्तराणां त्रयं तथा ॥ ७० ॥
आवाहे च विवाहे च कन्यासंवरणे तथा ।
वापयेत्सर्वबीजानि गृहं ग्राम प्रवेशयेत् ॥ ७१ ॥
पुष्याऽश्विनी तथा चित्रा धनिष्ठा श्रवणं वसु ।
सर्वाणि शुभकार्याणि सिद्ध्यंत्येषु च भेषु च ॥ ७२ ॥

मघा, मृग, हस्त, स्वाती, मूळ, अनुराधा, रोहिणी, रेवती, उत्तरा, उत्तराषाढा आणि उत्तराभाद्रपदा अशीं अकरा नक्षत्रें कोणत्याही शुभ कार्याचे आरंभास, विवाहास, कन्या वरण्यास, शेतांत बीं पेरण्यास, कांहीं वस्तु संग्रह करण्यास, गृहप्रवेश आणि ग्रामप्रवेश करण्यास प्रशस्त मानिलीं आहेत. तसेंच अश्विनी, पुष्य, चित्रा, धनिष्ठा, श्रवण आणि पुनर्वसु हीं सहा नक्षत्रें देखील शुभ कार्यांस उक्त मानिलेलीं आहेत. परंतु त्या नक्षत्रांवर विवाह मात्र करूं नये. यांशिवाय राहिलेल्या नक्षत्रांपैकीं तिन्ही पूर्वा, ज्येष्ठा, आर्द्रा आणि शततारका हीं मध्यम नक्षत्रें होत. आणि भरणी, कृत्तिका, आश्लेषा हीं तीन नक्षत्रें अशुभ होत. म्हणून हीं शुभ कार्यांला सर्वथा वर्ज्य करावीं.

## नक्षत्रांच्या विशेष संज्ञा.

स्थिरनक्ष० ध्रुवस्थिरमिति ख्यातं रोहिणी चोत्तरात्रयम् ।
तत्रामरगृहग्रामाभिषेकाद्याः स्थिरक्रियाः ॥ ७३ ॥

चरनक्ष० श्रवणादित्रिभं स्वाती पुनर्वसु चरं चलम् ।
तस्मिन्वाजिगजारोहो वाटिका गमनादिकम् ॥ ७४ ॥

मृदुनक्ष० मृगचित्रानुराधा च रेवती मृदुमैत्रकम् ।
तत्र गीताम्बरक्रीडा मित्रकार्यविभूषणम् ॥ ७५ ॥

लघुनक्ष० पुष्याश्विन्यभिजिद्धस्तं लघुक्षिप्रमुदाहृतं ।
तस्मिन्पण्यरतिज्ञानं भूषौषधकलादिकं ॥ ७६ ॥

क्रूरनक्ष० क्रूरमुग्रमिति ख्यातं त्रिपूर्वाभरणी मघा ।
विषदाहाग्निघातादि तत्रच्छेदविनाशनं ॥ ७७ ॥

दारुणनक्ष० ज्येष्ठार्द्रामूलमाश्लेषा तीक्ष्णं दारुणमुच्यते ।
तत्र भेदोवधो बंधो मंत्रभूतादिसाधनं ॥ ७८ ॥

मिश्रनक्ष० विशाखाकृत्तिकाभ्यां मिश्रं साधारणं स्मृतं ।
वृषोत्सर्गाग्निकार्यं च मिश्रं तत्र च सिध्यति ॥ ७९ ॥

ध्रुव किंवा स्थिर नक्षत्रें:—रोहिणी आणि तिन्ही उत्तरा म्हणजे उत्तरा, उत्तराषाढा आणि उत्तराभाद्रपदा अशा चार नक्षत्रांस ध्रुव किंवा स्थिर नक्षत्रें म्हणतात. ह्या नक्षत्रांवर देवालय किंवा घर बांधणें, नवा गांव वसविणें, राज्याभिषेक, पाणवठ्यांचा करणें इत्यादि कृत्यें करावीं. तात्पर्य, फार दिवस टिकून राहणारीं अशीं सर्व कार्यें स्थिरनक्षत्रांवर करावीं.

चर किंवा चल नक्षत्रें:—श्रवण, धनिष्ठा, शततारका, स्वाती आणि पुनर्वसु. ह्या नक्षत्रांवर घोडा, हत्ती, इत्यादि वाहनांवर बसणें, उपवनांत विहारार्थ जाणें, इत्यादि कृत्यें करावीं.

मृदु किंवा मैत्र नक्षत्रें:—मृग, चित्रा, अनुराधा आणि रेवती. ह्यांवर गायन, क्रीडा, वस्त्रालंकार, मित्रकार्य, इत्यादि कृत्यें करावीं.

लघु किंवा क्षिप्र नक्षत्रें:—पुष्य, अश्विनी, अभिजित् आणि हस्त. ह्यांवर वस्तूंची देवघेव करणें मंत्रतंत्र शिकणें, चित्रें काढणें, इत्यादि कृत्यें करावीं.

क्रूर किंवा उग्र नक्षत्रें:—तिन्ही पूर्वा, भरणी आणि मघा. ह्यांवर शाठ्य किंवा क्रूर कृत्यें करावीं.

तीक्ष्ण किंवा दारुण नक्षत्रें:—ज्येष्ठा, आर्द्रा, आश्लेषा आणि मूळ. ह्यांवर जारणमारणकलहादि कृत्ये करावीं.

मिश्र किंवा साधारण नक्षत्रें:—विशाखा आणि कृत्तिका. ह्यांवर वृषोत्सर्ग, अग्निहोत्रादि कृत्यें करावीं.

याशिवाय नक्षत्रांला ऊर्ध्वमुख, अधोमुख, अंधलोचन, मध्यलोचन इत्यादि दुसऱ्या संज्ञा आहेत, त्यांविषयीं माहिती सांगतों.

## ऊर्ध्वमुखाधोमुखादि नक्षत्रें.

त्र्युत्तरा रोहिणी चैव पुष्यार्द्रा श्रवणत्रयम् ।
एतान्यूर्ध्वमुखान्यत्र प्रासादगृहतोरणम् ॥ ८० ॥
मूलाश्लेषामघापूर्वा विशाखा भरणीद्वयम् ।
अधोमुखानि भान्यत्र वापीकूपादि सिध्यति ॥ ८१ ॥
पुनर्वस्वनुराधाख्यं ज्येष्ठाहस्तत्रयं मृगः ।
रेवतीद्वितयं तिर्यग्वक्त्रमत्र रथादिकान् ॥ ८२ ॥

ऊर्ध्वमुख नक्षत्रें:—तिन्ही उत्त०, रोहि०, पुष्य, आर्द्रा, श्रव०, धनि०, शतता०.

अधोमुख नक्षत्रें:—मूळ, आश्ले०, मघा, तिन्ही पूर्वा, विशा० भर०, कृत्तिका०.

तिर्यङ्मुख नक्षत्रें:—पुनर्वसु, अनुराधा, ज्येष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, मृग, रेवती, अश्विनी.

ऊर्ध्वमुख नक्षत्रांवर घर, वाडा, देवालय वगैरे बांधणें; अधोमुख नक्षत्रांवर विहिरी, तळीं वगैरे खणणें आणि तिर्यङ्मुख नक्षत्रांवर गाडी, घोडा घेणें, नांगर करणें, वगैरे कृत्यें करावीं.

## नक्षत्रांच्या लोचनसंज्ञा.

अंधकं मंदनेत्रं च मध्यचक्षुः सुलोचनम् ।
रोहिणी गणयेत् पूर्वं साभिजिच्च पुनः पुनः ॥ ८३ ॥

हीं नक्षत्रें समजण्याची अशी रीति आहे कीं, रोहिणीनक्षत्रापासून मोजण्यास आरंभ करावा; जसें, प्रथम रोहिणी हें अंधलोचन, मृग हें मंदलोचन, नंतर

आर्द्रा हें मध्यलोचन आणि शेवटीं पुनर्वसु हें सुलोचन; ह्याच क्रमानें पुनःपुनः मोजीत जावें. हीं नक्षत्रें मोजतांना अभिजित् नक्षत्रसुद्धां मोजावें. खालीं ह्या नक्षत्रांचें कोष्टक दिलें आहे त्यावरून सर्व नक्षत्रांच्या लोचनसंज्ञा स्पष्ट कळतील.

| अंधनक्षत्रें. | मंदनक्षत्रें. | मध्यलोचननक्षत्रें. | सुलोचननक्षत्रें. |
|---|---|---|---|
| रोहिणी. | मृग. | आर्द्रा. | पुनर्वसु. |
| पुष्य. | आश्लेषा. | मघा. | पूर्वा. |
| उत्तरा. | हस्त. | चित्रा. | स्वाती. |
| विशाखा. | अनुराधा. | ज्येष्ठा. | मूळ. |
| पूर्वाषाढा. | उत्तराषाढा. | अभिजित्. | श्रवण. |
| धनिष्ठा. | शततारका. | पूर्वाभाद्रपदा. | उत्तराभाद्रपदा. |
| रेवती. | अश्विनी. | भरणी. | कृत्तिका. |

## पुष्यनक्षत्रवर्णन.

सिंहो यथा सर्वचतुष्पदानां तथैव पुष्यो बलवानुडूनां ॥
चंद्रे विरुद्धेप्यथ गोचरेऽपि सिध्यंति कार्याणि कृतानि पुष्ये ॥ ८४ ॥

ज्याप्रमाणें सर्व चतुष्पाद जनावरांत सिंह बळवान् अतएव श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें सर्व नक्षत्रांत पुष्यनक्षत्र श्रेष्ठ आहे. कोणत्याही कार्यसमयीं चवथा, आठवा किंवा बारावा, असा जरी स्वराशीला अनिष्ट चंद्र असेल, आणि त्या दिवशीं पुष्यनक्षत्र असेल, तरी अनिष्ट चंद्रामुळें कार्यास कोणत्याही प्रकारचें विघ्न न येतां पुष्यनक्षत्राच्या योगानें निश्चयपूर्वक कार्यसिद्धि होते. पुष्यनक्षत्र विवाहाला मात्र अनिष्ट मानिलें आहे.

## सूर्यनक्षत्रें.

पंचांगांत प्रत्येक तिथीस जीं नक्षत्रें लिहिलेलीं असतात, तीं चंद्राचीं नक्षत्रें आहेत; म्हणजे त्या नक्षत्रांजवळ त्या दिवशीं चंद्र असतो. ह्या नक्षत्रांस दिन किंवा दिवस नक्षत्रें असेंही म्हणतात. जशीं हीं चंद्राचीं, तशींच सूर्याचीं नक्षत्रें आहेत. सर्व नक्षत्रांतून सूर्य एका वर्षांत एकदा फिरतो. एका नक्षत्रांतून फिरण्यास सूर्याला तेरा किंवा चवदा दिवस लागतात, म्हणजे सुमारें तेरा चवदा दिवसांनीं प्रत्येक सूर्यनक्षत्र बदलतें. सूर्यनक्षत्राला महानक्षत्र असेंही नांव आहे. पंचांगांत सर्व कोष्टकांच्या बाहेर 'भरण्यर्कः' 'कृत्तिकार्कः' 'मृगार्कः' 'पुष्यर्कः' 'उत्तरार्कः' वगैरे जीं नक्षत्रें लिहिलेलीं असतात, तींच सूर्यनक्षत्रें होत. ह्या नक्षत्रांपैकीं ज्या नक्षत्रांजवळ सूर्य आला म्हणजे पाऊस पडतो, त्या नक्षत्रांस पावसाचीं नक्षत्रें असें म्हणतात. तीं आर्द्रापासून चित्रापर्यंत नऊ आहेत. कोणी

मृगापासून हस्तापर्यंत नऊ धरितात. हीं नऊ सूर्यनक्षत्रें मात्र पावसामुळें शेतकरी वगैरे सर्व लोकांस ठाऊक असतात. मृगनक्षत्र ज्या वारीं असतें, त्याच वारीं बहुतकरून पावसाचीं सर्व पुढील नक्षत्रें असतात.

ह्या पावसाच्या नऊ नक्षत्रांविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं, एका गृहस्थानें सत्तावीस नक्षत्रें मनांत आणून एका मुलाला विचारिलें, कीं सत्ताविसांतून नऊ गेले तर बाकी काय राहील? मुलानें, बाकी अठरा राहील, असें बरोबर उत्तर दिलें. तथापि तो गृहस्थ म्हणाला, "मुला, तूं चुकलास." नंतर त्या गृहस्थानें मुलाला समजावून सांगितलें. तो म्हणाला, "मुला, सत्ताविसांतून नऊ गेले तर बाकी मृत्तिका राहिली." याचा अर्थ असा कीं, सत्तावीस नक्षत्रांतून पावसाचीं नऊ नक्षत्रें फुकट गेलीं, म्हणजे जर पाऊस पडला नाहीं, तर जगांत मातीवांचून दुसरें काय सांपडणार!

## दिवसनक्षत्र काढण्याची रीति.

चैत्रादि द्विगुणं कृत्वा मिश्रितं तिथयो गताः ।
कारयेत् त्रीणि हीनं च शेषं दिवसभं ध्रुवं ॥ ८५ ॥

*ज्या महिन्यांतील नक्षत्र पाहिजे असेल त्या महिन्यासुद्धां चैत्रापासून सर्व महिने मोजून त्याची दुप्पट करावी; अधिक महिना असेल तर तोहि मोजावा.* नंतर ज्या तिथीचें नक्षत्र आपणास पाहिजे असेल, त्या तिथीचे अंक, महिन्याच्या दुप्पट केलेल्या अंकांत मिळवावे. कृष्णपक्षांतील तिथि असेल तर त्या तिथींत शुद्ध पक्षांतील पंधरा तिथि मिळवून नतर ते अंक महिन्याच्या दुप्पट केलेल्या अंकांत मिळवावे. *त्या बेरजेंतून तीन वजा करावे. बाकी जो अंक राहील तें* नक्षत्र जाणावें. बाकी राहिलेला अंक सत्ताविसापेक्षां ज्यास्त असेल तर त्यांतून सत्ताविस वजा करून जो अंक राहील, तें नक्षत्र समजावें. ही रीति सुमाराची असल्यामुळें ह्या रीतीनें कधींकधीं सुमारें पाव नक्षत्राचा म्हणजे पंधरावीस घटिकांचा फरक पडेल. परंतु हा फरक ज्या तिथीचें नक्षत्र पाहिजे असेल त्या तिथीपूर्वी त्या महिन्यांत एखाद्या तिथीची किंवा चालू नक्षत्रमालेपैकीं म्हणजे अश्विनी नक्षत्रापासून एखाद्या नक्षत्राची क्षयवृद्धि असेल तरच बहुधा पडतो. अशा वेळेस तिहींच्या जागीं दोन वजा केले तर हा फरक प्राय पडत नाहीं; तथापि ही रीति स्थूल मानाची आहे, हें ध्यानांत ठेवावें.

## नक्षत्रांचे स्वामी.

नासत्यांतकवह्निधातृशशभृद्रुद्रादितीज्योरगा
ऋक्षेशाः पितरो भगोर्यमरवित्वष्टानुगाश्च क्रमात् ॥

शक्राग्नीखलु मित्रशक्रनिर्ऋतिक्षीराणि विश्वे विधि-
गोविंदो वसु तोयपाजचरणाऽहिर्बुध्न्यपूषाभिधाः ॥ ८६ ॥

वरील श्लोकांत अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस नक्षत्रांचे स्वामी अनुक्रमें सांगितलेले आहेत ते येणेंप्रमाणें:—

| नक्षत्रें | स्वामी | नक्षत्रें | स्वामी | नक्षत्रें | स्वामी | नक्षत्रें | स्वामी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | –नासत्य | पुष्य | –गुरु | स्वाती | –वायु | अभिजित् | –विधि |
| भरणी | –यम | आश्लेषा | –सर्प | विशाखा | –इंद्राग्नी | श्रवण | –विष्णु |
| कृत्तिका | –अग्नि | मघा | –पितर | अनुराधा | –मित्र | धनिष्ठा | –वसु |
| रोहिणी | –धातर | पूर्वा | –भग | ज्येष्ठा | –इंद्र | शततारका | –वरुण |
| मृग | –चंद्र | उत्तरा | –अर्यमा | मूळ | –राक्षस | पू०भा० | –अजचरण |
| आर्द्रा | –रुद्र | हस्त | –रवि | पू०षाढा | –जल | उ०भा० | –अहिर्बुध्न्य |
| पुनर्वसु | –अदिति | चित्रा | –त्वष्टा | उ०षाढा | –विश्वेदेव | रेवती | –पूषा |

पुष्कळ ठिकाणीं नक्षत्रांच्या नांवाचा उपयोग न करितां त्या ऐवजीं त्यांच्या स्वामींच्या नांवानेंही नक्षत्रें व्यक्त करण्याचा परिपाठ आहे. असें, आश्लेषाबद्दल सर्प, रेवतीबद्दल पूषा इत्यादि

## योग.

योग म्हणजे चंद्रसूर्यांच्या विवक्षित गतींची बेरीज. नक्षत्रादिकांप्रमाणें आकाशांतील स्थिरतारांशीं योगांचा मात्र कांहीं संबंध नसतो असें दिसतें. हे योग सत्तावीस आहेत. त्यांचीं नांवें:—

विष्कंभः प्रीतिरायुष्मान् सौभाग्यः शोभनस्तथा ।
अतिगंडः सुकर्मा च धृतिः शूलस्तथैव च ॥ ८७ ॥
गंडो वृद्धिर्ध्रुवश्चैव व्याघातो हर्षणस्तथा ।
वज्रं सिद्धिर्व्यतीपातो वरीयान् परिघः शिवः ॥ ८८ ॥
सिद्धिः साध्यः शुभः शुक्लो ब्रह्मा ऐन्द्रोऽथ वैधृतिः ।
सप्तविंशतियोगानां स्वनामसदृशं फलम् ॥ ८९ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ विष्कंभ | ८ धृति | १५ वज्र | २२ साध्य |
| २ प्रीति | ९ शूल | १६ सिद्धि | २३ शुभ |
| ३ आयुष्मान | १० गंड | १७ व्यतीपात | २४ शुक्ल |
| ४ सौभाग्य | ११ वृद्धि | १८ वरीयान् | २५ ब्रह्मा |
| ५ शोभन | १२ ध्रुव | १९ परिघ | २६ ऐंद्र |
| ६ अतिगंड | १३ व्याघात | २० शिव | २७ वैधृति |
| ७ सुकर्मा | १४ हर्षण | २१ सिद्धि | |

## अशुभयोग.

वैधृतिव्यतिपाताख्यौ संपूर्णौ वर्जयेच्छुभे ।
वज्रविष्कंभयोश्चैव घटिकात्रयमादिकं ॥ ९० ॥
परिघार्धं पंच शूले व्याघाते घटिका नव ।
गंडातिगंडयोः षट् च हेयाः सर्वेषु कर्मसु ॥ ९१ ॥

वरील सत्तावीस योगांचीं त्यांच्या नांवाप्रमाणें फळें समजावीं. व्यतीपात व वैधृति हे दोन योग अगदीं अशुभ आहेत. ह्या योगांवर कांहींच शुभकार्य करूं नये. कांहीं योग असे आहेत कीं, त्यांच्या आरंभापासून कांहीं घटिकांपर्यंत मात्र त्यांचा दोष असतो. ते योग येणेंप्रमाणें. विष्कंभ आणि वज्र या योगांचा दोष आरंभापासून तीन घटिकांपर्यंत असतो. परिघयोगाच्या पूर्वार्धं संवेपर्यंत, शूलयोगाच्या पहिल्या पांच घटिकांपर्यंत, व्याघातयोगाच्या नऊ घटिकांपर्यंत आणि गंड आणि अतिगंड योगांच्या पहिल्या सहा घटिकांपर्यंत दोष असतो. म्हणून तेवढ्या घटिका सोडून त्या त्या योगांवर शुभकार्यें करण्यास कांहीं हरकत नाहीं.

## करणविचार.

तिथिं च द्विगुणीकृत्य एकहीनं च कारयेत् ।
सप्तभिश्च हरेद्भागं शेषं करणमुच्यते ॥ ९२ ॥
बवश्च बालवश्चैव कौलवस्तैतिलस्तथा ।
गरश्च वणिजो विष्टिः करणानि जगुर्बुधाः ॥ ९३ ॥
अंते कृष्णचतुर्दश्यां शकुनी दशभागयोः ।
ज्ञेयं चतुष्पदं नागं किंस्तुघ्नं प्रतिपद्दले ॥ ९४ ॥

करण म्हणजे तिथीचा अर्ध भाग, अर्थात् एका तिथींत दोन करणें भोगतात. तिथीच्या ज्या घटिका असतील त्यांची दुप्पट करून त्यांत एक कमी करावा. बाकी अंक राहतील त्यांस सातांनीं भागावें. जो अंक बाकी उरेल ते करण समजावें. करणें एकंदर अकरा आहेत. १ बव २ बालव ३ कौलव ४ तैतिल ५ गर ६ वणिज ७ विष्टि ८ शकुनी ९ चतुष्पाद १० नाग आणि ११ किंस्तुघ्न यांपैकीं शकुनी करण हें नेहमीं कृष्णचतुर्दशीच्या उत्तरभागांत मात्र येतें; इतर दिवशीं असत नाहीं. चतुष्पाद आणि नाग हीं फक्त अमावास्येच्या दिवशींच असतात. आणि किंस्तुघ्न हें नित्य शुक्लप्रतिपदेच्या पूर्वभागांत मात्र असतें. *शुक्लप्रतिपदेच्या उत्तर भागांत बव, पुढें द्वितीयेस बालव आणि कौलव, तृतीयेस* तैतिल आणि गर याप्रमाणें करणांची रीत स्थिर असते.

# नक्षत्रावरून चंद्र किंवा राशी पहाण्याची रीति.

सपादर्क्ष द्वयं भोगो मेषादीनामनुक्रमात् ॥

मागें सांगितलेंच आहे कीं, नक्षत्रें सत्तावीस आहेत व राशी बारा आहेत. अर्थात् सवादोन नक्षत्रें मिळून एक राशि होते. म्हणजे सवादोन नक्षत्रें संपत तोंपर्यंत चंद्र एकाच राशीस असतो. एकाद्या मनुष्याच्या जन्मकाळीं ज्या राशीस चंद्र असतो, तीच त्या मनुष्याची राशि (रास) होय असें समजावें. रोज कोणत्या राशीस चंद्र असतो, हें पंचांगांत शेवटच्या कोष्टकांत दाखविलेलें असतें. प्रत्येक नक्षत्राचे चार भाग म्हणजे चार चरण कल्पिलेले आहेत. चरणाला पाद अशीही संज्ञा आहे. उदाहरणार्थ, एक पाद म्हणजे पादनक्षत्र, द्विपाद म्हणजे अर्धनक्षत्र, त्रिपाद म्हणजे तीन चतुर्थांश नक्षत्र याप्रमाणें समजावें.

मेषोऽश्विनी च भरणी कृत्तिका प्रथमं दलम्[1] ।
त्रिः[2] कृत्तिका रोहिणी च मृगार्द्धं वृषभस्तथा ॥ ९५ ॥
मृगार्द्धार्द्रा पुनर्वस्व[3]स्त्रिपादमिथुनाभिधः ।
वेस्यंत्यचरणं[4] पुष्यो ह्यास्रेषा कर्कटाभिधः ॥ ९६ ॥
मघापूर्वोत्तरापादं सिंहराशिः प्रकीर्तितः ।
उत्तरा त्रितयं हस्तश्चित्रार्धं कन्यका स्मृतः ॥ ९७ ॥
चित्रार्धं स्वातिनक्षत्रं विशाखात्रितयं तुला ।
विशाखांत्यानुराधा च ज्येष्ठांतं वृश्चिकाभिधः ॥ ९८ ॥
मूलपूर्वोत्तराषाढा पादमेकं धनुः स्मृतम् ।
नैमः[5]त्र्युपादा श्रवणं धनिष्ठार्धं तथैव च ॥ ९९ ॥
कुंभो धनिष्ठा तारा[7] च पूभा[8]पादत्रयं यथा ।
पादं पूर्भा उंभा[9] रेवत्यंतं मीनः प्रकीर्तितः ॥ १०० ॥

---

१ प्रथम चरण. २ कृत्तिकेचे शेवटचे तीन चरण. ३ वसुः म्ह० पुनर्वसु. ४ विशाखेचा शेवटचा चरण. ५ मकर. ६ त्रि+उपादा म्ह० उत्तराषाढेचे तीन चरण. ७ शततारका. ८ पूर्वाभाद्रपदा. ९ उत्तराभाद्रपदा.

५ ज्यो.

| नक्षत्रें. | | नक्षत्रें. | | नक्षत्रें. | | चंद्र. |
|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | पूर्ण | भरणी | पूर्ण | कृत्तिका | १/४ | मेष |
| कृत्तिका | ३/४ | रोहिणी | पूर्ण | मृग | १/२ | वृषभ |
| मृग | १/२ | आर्द्रा | पूर्ण | पुनर्वसु | ३/४ | मिथुन |
| पुनर्वसु | १/४ | पुष्य | पूर्ण | आश्लेषा | पूर्ण | कर्क |
| मघा | पूर्ण | पूर्वा | पूर्ण | उत्तरा | १/४ | सिंह |
| उत्तरा | ३/४ | हस्त | पूर्ण | चित्रा | १/२ | कन्या |
| चित्रा | १/२ | स्वाती | पूर्ण | विशाखा | ३/४ | तूळ |
| विशाखा | १/४ | अनुराधा | पूर्ण | ज्येष्ठा | पूर्ण | वृश्चिक |
| मूळ | पूर्ण | पूर्वाषाढा | पूर्ण | उत्तराषाढा | १/४ | धन |
| उत्तराषाढा | ३/४ | श्रवण | पूर्ण | धनिष्ठा | १/२ | मकर |
| धनिष्ठा | १/२ | शततारका | पूर्ण | पूर्वाभाद्रपदा | ३/४ | कुंभ |
| पूर्वाभाद्र० | १/४ | उत्तराभाद्र | पूर्ण | रेवती | पूर्ण | मीन |

कोणत्या राशीस कोणतीं नक्षत्रें किती भुक्त होतात, हें वरील कोष्टकावरून ध्यानांत येईल. उदा० अश्विनी नक्षत्र पूर्ण, भरणी पूर्ण, आणि कृत्तिकेचा एक चरण अशीं सवादोन नक्षत्रें संपलीं, म्हणजे मेष राशीचा चंद्र संपला. याचप्रमाणे इतर राशींचें समजावें. तसेंच, एकाद्याचें जन्मनक्षत्र समजलें म्हणजे त्यावरून त्याची कोणती राशी असावी हेंही वरील कोष्टकावरून सहज समजेल.

## चंद्रबल किंवा शुभाशुभ चंद्र.

स्वजन्मराशिमारभ्य चंद्रराशिस्थितं फलम् ।
आद्ये चंद्रः श्रियं कुर्यान्मनस्तोषं द्वितीयके ॥ १०१ ॥

तृतीये धनसंपत्तिश्चतुर्थे कलहागमम् ।
पंचमे कार्यनाशश्च षष्ठे संपत्तिरुत्तमा ॥ १०२ ॥
सप्तमे राजसंमानं दुःखदं चाष्टमे तथा ।
नवमे च भयं क्षेयं दशमे मानसेप्सितम् ॥ १०३ ॥
एकादशे सर्वलाभं द्वादशे हानिमेव च ।
शुक्लपक्षे शशिः श्रेष्ठो द्विपंचनवमेष्वपि ॥ १०४ ॥

सर्व कार्यास चंद्रबल पहावें असें सांगितलें आहे, म्हणून ज्या दिवशीं आपल्याला कांहीं कार्य करावयाचें असेल किंवा कोठें जावयाचें असेल त्या दिवशीं ज्या राशीला चंद्र असेल त्या राशीपर्यंत आपल्या जन्मराशीपासून राशी मोजाव्या, आणि पुढें लिहिल्याप्रमाणें शुभाशुभ चंद्र समजावा. पहिला चंद्र असेल तर लक्ष्मी, दुसरा मनाला संतोष, तिसरा धनसंपत्ति देणारा, चवथा कलहोत्पादक, पांचवा कार्यनाशक, सहावा संपत्तिप्रद, सातवा राजमान देणारा, आठवा दुःख देणारा, नववा भयदायक, दहावा मनाची इच्छा पूर्ण करणारा, अकरावा सर्व लाभ करून देणारा आणि बारावा हानि करणारा, याप्रमाणें जाणावें. चवथा, आठवा, आणि बारावा चंद्र सर्व कार्यास वर्ज्य करावा. अकरावा चंद्र सर्वांत उत्तम मानिलेला आहे. शुक्लपक्षांतील दुसरा, पांचवा आणि नववा हे शुभचंद्र मानिलेले आहेत.

## कार्यपरत्वें इतर ग्रहांचें बल.

रविर्नृप विलोकने सुरगुरुर्विवाहोत्सवे ।
रणे धरणिनंदनो भृगुसुतः प्रयाणे बली ।
शनिश्च खलु दीक्षणे सकलशास्त्रबोधे बुधः
शशी सकलकर्मसु ध्रुवमुदा हृताः सूरिभिः ॥ १०५ ॥

राजदर्शनकालीं रवीचें, विवाहास गुरूचें, युद्धकार्यास मंगळाचें, प्रयाणकालीं शुक्राचें, मंत्रदीक्षाग्रहणास शनीचें, विद्यारंभास बुधाचें, व सर्व कार्यास चंद्राचें याप्रमाणें कार्यपरत्वें ग्रहबल असावें असें ऋषिमत आहे.

## अमृतसिद्धियोग.

रवौ हस्तो मृगश्चंद्रे गुरौ पुष्योऽश्विनी कुजे ।
अनुराधा बुधे शुक्रे रेवती रोहिणी शनौ ॥ १०६ ॥
अमृतः सिद्धियोगः स्यात्सर्वकार्यार्थसिद्धिदः ॥
यथा सूर्यस्तमो हंति दोषसंघांस्तथात्वयम् ॥ १०७ ॥

अमुक वारीं अमुक नक्षत्र आलें तरच अमृतसिद्धियोग होतो. असें, रविवारीं हस्त, सोमवारीं मृग, मंगळवारीं अश्विनी, बुधवारीं अनुराधा, गुरवारीं पुष्य, शुक्रवारीं रेवती आणि शनिवारीं रोहिणी सारीं लिहिलेला अपवाद खेरीज करून अमृतसिद्धियोग सर्व कार्यांस शुभ मानिलेला आहे

## अनिष्ट अमृतसिद्धियोग.

गुरुपुष्यं विवाहे च प्रयाणे शनिरोहिणीम्।
भौमाश्विनीं प्रवेशे च त्यजेदेतत्प्रयत्नत. ॥ १०८ ॥
पंचम्यादि तिथौ त्याज्या हस्तार्काद्याः क्रमाच्छुभे ।
योगश्चामृतसिद्धाख्यो अन्ये सर्वार्थसाधकाः ॥ १०९ ॥

गुरवारीं पुष्यनक्षत्राच्या योगानें झालेला अमृतसिद्धियोग विवाहास वर्ज्य करावा शनिवारीं रोहिणीनक्षत्रामुळे होणारा अमृतसिद्धियोग प्रयाणास वर्ज्य करावा आणि मंगळवारीं अश्विनीनक्षत्र आल्यानें जो अमृतसिद्धियोग होतो तो गृहप्रवेशास वर्ज्य करावा कारण हे योग अगदीं निंद्य मानिलेले आहेत तसेंच, आदित्यवारीं पंचमी, सोमवारीं षष्ठी, मंगळवारीं सप्तमी, बुधवारीं अष्टमी, गुरवारीं नवमी, शुक्रवारीं दशमी, आणि शनिवारीं एकादशी ह्या तिथि त्या त्या वारीं असून अमृतसिद्धियोग असेल तर तोही वर्ज्य करावा उदाहरणार्थ, रविवारीं हस्त नक्षत्र आलें तर प्रथम लिहिल्याप्रमाणे सर्व कार्यांला शुभ असा अमृतसिद्धियोग होतो खरा, पण त्याच दिवशीं पंचमी तिथि असेल तर तोच योग निंद्य होतो, याचप्रमाणें इतर वारतिथींविषयीं समजावें. हे अपवाद खेरीज करून बाकी सर्व अमृतसिद्धियोग शुभ होत.

## मृत्युयोग.

अनुराधा रवौ सोमे उत्तराषाढभं त्यजेत्।
बुधेऽश्विनी मृगो जीवे शुक्राश्लेषा शनौ करः ।
भौमे शततिभषक् चायं मृत्युयोगोऽर्थनाशकः ॥ ११० ॥

रविवारीं अनुराधा नक्षत्र आलें तर मृत्युयोग होतो. तसेंच, सोमवारीं उत्तराषाढा, मंगळवारीं शततारका, बुधवारीं अश्विनी, गुरवारीं मृगशिर, शुक्रवारीं आश्लेषा आणि शनिवारीं हस्त, असे योग आले म्हणजेही मृत्युयोग होतो. तो प्रयाणास शिवाय कोणत्याही शुभकार्यास वर्ज्य करावा.

## दग्धयोग.

द्वादश्यर्के विधौ रुद्रा भौमे पंच बुधेऽष्टम. ।
गुरौ षष्ठ्यष्टमी शुक्रे दग्धाख्यो नवमी शनौ ॥ १११ ॥

---

१ हस्त.

रविवारीं द्वादशी, सोमवारीं एकादशी, मंगळवारीं पंचमी, बुधवारीं तृतीया, गुरुवारीं षष्ठी, शुक्रवारीं अष्टमी, आणि शनिवारीं नवमी असे योग आले म्हणजे दग्धयोग होतो; तो सर्व शुभ कार्यांस वर्ज्य करावा.

## यमघंटयोग.

मघार्कवारे च विधौ विशाखा आर्द्रा कुजे चंद्रसुते च मूलम् ।
वन्हिर्गुरौ शुक्रदिने विधाता हस्तं च सौरे यमघंटयोगः ॥ ११२ ॥
गृहप्रवेशश्च सुरप्रतिष्ठा तथा प्रयाणं यमघंटयोगे ।
प्राप्नोति कृत्वा भयमेव नित्यं जातः शिशुः संततरोगवान्स्यात्११३

रविवारीं मघा, सोमवारीं विशाखा, मंगळवारीं आर्द्रा, बुधवारीं मूळ, गुरुवारीं कृत्तिका, शुक्रवारीं रोहिणी आणि शनिवारीं हस्त असे योग आले म्हणजे यमघंटयोग होतो. यमघंटयोगावर प्रयाण, गृहप्रवेश, देवाची स्थापना हीं कृत्यें करूं नयेत; केलीं असतां संकटें उत्पन्न होतात. यमघंटयोगावर जन्म झाल्यास बाळकाला क्लेश होताव, परंतु शांति केली असतां तो दोष दूर होतो.

## कल्याणी.

अष्टम्यां पूर्णिमायां च भद्रा पूर्वदले स्मृता ।
एकादश्यां चतुर्थ्यां च शुक्लपक्षे परे दले ॥ ११४ ॥
सप्तम्यां च चतुर्दश्यां विष्टिः पूर्वदले भवेत् ।
दशम्यां च तृतीयायां कृष्णपक्षे परे दले ॥ ११५ ॥

देवदैत्यांच्या युद्धसमयीं एके वेळीं शंकरांनीं आपल्या अंगांतून भद्रानामक राक्षसी उत्पन्न केली. हिला कल्याणी, भद्रा किंवा विष्टि अशीं नांवें आहेत. ही शुक्लपक्षांत चार वेळ व कृष्णपक्षांत चार वेळ अशी महिन्यांतून नेहमीं आठ वेळ असते. म्हणजे शुक्लपक्षांत अष्टमी व पूर्णिमा ह्या तिथींच्या पूर्वभागांत आणि एकादशी आणि चतुर्थी ह्या तिथींच्या उत्तरभागांत कल्याणी असते. तसेंच, कृष्णपक्षांत सप्तमी आणि चतुर्दशी ह्या तिथींच्या पूर्वभागीं आणि दशमी आणि तृतीया ह्या तिथींच्या उत्तरभागीं कल्याणी असते. पूर्वभाग म्हणजे तिथीच्या आरंभापासून तीस घटिका आणि उत्तरभाग म्हणजे शेवटच्या तीस घटिका समजाव्या.

## भद्रेचें मुख.

शैलार्णवमुनितिथ्यर्धिदिग्गोत्रिमिते तिथौ ।
प्रथमादिषु याम्येषु पंचनाड्यस्तु वै क्रमात् ॥
भद्रामुखं परित्यज्य शुभकर्मसु सर्वदा ॥ ११६ ॥

---

१ कृत्तिका. २ रोहिणी. "शुक्रदिने च मैत्रं" असाही एक मतभेद आढळतो. त्याचा अर्थ शुक्रवारीं अनुराधा.

प्रत्येक महिन्यांत आठ वेळ कल्याणी असते हें वर सांगितलेंच आहे. त्या तिथींच्या आरंभापासून कोठें नियमित प्रहरांच्या पहिल्या पांच घटिकांना कल्याणीचें मुख अशी संज्ञा आहे तें अत्यंत अशुभ होय. कोणत्या तिथीच्या कितव्या प्रहराला मुख म्हणावें हें खालीं दिलें आहे.

| | कृ. | शु. | कृ. | शु. | शु. | कृ. | शु. | कृष्ण. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| तिथि | १४, | ८, | ७, | १५, | ४, | १०, | ११, | ३ |
| प्रहर | १, | २, | ३, | ४, | ५, | ६, | ७, | ८ |

उदाहरणार्थ, कृष्णचतुर्दशीच्या पहिल्या प्रहराच्या पांच घटिका, शुक्ल अष्टमीच्या दुसऱ्या प्रहराच्या पाच घटिका इत्यादि. याप्रमाणें कल्याणीचें मुख वर्ज्य करावें.

## भद्रेचें पुच्छ.

सर्पः सप्तस्तिथिः शक्रो दिक्रुद्राग्निश्रुतिस्तिथी ।
प्रथमादिषु याम्येषु क्रमादंत्यघटित्रयम् ॥
पुच्छं विष्टेर्विजानीयात्सर्वकार्येषु मंगलम् ॥ ११७ ॥

| | शु. | कृ. | शु. | कृ. | कृ. | शु. | कृ. | शु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| तिथि | ८, | ७, | १५, | १४, | १०, | ११, | ३, | ४ |
| प्रहर | १, | २, | ३, | ४, | ५, | ६, | ७, | ८ |

उदाहरणार्थ, शुक्ल अष्टमीच्या पहिल्या प्रहराच्या शेवटच्या तीन घटिका, कृष्ण सप्तमीच्या दुसऱ्या प्रहराच्या शेवटच्या तीन घटिका, इ० याप्रमाणें भद्रेचें पुच्छ जाणावें. हें सर्व कार्यांला प्रशस्त मानिलें आहे.

## चंद्रपरत्वें शुभाशुभ कल्याणी.

मेषत्रये वृश्चिकेऽद्दौ स्वर्गे भद्रा प्रकीर्तिता ।
कन्याद्वये धनुर्युग्मे चंद्रे भद्रा रसातले ॥ ११८ ॥
कुंभे मीने तथा कर्के सिंहे चंद्रे भुवि स्थिता ।
भूर्लोकस्था सदा त्याज्या स्वर्गपातालगा शुभा ॥ ११९ ॥

मेष, वृषभ, मिथुन आणि वृश्चिक या चार राशींस चंद्र असतां कल्याणी असेल तर ती स्वर्गलोकीं आहे असें जाणावें. तसेंच, कन्या, तूळ, धन आणि मकर या राशींचा चंद्र असतां कल्याणी पाताळीं आहे असें समजावें. आणि कुंभ, मीन, कर्क व सिंह या राशींस चंद्र असतां भूलोकीं आहे असें जाणावें. भूलोकीं कल्याणी असतां तिचें फळ अशुभ कल्पिलेलें आहे, म्हणून ती सर्व कार्यांत वर्ज्य करावी. कल्याणी स्वर्ग व पाताळ या लोकीं असतां तिचें फळ शुभ, म्हणून ती ग्राह्य होय असें जाणावें. पंचांगांत भद्राप्रवृत्ति ( भ० प्र० )

म्हणजे कल्याणीचा आरंभ व भद्रानिवृत्ति ( भ० नि० ) म्हणजे कल्याणीची समाप्ति हीं दाखविलेलीं असतात.

## कल्याणीच्या दोषांचा अपवाद.

तिथेः पूर्वार्द्धजा रात्रौ दिने भद्रा परार्द्धजा ।
भद्रा दोषो न तत्र स्यात्कार्येऽत्यावश्यके सति ॥ १२० ॥

ज्या तिथींच्या पूर्वार्धी भद्रा असते असें वर लिहिलें आहे, तो पूर्वार्ध जर रात्रीमध्यें असेल तर, किंवा ज्या तिथींच्या उत्तरार्धी भद्रा असते असें वर सांगितलें आहे, तो उत्तरार्ध जर दिवसाचे ठायीं असेल तर कल्याणीचा दोष शुभ कार्याला मानूं नये.

## प्रदोषाचे दिवस.

रात्रौ यामद्वयादर्वाक् सप्तमी वा त्रयोदशी ।
तथैव नवनाडीषु चतुर्थी यदि दृश्यते ।
प्रदोषः स तु विज्ञेयः सर्वविद्याविगर्हितः ॥ १२१ ॥

षष्ठीच्या दिवशीं अर्धरात्रीच्या आंत सप्तमी, किंवा द्वादशीच्या दिवशीं अर्धरात्रीच्या आंत त्रयोदशी असेल तर, अथवा तृतीयेच्या दिवशीं नऊ घटिका रात्रीच्या आंत चतुर्थी असेल तर त्या रात्रीं प्रदोष असतो. ह्या प्रदोषनिमित्तें वेदाध्ययनाला वर्ज्य करावा, असें सांगितलें आहे.

## धनिष्ठापंचक.

धनिष्ठापंचकं त्याज्यं तृणकाष्ठादिसंग्रहे ।
दक्षिणस्यां प्रयाणे च गृहाच्छादने तथा ।
भवेत्पंचगुणं चात्र जातं लब्धं मृतं गतम् ॥ १२२ ॥

धनिष्ठा नक्षत्राच्या आरंभापासून तों रेवती नक्षत्राच्या समाप्तीपर्यंत जीं पांच नक्षत्रें त्यास धनिष्ठापंचक असें म्हणतात. दर महिन्यास हे पंचक असतेच, परंतु तें कोणी मानीत नाहीं. वैशाखकृष्णपक्षांत षष्ठी सप्तमीचे सुमारास जे धनिष्ठापंचक येतें, ते मात्र कित्येक ठिकाणीं मानितात. मुंबई प्रांतात ह्या पंचकास मढेपंचक असें म्हणतात. धनिष्ठापंचकांत लाकडें किंवा गवत यांचा साठा करणें, घर शिवणें, दक्षिणेकडे गमन करणें इत्यादि कृत्यें करूं नयेत. विवाहादि शुभ कार्यें पंचकांत करण्यास कांहीं निषेध नाहीं, असें कित्येक ग्रंथकारांचें मत आहे, परंतु जसा देशाचार असेल त्याप्रमाणें करावें. धनिष्ठापंचकयोगावर जन्म, लाभ किंवा मृत्यु झाला तर पांच वेळ तसें होतें, असें मानिलेलें आहे. म्हणून धनिष्ठापंचकांत मृत्यु घडेल तर शांति करावी, म्हणजे पंचकाची दोषनिवृत्ति होते.

## कपिलाषष्ठी.

भाद्रे मास्यसिते पक्षे भानौ चैव करे स्थिते।
पाते कुजे च रोहिण्यां सा षष्ठी कपिला भवेत् ॥ १३१ ॥

भाद्रपदमहिन्यांत कृष्णपक्षात षष्ठी, मंगळवारीं असून त्या दिवशीं रोहिणीनक्षत्र, व्यतीपात व सूर्यनक्षत्र हस्त, इतके योग असतील तर कपिलाषष्ठी होते. असा योग साठ वर्षांत एकदां आला तर येतो. या दिवशीं दान, होम, श्राद्ध वगैरे केलें असता कोटिगुण फळ मिळतें. हें सूर्यपर्व असल्यामुळें दिवसासच हे योग असले पाहिजेत.

## गजच्छायायोग.

अमावास्यां नभस्ये तु सूर्यचंद्रौ करस्थितौ।
सा विज्ञेया गजच्छाया श्राद्धेऽक्षय्यफलप्रदा ॥ १३२ ॥

भाद्रपद कृष्णपक्षात अमावास्येचे दिवशीं हस्तनक्षत्र असून सूर्यनक्षत्रही हस्तच असेल तर त्या पर्वणीला गजच्छाया म्हणतात. त्या दिवशीं श्राद्धादि कृत्यें केलीं असतां अनंत फलाची प्राप्ति होते, असें सांगितलेलें आहे.

## अर्धोदययोग.

पौषे मासि रवौ दर्शे व्यतीपाते श्रवान्विते।
अर्धोदयाभिधो योगः सूर्यपर्वशताधिकः।
अयं शस्तो दिवायोग किंचिदूनो महोदयः ॥ १३३ ॥

पौष मासांत रविवारीं अमावास्या असून त्या दिवशीं व्यतीपात आणि श्रवण नक्षत्र असे योग असतील तर त्या पर्वणीला अर्धोदय म्हणतात. ही पर्वणी सूर्यग्रहणापेक्षां शतपटीनें फळ देणारी आहे. हा योग दिवसास असेल तरच प्रशस्त मानिलेला आहे. या योगांत एकादा योग न्यून असतां त्याला महोदय म्हणतात. माघमासांतही हे योग असतां अर्धोदययोग होतो, असें कित्येकांचें मत आहे.

## दिनमान व रात्रिमान.

सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जो काळ जातो, त्यास आपण दिवस म्हणतो, त्याचें मान तें दिनमान होय, व सूर्य मावळल्यापासून सूर्याचा पुनः उदय होईपर्यंत जो काळ जातो, त्यास आपण रात्रि म्हणतों, तिचें मान तें रात्रिमान होय. त्याप्रमाणें अहोरात्र म्हणजे दिवस व रात्र मिळून एक दिवस समजतात. उदाहरणार्थ, एका आठवड्याचे दिवस सात, असें आपण म्हणतों; पण समजतांना आठवडा म्हणजे सात दिवस व सात रात्री असें समजतों. यावरून एका दिव-

साचे जे दोन विभाग दिवस व रात्र यांचें मान सारखें असावें असें वाटणें साहजिक आहे. परंतु ते सर्वकाळ तसें असत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, सूर्याचें जाणें कांहीं दिवस उत्तरेकडे [illegible] कांहीं दिवस दक्षिणेकडे असल्यामुळें दिनमान [illegible] रात्रिमान कमी अधिक होतें.

पृथ्वीच्या मध्यरेषेवर सूर्य आला म्हणजे दिनमान व रात्रिमान सारखें म्हणजे तीस तीस घटिकांचें असतें. मार्च महिन्याच्या एकविसाव्या तारिखेस सूर्य मध्यरेषेवर येतो, म्हणून दिवस व रात्र हीं त्या वेळीं सारखीं असतात. सूर्य मध्यरेषेपासून उत्तरेकडे जाऊं लागल्यापासून दिवस वाढत जातो, तो कर्कवृत्तापर जाईपर्यंत वाढत असतो. जून महिन्याच्या एकविसाव्या तारखेस सूर्य कर्कवृत्तावर जातो, म्हणून या वेळेस दिनमान वाढण्याची पराकाष्ठा होते. या वेळेस दिनमान सुमारें ३२ घटिका ५० पळें असतें. कर्कवृत्तापासून सूर्य मागें परत जाऊं लागला कीं, दिनमान थोडें थोडें पुनः कमी होऊं लागतें, तें सप्टेंबरच्या तेविसाव्या तारिखेस म्हणजे सूर्य मध्यरेषेवर आला कीं, बरोबर पुनः तीस घटिकांचें होतें. मध्यरेषेपासून सूर्य दक्षिणेकडे जाऊं लागला कीं, दिनमान कमी होऊं लागतें, तें तो मकरवृत्तावर जाईपर्यंत कमी असतें. डिसेंबरच्या एकविसाव्या तारिखेस सूर्य मकरवृत्तावर जातो, म्हणून या वेळेस दिवस फार लहान असतात. या वेळेस दिनमान सुमारें २७ घटिका १० पळें असतें. दक्षिणेकडून मध्यरेषेकडे सूर्य पुनः परत येऊं लागला कीं, दिनमान वाढत जातें, तें मध्यरेषेवर येईपर्यंत वाढत असतें. मार्च महिन्याच्या एकविसाव्या तारखेस पुनः सूर्य मध्यरेषेवर येतो या वेळेस दिनमान पुनः तीस घटिका असतें. [illegible] सहा महिने उत्तरेकडे व सहा महिने दक्षिणेकडे सूर्य [illegible] असतो. उत्तरेकडे फिरण्यास त्यास जो काळ लागतो, त्यास उत्तरायण म्हणतात, व दक्षिणेकडे फिरण्यास जो काळ लागतो, त्यास दक्षिणायन म्हणतात. दिवस व रात्र मिळून साठ घटिका असतात, म्हणून साठ घटिकांतून दिनमानाच्या घटिका वजा केल्या म्हणजे बाकी राहील ते रात्रिमान समजावें. ज्या वेळीं दिवस मोठे, त्या वेळीं रात्री लहान असतात, व ज्या वेळीं रात्री वाढत त्या वेळीं दिवस लहान असतात.

चंद्रग्रहण. सूर्यग्रहण फक्त अमावास्येस व चंद्रग्रहण फक्त पूर्णिमेस येतें. सूर्य स्वयंप्रकाश असल्यामुळें वस्तुतः त्यास ग्रहण कधींच नाहीं; पण सूर्याच्या आड चंद्र येऊन चंद्राची छाया पृथ्वीवर पडते व त्यामुळें सूर्य दिसेनासा होऊन त्याचा प्रकाश अगदीं अंधुक होतो, तेव्हां सूर्यास ग्रहण लागलें असें आपण समजतों. यावरून सूर्यग्रहण होण्यास सूर्यचंद्र एका राशीस बरोबरीं असले पाहिजेत, ते अमावास्येस मात्र तसे येतात, म्हणून अमावास्येखेरीज इतर तिथींस सूर्यग्रहण होत नाहीं. चंद्रग्रहण होण्याचें कारण असें आहे कीं, पृथ्वीची छाया चंद्रावर पडून चंद्र आपणास दिसेनासा होतो, असें झालें म्हणजे चंद्रास ग्रहण लागलें असें आपण समजतों. तेव्हां चंद्रग्रहण होण्यास म्हणजे चंद्रावर पृथ्वीची छाया पडण्यास चंद्र व पृथ्वी या दोहोंच्या मध्यें अर्ध्या परिघाइतकें म्हणजे सहा राशींचें अंतर असलें पाहिजे. इतकें अंतर पूर्णिमेस मात्र असतें म्हणून चंद्रग्रहण पूर्णिमेस मात्र होतें. यावरून दर अमावास्येस किंवा दर पूर्णिमेस ग्रहण कां होत नाहीं अशी शंका कदाचित् कोणी घेईल तर, त्याचें उत्तर असें आहे कीं, ग्रहण होण्यास चंद्र व पृथ्वी यांच्या कक्षा एकाच पातळींत असल्या पाहिजेत; परंतु चंद्र, सूर्य व पृथ्वी हीं एकाच रेषेंत येणें, हे योग दर अमावास्येस किंवा दर पूर्णिमेस असत नाहींत, म्हणून दर पंधरवड्यास पूर्ण ग्रहणें होऊन दिसत नाहींत. सूर्यग्रहण पूर्वेकडून कधींही लागत नाहीं व तसेंच चंद्रग्रहण पश्चिमेकडून लागत नाहीं. राहु चंद्रास ग्रासतो, व केतु सूर्यास ग्रासतो, व त्यामुळें ग्रहणें होतात, अशी जी कल्पना आहे, ती कविनिर्मित आहे. अलीकडील ज्योतिष्यांची व फार प्राचीन काळीं आमच्या विद्वान् ऋषींनीं वेदांत लिहून ठेविलेली ग्रहणांविषयींची कल्पना एकच आहे. राहू हा उपरागाला कारण नाहीं, हें वर दिलेल्या वराह-मिहिराच्या मतावरून स्पष्ट कळेल.

राहूनें चंद्रास व केतूनें सूर्यास ग्रासिलें म्हणजे अनुक्रमें चंद्र व सूर्यग्रहण होतें. ह्या कल्पनेचा पुराणाशीं संबंध असावा असें दिसतें. देवदैत्यांनीं समुद्रमंथन करून ज्या वेळीं चौदा रत्नें काढिलीं त्या वेळीं त्या रत्नांपैकीं अमृत कोणीं घ्यावें, ह्याविषयीं देवदैत्यांत भयंकर वाद उत्पन्न झाला. तेव्हां विष्णूनें मोहिनीचें कपटरूप धारण करून देवदैत्यांपाशीं येऊन सारखी वांटणी करण्याचें कबूल केलें. नंतर, मोहिनी एका हातांत अमृत व दुसऱ्या हातांत मद्य घेऊन देवांकडे अमृत व दैत्यांकडे मद्य वाढूं लागली. राहूनें व केतूनें हें कपट पाहून, आपल्याला अमृताचा लाभ व्हावा म्हणून, ते दैत्यांच्या पंक्तींतून उठून देवांच्या पंक्तींत चंद्र-सूर्यांच्या मागें अलक्षित येऊन बसले. मोहिनी अमृत वाढण्याकरितां देवांकडे आली, तेव्हां दोघांनींही आपआपले हात पुढें केले. मोहिनीनें चुकून राहू-च्याही हातावर अमृत घातल्याबरोबर चंद्रानें नेत्रसंकेतानें ही गोष्ट मोहिनीस

कळविली. त्याबरोबर मोहिनीनें आपल्या सुदर्शनानें राहूचा शिरच्छेद केला; परंतु अमृत कंठांतून खालीं गेलें असल्यामुळें त्याचें धड व शिर हीं जीवंत राहिलीं. केतु, सूर्यामागें बसला होता त्यासही अर्थात् अमृतलाभ झाला नाहीं. असें होण्यास कारण चंद्रसूर्य झाले म्हणून राहुकेतु आणि चंद्रसूर्य यांच्यांत वैमनस्य पडलें! व त्यावरून राहु चंद्रास व केतु सूर्यास ग्रासितो अशी ग्रहणासंबंधीं भ्रामक कल्पना निघाली असावी असें वाटतें. वराहमिहिरानंतर ही विलक्षण कल्पना प्रचलित झाली असली पाहिजे हें उघड आहे. म्हणजे आज जवळ जवळ तिला चौदा शतकें होऊन गेलीं; तरी ती अद्यापि तशीच कायम आहे, याचें आश्चर्य वाटतें. तसेंच, पृथ्वीवर पाप फार होऊं लागलें म्हणून अलीकडे ग्रहणें फार होतात, असें कित्येक लोक म्हणतात, परंतु त्यांतही कांहीं अर्थ नाहीं. ग्रहणांचें प्रमाण पहिल्यापासून आहे तेंच आहे, असें अनेक ज्योतिष्यांनीं सिद्ध केलें आहे, आणि पृथ्वीवरील लोकांच्या बऱ्यावाईट आचरणाचा व आकाशांतील स्थितीचा परस्परांशीं कांहींएक संबंध नाहीं.

## ग्रहणाचा वेध व स्पर्श.

सूर्यग्रहे तु नाश्नीयात्पूर्वं यामचतुष्टयम् ।
चंद्रग्रहे तु यामांस्त्रीन् बालवृद्धातुरैर्विना ॥ १३६ ॥
बालवृद्धातुराणां तु याममेकं न भोजनम् ।
चंद्रसूर्यग्रहे भुक्त्वा प्राजापत्येन शुद्ध्यति ॥ १३७ ॥

ग्रहण लागण्यापूर्वी ग्रहणाचा वेध लागतो, असें धर्मशास्त्रकारांनीं मानिलें आहे. याचें एक व्यावहारिक कारण असें दिसतें कीं, ग्रहण लागलें म्हणजे पृथ्वीवर सूर्याचा पुरेसा प्रकाश न पडल्यामुळें हवा दूषित होऊन त्या योगानें पचनादि क्रिया बरोबर घडत नाहीं आणि त्यामुळें प्रायः रोग उत्पन्न होण्याचा संभव असतो म्हणून शास्त्रकारांनीं ग्रहणापूर्वी कांहीं काळपर्यंत भोजनाचा निषेध सांगितला आहे. तसेंच, ज्या प्रमाणानें चंद्रसूर्यांच्या प्रकाशाचे पृथ्वीवर कमी अधिक परिणाम होतात, तदनुरोधानें भोजनाच्या निषेधाचा काळही कमीअधिक ठरविलेला आहे. तो असा कीं, चंद्रग्रहणाचा ग्रहणप्रहराच्या पूर्वी तीन प्रहर म्हणजे नऊ तास व सूर्यग्रहणाचा ग्रहणप्रहराच्या पूर्वी चार प्रहर म्हणजे बारा तास वेध लागतो. उदाहरणार्थ, दिवसाच्या पहिल्या प्रहरांत सूर्यग्रहण असेल तर आदल्या दिवशीं रात्रीं पहिल्या प्रहरापासून वेध लागतो. तसेंच, पहिल्या प्रहरीं रात्रीं चंद्रग्रहण असेल तर दिवसाच्या दुसऱ्या प्रहरापासून वेध लागतो. दिवसाचे प्रहर मोजणें ते सूर्योदयापासून मोजावे व रात्रीचे प्रहर मोजणें ते सूर्यास्तापासून मोजावे. तीन तासांचा एक प्रहर होतो. वेध लागल्यापासून ग्रहण सुटेपर्यंत

भोजन वगैरे करू नये. केलें असतां एक दिवस उपोषण करावें असें सांगितलें आहे. ल्हान मुलें, म्हातारीं माणसें आणि रोगी यांनीं ग्रहण लागण्यापूर्वी यथाशक्ति दीड प्रहर म्हणजे साडे चार तास किंवा निदान सहा घटिका म्हणजे सुमारें अडीच तास मात्र भोजन करू नये. कित्येक धर्मशास्त्रकाराच्या मतें हा चार प्रहराच्या वेधाचा भोजनाविषयींचा नियम केवळ खग्रास ग्रहणालाच लागू आहे म्हणजे पूर्ण मंडल ग्रास असेल तरच चार प्रहर वेध समजावा. यावरून $\frac{3}{4}$ ग्रास असेल तर ३ प्रहर, अर्धग्रास असेल तर अर्धा म्हणजे २ प्रहर वेध व $\frac{1}{4}$ असेल तर १ प्रहर वेध समजून तितका काळ भोजन करू नये, असा व्यनितार्थ निघतो.

ग्रहण लागू लागलें म्हणजे ग्रहणाचा स्पर्श झाला असें म्हणतात, व ग्रहण सुटलें म्हणजे ग्रहणाचा मोक्ष झाला असें म्हणतात ग्रहणाचा स्पर्श झाल्यापासून मोक्ष होईपर्यंत जो मधला काळ त्यास पर्वकाळ म्हणतात ग्रहणसमयीं बिंबाचा जितका भाग आच्छादित होतो, तितका ग्रास झाला असें समजतात कोणत्या दिशेनें ग्रहणाचा स्पर्श व मोक्ष होतो हें पंचांगांत दाखविलेलें असतें तसेंच, किती वाजतां होतो, हंही घटिकापळांनीं व कलाकमिन्युटांनीं दाखविलेलें असतें

## शुभाशुभग्रहण.

ग्रहणं जन्मभात् श्रेष्ठं दशैकादशषट्त्रिकम् ।
मध्यमं पंचसप्ताश्विनवमस्थानसंस्थितम् ।
नेष्टमंत्याष्टतुर्यस्थं जपाच्छांतिर्भविष्यति ॥ १२८ ॥

ग्रहणदिवशीं ज्या राशीस चंद्र असेल त्या राशीस ग्रहण आहे असें समजावें. आपल्या जन्मराशीपासून तिसऱ्या, सहाव्या, अकराव्या किंवा दहाव्या राशीस जर ग्रहण असेल तर शुभ आहे असें समजावें दुसऱ्या, सातव्या, नवव्या, किंवा पांचव्या राशीस असेल तर मध्यम, आणि आपल्या राशीस किंवा राशीपासून चवथ्या, आठव्या किंवा बाराव्या राशीस किंवा जन्मनक्षत्रीं असेल तर अनिष्ट आहे असें जाणावें ग्रहण आपल्या राशीस अनिष्ट असेल आणि सामर्थ्य असेल तर सुवर्णाचं बिंब करून तें, व कांस्यपात्रांत तूप घालून तीळ, वस्त्र आणि दक्षिणा यांसह सत्पात्रीं दान द्यावें, असें धर्मशास्त्रकार म्हणतात परंतु जपानेंही क्लेश दूर होतात असें मानिलें आहे प्रत्यक्ष ग्रहण कोणींच पाहू नये त्यांत ज्यांच्या राशीस अनिष्ट असेल त्यांनीं किंवा गर्भवती स्त्रियांनीं मुळींच पाहू नये, इतरांस पाहणेंच असेल तर वस्त्र, उदक किंवा कांच यांतून पहावें दृष्टीनें ग्रहण पाहिलें नाहीं म्हणजे स्वराशीस अनिष्ट असताही ग्रहणाचा दोष लागत नाहीं

## ग्रहणांतील कृत्यें.

रविग्रहः सूर्यवारे सोमे सोमग्रहस्तथा ।
चूडामणिरिति ख्यातस्तत्र दत्तमनन्तकम् ॥ १३९ ॥
सूर्येंदुग्रहणं यावत्तावत्कुर्याज्जपादिकम् ।
न स्वपेन्न च भुंजीत स्नात्वा भुंजीत मुक्तयोः ॥ १४० ॥

चंद्रग्रहण असो अथवा सूर्यग्रहण असो, जोंपर्यंत तें डोळ्यांनीं दिसत असेल तोंपर्यंत त्याचा पुण्यकाळ असतो. रविवारीं आलेलें सूर्यग्रहण व सोमवारीं आलेलें चंद्रग्रहण यांस चूडामणिग्रहण अशी संज्ञा आहे. चूडामणिग्रहणांत सत्पात्रीं म्हणजे विद्वान् व धार्मिक ब्राह्मणांला व अंध पंगु थोटे इत्यादिकांला दान केलें असतां अनंतफलप्राप्ति होते. ग्रहण लागल्याबरोबर स्नान, मध्यें जप देव-पूजा वगैरे; व सुटण्यास आरंभ झाला म्हणजे दान व सुटलें म्हणजे पुनः स्नान, याप्रमाणें करावें असें धर्मशास्त्रकार म्हणतात. ग्रहणांत समुद्रस्नान फार पुण्य-कारक मानिलें आहे. समुद्रस्नान घडणें अशक्य असेल, तर तीर्थाच्या ठिकाणीं स्नान करावें, तीर्थस्नान घडणें शक्य नसेल तर एखाद्या नदीचें स्नान करावें. तेंही न घडेल, तर निदान शीतोदकानें स्नान करावें. अशक्तांनीं उष्णोदकानें स्नान करावें. सुवासिनी स्त्रियांनीं गळ्याखालीं स्नान करावें, असा शास्त्राचा आधार आहे, तथापि शिष्टांच्या स्त्रिया ग्रहणांत डोक्यावरूनच स्नान करितात असें प्रायः सर्वत्र आढळतें. सुवेरांत किंवा सुतकांत ग्रहणसंबंधी स्नान, दान वगैरे अवश्य केलेंच पाहिजे.

## अन्नादिवस्तूंचा ग्रहणांत दोष.

आरनालं पयस्तक्रं दधिस्नेहाज्यपाचितं ।
मणिकस्थोदकं चैव [illegible] दुष्येद्राहुसूतके ॥ १४१ ॥

ग्रहणापूर्वीं तयार केलेले भक्षणाचे पदार्थ ग्रहणानंतर दूषित होतात असें मानिलेलें आहे, परंतु कांजी, दूध, ताक, दहीं घृतपाचित फराळाचे सर्व पदार्थ, मोठमोठ्या माठांतील पाणी इत्यादि वस्तु ग्रहणानें अपवित्र होत नाहींत. अर्थात् "अन्नं पक्वमिहं त्याज्यं" या वचनाच्या आधारें ग्रहणापूर्वी शिजविलेलें अन्न मात्र ग्रहणानंतर सेवन करूं नये. इतर पदार्थांवर ग्रहणांत तुलसीपत्र, दर्भ किंवा तीळ ठेवण्याचा परिपाठ आहे त्यास "तिलदर्भैर्न दुष्यंति" असें निर्णय-सिंधूंत दिलेलें अन्य ग्रंथांतील वचन आहे.

## संक्रांति.

पूर्वं परित्यज्य यदा ग्रहाणां राशिं परं प्रत्ययनं स कालः ।
संक्रांतिचाख्यो यमतिप्रशस्तः स्नाने च दाने च रवेर्विशेषात् १४२

कोणत्याही ग्रहाचें एका राशींतून दुसऱ्या राशींत जाणें यास संक्रांतिकाल म्हणतात. ह्या स्नानदानाविषयीं फार प्रशस्त मानिलेला आहे. त्यांतल्या त्यांत सूर्यसंक्रमणाचा काल विशेष पुण्यदायक आहे. मेष वृषभ आदिकरून सूर्याचे बारा संक्रांतिकाल आहेत परंतु धर्मशास्त्रकारांनीं कर्क आणि मकर संक्रांतीला इतर संक्रांतींपेक्षां विशेष महत्त्व दिलें आहे. त्यांतही मकरसंक्रमणाचा काल विशेष पुण्यदायक मानिला आहे. याचें कारण असें आहे कीं, ह्या दोन्ही दिवशीं आकाशांत सूर्याची गति बदलते. म्हणजे कर्कसंक्रांतीचे दिवशीं दक्षिणायनाला व मकरसंक्रांतीचे दिवशीं उदगयनाला आरंभ होतो, हें मागें सांगितलेंच आहे. उत्तरायणाचा काल धर्मशास्त्रांतील सर्व शुभ कृत्यें करण्यास उक्त असल्यामुळें आणि त्या कालाचा आरंभ मकरसंक्रांतीपासून होत असल्यामुळें मकरसंक्रमणाचा काल त्यांतल्या त्यांत विशेष पुण्यदायक मानिलेला आहे.

## संक्रांतीचा पर्वकाळ.

पुण्याः षोडश नाड्यस्तु पराः पूर्वास्तु संक्रमात् ।
त्रिंशत्कर्काटके पूर्वे चत्वारिंशत्परी मृगे ॥ १४३ ॥
अस्तादूर्ध्वं तु मकरे रात्रौ संक्रमणं रवेः ।
तदोत्तरदिनं पुण्यं मध्याह्नात्प्राक् प्रकीर्तितम् ॥ १४४ ॥

कोणत्याही संक्रांतीचा आरंभापूर्वी सोळा घटिका आणि नंतर सोळा घटिकांपर्यंत पर्वकाळ असतो. परंतु कर्कसंक्रांतीचा प्रवेश होण्यापूर्वी तीस घटिकांपर्यंत आणि मकरसंक्रांतीचा संक्रांतिप्रवेशानंतर चाळीस घटिकांपर्यंत पर्वकाळ असतो. कांहीं ग्रंथकार मकरसंक्रांतीचा वीस घटिकांपर्यंतच उत्तम पर्वकाळ असतो असें म्हणतात. सूर्यास्तानंतर रात्रीं केव्हांही मकरसंक्रांतीचा प्रवेश होईल तर दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकालपर्यंत पर्वकाळाप्रीत्यर्थ स्नानादानादि कृत्यें करावीं. दिवसामध्यें केव्हांही संक्रांतिप्रवेश झाला असतां तत्काल पर्वकाळप्रीत्यर्थ स्नानदान करणें हा उत्तम पक्ष होय. कर्कसंक्रांतीच्या पर्वकाळाविषयीं पुढें तिथिनिर्णयप्रकरणांत माहिती दिली आहे.

## संक्रांतीचीं शुभाशुभ फलें.

यस्य जन्मर्क्षमासाद्य तिथौ संक्रमणं भवेत् ।
तन्मासाभ्यंतरे तस्य वैरक्लेशौ धनक्षयः ॥ १४५ ॥

जन्मनक्षत्रावर, जन्ममासांत किंवा जन्मतिथीवर संक्रांत झाली तर अनुक्रमें वैर, क्लेश आणि धनक्षय अशीं फलें त्या महिन्यांत होतात. तसेंच,

---

१ 'मकरे विंशतिः परे' असाही पाठ आहे. त्याच्या अर्थ नंतर वीस घटिकांपर्यंत.

पंचांगात मकरसंक्रांतीचीं फळें सांगून त्याच्या खालीं 'अथ जन्मर्क्षवशात्फल' या सदराखालीं सहा कोष्टक दिलेलीं असतात त्या सहा कोष्टकांत सर्व नक्षत्रें लिहिलेलीं असतात आपलें जें जन्मनक्षत्र असेल तें सहा कोष्टकांपैकीं कोणत्या कोष्टकांत आहे हें पहावें तें 'भोग' 'वस्त्र' 'विपुल धन' या कोष्टकांत असेल तर चांगलें फल, आणि 'पथा' 'व्यथा' 'हानि' ह्या तीन कोष्टकांत असेल तर संक्रांतीच आपल्याला वाईट फळ आहे असें समजावें ज्या वाहनावर संक्रांत बसली असेल किंवा ज्या वस्तु संक्रांतीनें धारण केल्या असतील, त्या सर्व वस्तु महाग होतात किंवा त्यांचा नाश होतो मकरसंक्रांतीचीं वाहन, उपवाहन, भक्षणाचे व धारणाचे पदार्थ पंचांगांत लिहिलेले असतात, ते सर्व ययातलवादि करणावरून ठरलेले आहेत संक्रांत अमुक दिशेकडे जाते किंवा अमुक दिशेकडे पहाते, हें वारावरून ठरविलेलें आहे म्हणजे रविवारीं किंवा शुक्रवारीं संक्रांत असतां दक्षिणेकडे सोमवारीं किंवा शनिवारीं असतां उत्तरेकडे, मंगळ आणि बुध या वारीं पश्चिमेकडे आणि गुरुवारीं असतां पूर्वेकडे जाते असें मानिलेलें आहे ज्या दिशेकडे संक्रांतीचें गमन त्याच्या समोरच्या दिशेकडून आगमन आणि ज्या दिशेकडे मुख त्याच्या उजव्या हाताकडील उपदिशेकडे दृष्टि असते उदाहरणार्थ, उत्तरेकडे गमन असेल तर दक्षिणेकडून आगमन आणि ईशान्येकडे अवलोकन असतें संक्रांतीचीं घोरा, ध्वांक्षी, महोदरी, मंदाकिनी, मंदा मिश्रा, राक्षसी अशीं रविवारादि सात वारांचीं अनुक्रमेंकरून निरनिराळीं सात वारनांवें आहेत म्हणजे रविवारीं संक्रांति असतां घोरा, सोमवारीं असतां ध्वांक्षी इत्यादि हींच नक्षत्रनामें होत तीं उग्र, क्षिप्र, चर, मैत्र, स्थिर, मिश्र आणि दारुण ह्या सात प्रकारच्या नक्षत्रांचीं सात नांवें समजावीं उदाहरणार्थ, उग्रनक्षत्रीं संक्रांति असतां घोरा, क्षिप्र नक्षत्रीं असतां ध्वांक्षी इ० उग्रक्षिप्रादि नक्षत्रें कोणतीं हें मागें नक्षत्रांच्या विशेष संज्ञा लिहिल्या आहेत तेथें सांगितलें आहे

## पंचांग पाहण्याची रीति.

तिथिर्वारश्च नक्षत्रं योगः करणमेव च ।
एतेः पंचभिरंगैः संयुतं पंचांगमुच्यते ॥ १४६ ॥

तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण हीं काळाचीं पांच मुख्य अंगें ज्यांत दाखविलेलीं असतात, त्यास पंचांग असें म्हणतात ह्या पांच अंगांशिवाय ज्यांचा ज्योतिषाशीं मुळींच संबंध नाहीं अशा पुष्कळ उपयुक्त गोष्टी पंचांगांत घालण्याचा अलीकडे प्रचार पडला आहे पंचांग बहुतकरून सर्वांस पाहतां येतें, परंतु ज्यास तें पाहण्याची पद्धति ठाऊक नसेल त्याच्याकरितां पुढील माहिती दिली आहे

मुंबई किंवा पुणें येथील पंचांग घ्या आणि कोणताही महिना काढा. पंचांगांत शिरोभागीं पहिल्या आडव्या ओळीस डाव्या हाताकडे शक, महिना व पक्ष हीं दाखविलेलीं असतात; व उजव्या हाताकडे अयन व ऋतु हीं दाखविलेलीं असतात. पंचांगांत उभीं कोष्टकें पुष्कळ आहेत. त्यांपैकीं पहिल्या कोष्टकांत एक, दोन, तीन असे जे अनुक्रमानें अंक दिलेले आहेत त्या तिथि होत. दुसऱ्या कोष्टकांत वार लिहिलेले असतात. वाराचें पूर्ण नांव न लिहितां फक्त पहिलें अक्षर लिहितात. तिसऱ्या व चवथ्या कोष्टकांत अनुक्रमें तिथींच्या घटिका व पळें हीं दाखविलेलीं असतात. पांचव्या कोष्टकांत दिवसाचें नक्षत्र लिहिलेलें असतें. वारांप्रमाणें नक्षत्राचें देखील फक्त पहिलेंच अक्षर लिहिण्याचा प्रचार आहे. सत्तावीस नक्षत्रांपैकीं ज्यांचीं आद्याक्षरें सारखींच आहेत, अशीं कांहीं नक्षत्रें आहेत. उदाहरणार्थ, 'अ' म्हणजे अश्विनी किंवा अनुराधा होईल. 'आ' म्ह० आर्द्रा किंवा आश्लेषा होईल 'पु' म्ह. पुनर्वसु किंवा पुष्य होईल, 'पू' म्ह० पूर्वा, पूर्वाषाढा किंवा पूर्वाभाद्रपदा होईल आणि 'उ' म्हणजे उत्तरा, उत्तराषाढा किंवा उत्तराभाद्रपदा होईल. अशा ठिकाणीं चुकी होण्याचा संभव आहे म्हणून नक्षत्र पाहते वेळीं मागचें पुढचें नक्षत्र पाहून नंतर दिवसनक्षत्र ठरवावें. पंचांगकारांनीं या ठिकाणीं थोडीशी सुधारणा केली तर बरें होईल. संशयाचीं स्थळें असतील तेथें नक्षत्राचें एक अक्षर न लिहितां दोनदोन अक्षरें लिहावीं जसें, अनुराधाबद्दल अनु. उत्तराषाढाबद्दल उ. षा, इत्यादि सहाव्या व सातव्या कोष्टकांत अनुक्रमें नक्षत्राच्या घटिका व पळें लिहितात. आठव्या कोष्टकांत योग दाखविलेला असतो. नवव्या व दहाव्या कोष्टकांत योगाच्या अनुक्रमें घटिका व पळें हीं दाखविलेलीं असतात. अकराव्या कोष्टकांत करण व बाराव्या कोष्टकांत करणाच्या घटिका असतात. करणाचीं पळें दाखविण्याचा बहुतकरून प्रचार नाहीं. तेराव्या कोष्टकांत दिनमान दाखवितात. ह्या कोष्टकाच्या वरती दि. (दिनमान) असें लिहिलेलें असतें. पंधरवड्याच्या पहिल्या व दोवटच्या दिवशीं मात्र दिनमानाच्या घटिका व पळें हीं दाखविलेलीं असतात. मधल्या दिवशीं पण पळेंच लिहिलेलीं असतात. म्हणून एखाद्या मधल्याच दिवसाचें दिनमान पाहिजे असल्यास प्रतिपदेच्या दिनमानाच्या घटिका धराव्या. चवदा, पंधरा व सोळा ह्या कोष्टकांत अनुक्रमें पारशी, मुसलमानी, व इंग्रजी तारिखा लिहितात. सतराव्या व अठराव्या कोष्टकांत अनुक्रमें

---

१ ज्याप्रमाणें दिनमानाच्या कोष्टकाच्या शिरोभागीं दिनमान या शब्दाचें आद्याक्षर दि हें सूचनार्थ *लिहिलेलें असतें, त्याचप्रमाणें तिथिनक्षत्रादिकांच्या व त्यांच्या घटिकापळांच्या कोष्टकावरही प्रत्येकाचें आद्याक्षर लिहिण्याची पद्धति पंचांगकार सुरू करतील तर फार सोईचें होईल.*

रवीच्या उदयाचे व रवीच्या अस्ताचे तास व मिनिटें हीं दिलेलीं असतात. एकोणिसाव्या कोष्टकांत त्या दिवशीं कोणत्या राशीचा चंद्र असतो, हें लिहितात.

हीं कोष्टकें संपल्यानंतर त्यांच्यापुढें बऱ्याच रुंदीचें एक कोष्टक असतें, त्यांत ज्या दिवशीं कांहीं विशेष असेल तें त्या दिवसाच्या पुढें लिहितात. उदाहरणार्थ, 'संकष्ट ४' 'प्रदोष' 'शिवरात्र' 'मिथुनेर्कः' इत्यादि. तसेंच, या पुस्तकाच्या प्रथमावृत्तींत सूचना केल्यावरून म्हणा किंवा कांहीं अन्य कारणामुळें म्हणा पंचांगांत ज्ञानदेव, तुकाराम वगैरे साधुपुरुषांच्या, व शिवाजीसारख्या प्रसिद्ध कर्तृत्ववान् पुरुषांच्या पुण्यतिथींचे दिवस दाखविण्याचा प्रघात पंचांगकारांनीं पाडिला ही गोष्ट फार सोयीची झाली आहे. तसेंच, मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत आदिकरून कवींच्या पुण्यतिथींचे दिवस पंचांगांत लिहिले असतांही महाराष्ट्रीयांस हें पसंत पडेल.

पंचांगाच्या उजव्या बाजूस वरच्या कोंपऱ्यांत एक कोष्टक असतें, त्यांत रवि, चंद्र वगैरे ग्रहांचीं नांवें संक्षेपानें देऊन प्रत्येक ग्रहाच्या खालीं कांहीं अंक लिहिलेले असतात. हे अंक पंधरवड्याच्या शेवटच्या दिवशीं सकाळीं आकाशांत ते ते ग्रह कोणत्या ठिकाणीं आहेत, हें दाखवितात. उदाहरणार्थ, रवीच्या खालीं १।२३।३८।३२ असे आंकडे आहेत, अशी कल्पना करा. याचा अर्थ असा कीं, रवीनें पंधरवड्याच्या शेवटच्या दिवशीं सकाळीं एक राशी पूर्ण भोगून दुसऱ्या राशींपैकीं २३ अंश आणि ३८ कला आणि ३२ विकला भोगिल्या आहेत, म्हणून कुंडलींत तो दुसऱ्या राशीस दाखविलेला असेल. याचप्रमाणें इतर ग्रहांचें जाणावें. या आंकड्यांच्या खालीं दुसरे आंकडे दिलेले असतात. ते ग्रहांच्या गतीचें प्रमाण दाखविणारे आंकडे असतात. उदाहरणार्थ, रवीच्या खालीं ५७।१२ असे अंक आहेत, याचा अर्थ असा कीं, रवीची गति ५७ पळें व १२ विपळें इतकी आहे. कित्येक ग्रहांच्या खालीं हे अंक देऊन शिवाय 'व' असें अक्षर लिहिलेलें असतें याचा अर्थ तो ग्रह वक्री आहे, असें समजावें. त्याचप्रमाणें गतीच्या कोष्टकांत ग्रह अस्तंगत असल्यास "अ" असें पंचांगकार लिहितील तर सोईचें होईल.

पंचांगांत उजव्या बाजूस खालच्या कोंपऱ्यांत बारा गृहांचें एक चतुष्कोण चक्र असतें, त्यास कुंडली म्हणतात. ह्या कुंडलींत पंधरवड्याच्या शेवटच्या दिवसाचे प्रातःकालचे ग्रह दाखविलेले असतात. म्हणजे पूर्वीच्या चवदा दिवसांत ग्रहांत जो फेरफार होतो, तो कुंडलींत दाखवितात. उदाहरणार्थ, मिथुनराशीचा शुक्र नवमीस २२ घटिका २३ पळांनीं कर्कराशीस गेला आहे, म्हणून तो कुंडलींत कर्कराशीस दाखविलेला तुम्हांस आढळेल. परंतु त्याच पंधरवड्यांत शुक्र कर्कराशीस गेला त्यापूर्वी, एकाद्या वेळेची कुंडली जर तयार करणें असेल, तर पंचांगांतील कुंडलीप्रमाणें कर्कराशीस न दाखवितां तो मिथुनराशीसच दाखविला पाहिजे. असो; जी चालू संक्रांत असेल म्हणजे सूर्य ज्या राशीस असेल

त्या राशीचा अंक कुंडलींतल्या मध्यगृहात लिहितात, व त्याच्या पुढील सारे अंक डाव्या हाताकडील गृहात लिहितात पचागांतील कुंडली म्हणजे प्रथम दिवसाच्या शेवटच्या दिवसाची सूर्योदयाच्या वेळेची लग्नकुंडली होय कारण जी चालू सराल असेल तेच दिवसाचे पहिलें लग्न होय, व पचागात मध्यगृहात तेंच दाखवितात कुंडलीसबंधी ह्या पुस्तकाच्या निमऱ्या प्रकरणात अधिक विचार केलेला आहे, म्हणून त्याविषयीं येथें विशेष लिहीत नाहीं

पचागात आणखी अनेक गोष्टींचा समावेश केलेला असतो, त्यापैकीं मुख्य मुख्य येथ लिहितो पचागात आरभीं वर्षफलें दिलेलीं असतात त्यांत त्या वर्षात राजा कोण, मत्री कोण, वगैरे सागितलेलें असतें त्याचा नियम असा आहे कीं,

चैत्रादो मेषकर्काद्रांतुलाकार्मुकयासरा. ।
नृपो मत्री धान्यतोयरससस्याधिपा क्रमात् ॥ १४७ ॥

म्हणजे चैत्रशुक्लप्रतिपदेस जो वार असेल तो त्या वर्षाचा राजा, मेषसक्रांति ज्या वारीं होईल तो मत्री, आर्द्राप्रवेश ज्या वारीं होईल तो मेघेश, कर्कसक्रांति ज्या वारीं होईल तो अग्रधान्येश, धनसक्रांति ज्या वारीं असेल तो पश्चाद्धान्येश, तूलसक्रांति ज्या वारीं होईल तो रसेश, आणि सिंहसक्रांति ज्या वारीं होईल तो सेनेश, याप्रमाणें आणावे अमक्याचा स्वामी अमुक असतां अमुक प्रकारची फलप्राप्ति होते, हें राजावलि आणि कल्पलतानामक ग्रथात दिलें आहे, त्यांत चद्र, बुध, गुरु आणि शुक्र यांचीं फलें चागलीं असतात बाकी ग्रहांचीं फलें वाईट असतात

'अथ विशोपका' या सदराखालीं पदार्थांचीं व विकारांचीं वगैरे १०५ नाव देऊन त्याच्या पुढें काहीं आंकडे मांडलेले असतात ते सर्व विसांच्या आंतले असतात याचें कारण असें आहे कीं, प्रत्येक पदार्थाची किंवा विकाराची इयत्ता वीस विभाग करून त्यापैकीं निरनिराळ्या वर्षांत त्या पदार्थाची किंवा विकाराची किती उत्पत्ति असते, हें त्या अंकांवरून समजाव उदाहरणार्थ, वृष्टि १५ याचा अर्थ असा कीं, पावसाची इयत्ता वीस विभाग ठरविलेले आहेत, परतु त्या विसा पैकीं १५ हिस्से वृष्टि होईल, म्हणजे पाऊस जितका पडणें योग्य आहे, त्याचा तीनचतुर्थांश पडेल याचप्रमाणें इतर पदार्थांच समजाव प्रत्येक पदार्थ विसांनीं विभागला असल्यामुळे याला 'विशोपक' असें म्हणतात वाचतांना वृष्टि १५ विश्वे धान्य ११ विश्वे असें वाचण्याचा प्रचार आहे

राशींचे आय आणि व्यय हे पचांगांतून दिलेले असतात आय म्हणजे लाभ आणि व्यय म्हणजे खर्च कोणत्या राशीला किती लाभ आणि किती खर्च त्या सवत्सरांत होईल, हें सागितलेलें असतें त्यावरून आपल्याला वर्ष कसें जाईल ह्याचें अनुमान त्याचे त्याला काढतां येतें ते असें —

यस्मिन्वर्षे दीर्घं आयः प्रदीष्टस्मिन्वर्षे लाभदश्चातिसौख्यं ।
क्लेशो हानिश्चार्थनाशो व्ययश्चेदेतत्सर्वं चिंतयेदष्टमूले ॥ १४८ ॥

आय आणि व्यय ह्या दोहोंचे अंक सारखे असल्यास त्या वर्षांत प्राप्ति व खर्च ह्या दोहोंचें प्रमाण सारखें असेल असें समजावें. आयस्थानचा अंक ज्यास्त असून व्ययस्थानाचा जितका कमी असेल, तितक्या प्रमाणानें खर्च कमी होऊन त्या संवत्सरांत सुख होऊन कांहीं तरी संग्रह होईल असें समजावें. लाभस्थानांपेक्षां व्ययस्थानांतील अंक ज्यास्त असेल तर त्या संवत्सरांत लाभापेक्षां खर्च ज्यास्त होईल आणि क्लेश होतील असें समजावें. याशिवाय बारीकसारीक गोष्टी पंचांगांत पुष्कळ असतात; परंतु स्थलसंकोचास्तव त्या सर्व येथें देतां येत नाहींत. त्यांपैकीं कांहीं गोष्टी या पुस्तकांत अन्यत्र आल्याच आहेत.

## वेळामुहूर्त.

दिवसाचे ८ व रात्रीचे ८ असे अहोरात्राचे १६ विभाग करून प्रत्येक विभागाला निरनिराळी संज्ञा दिलेली आहे. प्रत्येक विभाग किंवा वेळ ३॥ घटिकांची म्हणजे १॥ तासाची असते. खालीं जे वेळा-मुहूर्त दिले आहेत त्यांपैकीं काळ व रोग हे मुहूर्त अशुभ आहेत. ते सर्व कार्यांत वर्ज्य करावे. बाकीच्या वेळांचीं त्यांच्या नांवाप्रमाणे फळें समजावीं. ही माहिती पंचांगांत असते.

| तास.* | घटिका. | दिवसाच्या वेळा. | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | रवि. | चंद्र. | मंगळ | बुध | गुरु. | शुक्र. | शनि. |
| ६–७॥ | ३॥। | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ | शुभ. | चंचल. | काळ. |
| ७॥–९ | ३॥। | चंचल | काळ | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. |
| ९–१०॥ | ३॥। | लाभ. | शुभ. | चंचल. | काळ. | उद्योग | अमृत. | रोग. |
| १०॥–१२ | ३॥। | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ | चंचल. | काळ. | उद्योग |
| १२–१॥ | ३॥। | काळ. | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. | चंचल. |
| १॥–३ | ३॥। | शुभ. | चंचल. | काळ. | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. |
| ३–४॥ | ३॥। | रोग. | लाभ. | शुभ | चंचल. | लाभ | उद्योग. | अमृत. |
| ४॥–६ | ३॥। | उद्योग | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. | चंचल. | काळ. |

* सूर्योदय सहा वाजता होतो असें साधारण मान धरून वर तास (कलाक) दिले असल्यामुळें सर्व काळीं ते बरोबर असणार नाहींत, थोडा फरक पडेल. कारण, दिनमान सर्वकाळ तीस घटिकांचें असत नाहीं, हे मागें सांगितलेंच आहे. म्हणून सूर्योदय ज्या वेळेस जितकीं मिनिटें सहाच्या पूर्वी असेल त्या वेळेस तितकीं मिनिटें प्रत्येक वेळ वर दिलेल्या तासाच्या पूर्वी सुरू होईल व बदलेल, व सूर्योदय जितकीं मिनिटें सहाच्यानंतर असेल तितकीं मिनिटें प्रत्येक वेळ नंतर सुरू होईल व नंतर बदलेल. असें समजावें. याचप्रमाणें रात्रीच्याही वेळा समजाव्या.

| तास. | घटिका. | रात्रीच्या वेळा. | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | रवि. | चंद्र. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
| ६–७॥ | ३॥। | शुभ. | चंचल. | काळ. | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. |
| ७॥–९ | ३॥। | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. | चंचल | काळ | उद्योग. |
| ९–१०॥ | ३॥। | चंचल. | काळ. | शुभ. | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. |
| १०॥–१२ | ३॥। | रोग. | लाभ. | उद्योग. | चंचल | काळ. | उद्योग. | अमृत. |
| १२–१॥ | ३॥। | काळ | उद्योग | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. | चंचल. |
| १॥–३ | ३॥। | लाभ. | शुभ. | चंचल | काळ. | उद्योग | अमृत. | रोग. |
| ३–४॥ | ३॥। | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. | शुभ. | चंचल | काळ. |
| ४॥–६ | ३॥। | शुभ | चंचल. | काळ. | उद्योग. | अमृत. | रोग. | लाभ. |

## कालमानाचें कोष्टक.

**मराठी.**

६० विपळें.. .......... १ पळ.
६० पळें..... ...... १ घटिका
२ घटिका........ . १ मुहूर्त.
३० मुहूर्त किं० ६० घ० १ अहोरात्र.
१५ अहोरात्र.......... १ पक्ष.
२ पक्ष किं० पंध्रवडे १ मास.
२ मास............ १ ऋतु.
३ ऋतु . ......... १ अयन.
२ अयनें.. ...... १ वर्ष.

**इंग्रजी.**

१ पळ............ २४ सेकंद.
६० सेकंद किंवा २॥ पळें १ मिनिट.
२४ मिनिटें.......... . १ घटिका.
२॥ घटिका.......... .. १ तास.
३ तास किंवा ७॥ घटिका } १ प्रहर.
८ प्रहर किंवा २४ तास } १ दिवस. ( अहोरात्र )

## दिवस किती आला तें पहाणें.

छाया पादैरसोपेतैरेकविंशशतं भजेत् ॥
लब्धांके घटिका ज्ञेया शेषांके च पलानि च ॥ १४९ ॥

अलीकडे सर्वत्र घड्याळें झाल्यामुळें वेळ समजण्याचा सुलभ मार्ग झाला आहे. परंतु पूर्वी जेव्हां हीं नव्हतीं तेव्हां कधींही बंद न पडणारें व शीघ्रमंद न चालतां नियमित गतीनें चालणारें असें अखिल जगताचें जें एक अत्यंत विश्वसनीय अनादिसिद्ध जें घड्याळ त्यावरूनच लोक वेळ मोजीत असत. ते घड्याळ

१ मुंबईस लोहचुंबकधर्म समजण्याकरितां वेधशाळा आहे. त्याचप्रमाणें मद्रास येथें एक ज्योतिर्वेधशाळा आहे. या ठिकाणीं आकाशस्थ ज्योतींच्या वेधावरून

म्हणजे उच्चस्थानीं असलेला व देदीप्यमान भगवान् सविता होय. त्याच्या साह्यानें कालमापन करितां येतें. तें असें कीं, उन्हांत उभें राहून आपली छाया आपल्या पावलांनीं मोजावी. जितकीं पावलें होतील, त्यांत सहा मिळवावे व त्या बेरजेनें १२१ या अंकास भागावें. जो भागाकार येईल त्या घटिका, जी बाकी राहील तीं पळें समजावीं. सकाळची वेळ असल्यास तितक्या घटिका दिवस आला, व संध्याकाळची वेळ असल्यास तितक्या घटिका दिवस राहिला असें समजावें. आपली छाया आपल्या पावलांखालींच भराली, म्हणजे बरोबर मध्याह्न झाला असें समजावें.

## इंग्रजी तारिखेचा वार काढणें.

कोणत्याही तारिखेचा वार काढण्याकरितां प्रथम प्रत्येक महिन्याचे क्षेपक अंक सांगतों।—जानुआरी २३, फेब्रुआरी ६, मार्च, २०, एप्रिल ०, मे २४, जून ४, जुलई ०, आगष्ट ८, सप्टेंबर १६, अक्टोबर १२, नोवेंबर २०, डिसेंबर १६. पुढील रीतीप्रमाणें उदाहरण करून प्रथम पहिल्या तारखेचा वार काढावा म्हणजे मंतर पाहिजे त्या तारखेचा वार काढितां येईल. ज्या महिन्याच्या १ ल्या तारखेचा वार पाहिजे असेल त्या महिन्याचा वर दिलेला क्षेपक-अंक सनांत मिळवावा. त्यास चोहोंनीं भागावें आणि भागाकाराचे अंकही त्यांतच मिळवावे व त्या मिळवणींत एक वजा करावा. ( भागाकाराची बाकी सोडून द्यावी. ) जी वजाबाकी येईल त्या अंकास सातांनीं भागावें. येथें जो अंक बाकी राहील तो त्या महिन्याच्या पहिल्या तारिखेचा वार होय. बाकी १ असली म्ह० रवि, २ म्ह० सोम, ३ म्ह० मंगळ, ४ म्ह० बुध, ५ म्ह० गुरु, ६ म्ह० शुक्र आणि शून्य म्ह० शनि असें

---

घड्याळें लावितात आणि त्यावरून मग सर्वत्र खरा वेळ समजतो. पण वास्तविक ही खरा वेळ नव्हे. कारण सर्व ठिकाणीं सूर्योदय व सूर्यास्त एकाच वेळीं होत नाहींत, म्हणून प्रत्येक ठिकाणचें घड्याळ तेथील उदयास्तावरून लाविल्याशिवाय किंवा अक्षांशरेखांशावरून स्थानिक वेळ सिद्ध केल्याशिवाय जन्मपत्रिकेंतील लग्नसाधन बिनचूक होणार नाहीं. उदाहरणार्थ, मुंबईस सूर्य मध्याह्नीं येतो त्याच्या पूर्वी पुण्यास चार मिनिटें मध्याह्नीं येतो, म्हणून पुण्याचें घड्याळ मुंबईचे घड्याळापेक्षां चार मिनिटें पुढें पाहिजे. याचप्रमाणें इतर ठिकाणांविषयीं समजावें.

*जानेवार्यादिमास प्रतिउदयदिनीं वार पाहे क्रमानें ।  
इस्वी अंकांत जोडा त्रिनिसैं गुण नेखें शून्य चोवीस मानें ॥  
चारी शैन्यार्ट सोळीं रवि विम मैंबुधू पालुनीया सवाई ।  
करणें रेषेविना त्या नगहृत करुनी शेष वारांक येई ॥ १ ॥

आणावे पहिल्या तारखेस जो वार तोच ८, १५, २२, २९ या तारखास असतो त्यावरून इष्ट तारिखेचा वार काढावा

उदा०—सन १९१० मे सा० १२ रोजींचा वार पाहिजे आहे म्हणून १९१०+ महिन्याचा क्षेपक अंक २४=१९३४–२=४८३ हा भागाकार, सन आणि क्षेपक अंकाच्या बेरजेत मिळवा म्हणून १९३४+४८३=२४१७–१=२४१६–७=३४५ हा भागाकार आला बाकी १ राहिली (येथ भागाकाराच्या अंकाचें काम नाही कारण नाहीं) १ हा अंक रविवाराचा दर्शक असल्यामुळें पहिल्या तारिखेस रविवार होता व तोच आठव्या तारखेस असेल आणि बाराव्या तारिखेस गुरवार येईल

दुसरी रीति—सनांतून १८७६ वजा करून बाकी रीति वरच्याप्रमाणें

उदा०—सन १९१० मेच्या १२ तारखेचा वार काढावयाचा आहे म्हणून १९१०–१८७६–३४+ क्षेपक अंक २४=५८–४=१४ बाकी २ सोडा आतां ५८+१४=७२–१=७१–७=१० हा भागाकार आला याचें आपणाला कारण नाहीं बाकी राहिली १ म्हणून रविवार हा पहिल्या तारखेचा आणि गुरवार हा बाराव्या तारिखेचा वार होय

---

## विवाहादिसंस्कारप्रकरणम् २

### ग्रहांचे अस्तोदय आणि बाल्यवृद्धत्व.

रविणा सान्तरग्येपा ग्रहाणामस्त उच्यते ।
ततोर्याग्यार्भक प्रोक्तमूर्ध्वं बाल्यं प्रकीर्तितम् ॥ १ ॥

प्रथम दिसत असलेला कोणताही ग्रह सूर्यासंनिध येऊन सूर्याच्या तेजोमय किरणात लुप्त होऊन दिसेनासा झाला म्हणजे त्या ग्रहाचा अस्त झाला असें म्हणतात आणि सूर्यापासून त्या अंतरावर गेल्यामुळे पुन दिसू लागला म्हणजे त्याचा उदय झाला असें म्हणतात तसेंच, कोणत्याही ग्रहाच्या अस्तापूर्वीच्या काहीं नियमित दिवसाला त्या ग्रहाचे वार्धक्याचे दिवस म्हणतात आणि उदया नंतरच्या काहीं दिवसाला शिशुत्वाचे किंवा बाल्याचे दिवस असें म्हणतात सर्व ग्रहनक्षत्रादिकाला उदयास्त आहेच, परंतु गुरुशुक्राच्या अस्तोदयाचा मात्र आपल्या विवाहादि संस्कारांशीं व इतर धर्मकृत्यांशीं संबंध आहे, म्हणून त्याविषयीं येथ माहिती देतों मंगळ, बुध आणि शनि यांचे अस्त कोणत्याही कृत्याला प्रतिकूल मानिलेले नाहींत

## गुरुशुक्रांच्या अस्तोदयाचा काल.

मासमेकं गुरोरस्तं प्रायो भवति ना पुनः ।
खांद्र्यग्निदिनपर्यंतमुदयात्, कथ्यते बुधैः ॥ २ ॥
प्राच्यामस्तंगतः शुक्रः प्रतीच्यां द्विखैरदिनैः ।
दृश्यते,नोदयाचास्तं खेषुद्वी दिवसान् खलु ॥ ३ ॥
पश्चिमस्यां यदाऽस्तं चेत् प्राच्यामुदयते भृगुः ।
प्रायोदशदिनादूर्ध्वमेवं ज्ञेयो विचक्षणैः ॥ ४ ॥

गुरूचा अस्त २५ पासून ३० दिवसपर्यंत असतो आणि एकदां उदय झाला म्हणजे पुनः सुमारें ३७० दिवसपर्यंत अस्त होत नाहीं. शुक्राचा पूर्वेस अस्त झाला म्हणजे ७२ दिवसांनीं पश्चिमेस उदय होतो. पण कधीं कधीं हा अस्त ५८ पासून ७५ दिवसपर्यंतही असतो. आणि शुक्राचा एकदां उदय झाला म्हणजे पुनः २५० दिवसपर्यंत अस्त होत नाहीं. तसेंच, पश्चिमेस अस्त झाला म्हणजे सुमारें ८ पासून १० दिवसांनीं पूर्वेस उदय होतो. पूर्वेस अस्त झाला म्हणजे पश्चिमेस उदय आणि पश्चिमेस अस्त झाला म्हणजे पूर्वेस उदय असें नेहमीं असतें. पश्चिमेस अस्त असतो तेव्हां नेहमीं शुक्र वक्री असतो व उदय प्रसंगीं मार्गी असतो. पूर्वेस उदय किंवा पूर्वेस अस्त होतो म्हणजे तो ग्रह पूर्वदिशेकडे दिसतो किंवा दिसेनासा होतो. याचप्रमाणें पश्चिमेच्या उदयास्तांविषयीं जाणावें.

## बाल्यवृद्धत्वाचे त्याज्य दिवस.

त्यजेद्दशाहं शिशुवृद्धयोश्च सितेज्ययोश्चेति वदन्ति गर्गाः ।
कालांशतुल्यानि दिनानि चैके सप्ताहमन्येऽन्वपरे त्रिपक्षम् ॥ ५ ॥

गुरुशुक्रांच्या असतांत गर्भाधानादि संस्कार करूं नये असें [illegible] पूर्वी कांहीं दिवस, म्हणजे त्या ग्रहाच्या वृद्धावस्थेत [illegible] कांहीं दिवस, म्हणजे त्या ग्रहाच्या बाल्यावस्थेत हीं कृत्यें करूं नयेत असा नियम केलेला आहे. या नियमांविषयीं बराच मतभेद [illegible]. गुरुशुक्रांच्या [illegible] बाल्याचे आणि वृद्धत्वाचे उभयपक्षीं दहा दहा दिवस सोडावे असें गर्गमुनींचे

---

१ जेव्हां एखादा ग्रहाची गति उलट चालूं लागते (म्हणजे कृत्तिकेंतून भरणींत, भरणींतून अश्विनींत इ॰) तेव्हां तो ग्रह वक्री आहे असें म्हणतात. वक्रगति संपून पुनः सरळ चालूं लागल्यावर (म्हणजे अश्विनींतून भरणींत, भरणींतून कृत्तिकेंत इ॰) तो ग्रह मार्गी झाला असें म्हणतात. मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि या पांच ग्रहांच्याच गतींत हा प्रकार असतो.

मत आहे. कित्येकांच्या मतें कालांशतुल्य दिवस म्हणजे गुरूचे अकरा आणि शुक्राचे नऊ दिवस सोडावे असें आहे; कित्येकांच्या मतें बालवृद्धत्वाचे सात दिवस सोडावे असें आहे; आणि तीन तीन दिवस सोडावे असेंही पुष्कळांचें मत आहे. तेव्हां गुरुशुक्रांच्या उदयास्तसमयीं पूर्वपश्चात् निदान तीन दिवस सोडून शुभकृत्य केलें असतां हरकत नाहीं.

## गुरुशुक्रांच्या अस्तांत वर्ज्यकृत्यें.

वापीकूपतडागयज्ञगमनं चौलं प्रतिष्ठाव्रतम् ।
विद्यामंदिरकर्णवेधनमहादानं गुरोः सेवनम् ॥
तीर्थस्नानविवाहकाम्यहवनं मंत्रोपदेशं शुभम् ।
दूरेणैव जिजीविषुः परिहरेदस्तं गुरोर्वै भृगोः ॥ ६ ॥

विहीर, तळाव इत्यादि खणणें; यज्ञ करणें, यात्रेला जाणें, चौल करणें, देवप्रतिष्ठा, विद्यारंभ, नवें घर बांधणें किंवा नव्या घरांत रहावयास जाणें, मुलांचा कान टोंचणें, प्रथम गुरूपदेश घेणें, तीर्थस्नान, विवाह, कामनिक हवन, मंत्रतंत्र शिकणें इत्यादि कृत्यें गुरुशुक्रांच्या अस्तांत करूं नयेत, असें सांगितलें आहे.

## सिंहस्थ गुरूचा दोष.

उद्यानचूडाव्रतबन्धदीक्षा विवाहयात्रा च वधूप्रवेशः ।
तडागकूपत्रिदशप्रतिष्ठा बृहस्पतौ सिंहगते न कुर्यात् ॥ ७ ॥

गुरशुक्रांच्या अस्तांत जीं कृत्यें करूं नयेत म्हणून वर लिहिलें आहे, तीं कृत्यें सिंहराशीस गुरु असतांनाही करूं नयेत.

## सिंहस्थ गुरुविषयीं अपवाद.

सिंहे गुरौ सिंहलवे विवाहो नेष्टोथ गोदोत्तरतश्च यावत् ।
भागीरथीयाम्यतटे हि दोषो नान्यत्र देशे तपनेऽपि मेषे ॥ ८ ॥

सिंहराशीला गुरु असून सिंहराशीच्या नवांशीं असेल त्या वेळीं मात्र विवाह करूं नये, म्हणजे इतर राशींच्या नवांशांत गुरु असून विवाह केला असतां सिंहस्थाचा दोष नाहीं. गोदावरी आणि भागीरथी ह्या दोन नद्यांमधील प्रदेशांत मात्र विवाहादि शुभकार्यांला सिंहस्थाचा दोष आहे. इतर देशांत नाहीं. तसेंच सिंहस्थांत मेषराशीला सूर्य असतां सिंहस्थाचा दोष नाहीं, असे सिंहस्थाचे तीन अपवाद आहेत. परंतु देशाचाराप्रमाणें आचरण करावें. देशाचाराची म्हणजे समाजाची संमति असेल तर शास्त्राची हरकत नाहीं.

## पुरुषविवाहकाल.

पुरुषाचा विवाह अमुक्याच वर्षी करावा असा शास्त्राचा फारसा निर्बंध नाहीं. तरी वीस वर्षेपर्यंत मुलाचें लग्न करूं नये असा शास्त्रकारांचा हेतु दिसतो. कारण आश्वलायनगृह्यसूत्रांत 'अष्टमे वर्षे ब्राह्मणमुपनयेत् । आषोडशाद्ब्राह्मणस्यानतीतः कालः' । म्हणजे ब्राह्मणाच्या उपनयनाचा मुख्य काल आठवें वर्ष व गौणकाल सोळा वर्षेपर्यंत असतो, असें सांगितलें आहे. उपनयन झाल्यानंतर बारा वर्षें किंवा अध्ययन पूर्ण होईपर्यंत ब्रह्मचर्य राखावें व नंतर इष्ट वाटल्यास गृहस्थाश्रम घ्यावा, असें मनुस्मृतींत तिसऱ्या अध्यायांत आरंभींच दिलें आहे. शिवाय, इतर स्मृतिग्रंथांतून वराचें वय अठरापासून तीसपर्यंत असावें, असा उल्लेख आढळतो. यावरून पुरुषाचें लग्न लहानपणीं म्हणजे विद्यार्थिदशेंत करणें ही गोष्ट शास्त्रविरुद्ध नसली तरी शास्त्रोक्तही नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. सांप्रत, मुलाचें अल्पवयांत लग्न करणें इष्ट नाहीं, ही समजूत अनेक कारणांमुळें दिवसेंदिवस अधिक रूढ होत चालली आहे.

## कन्याविवाहकाल.

कन्येच्या विवाहकालाविषयीं दोन प्रकारचीं मतें आढळतात. धर्मसिंधुकर्ते, मरीचि, दक्ष, इत्यादि ग्रंथकारांचें मत आठ वर्षांपुढें आणि दहा वर्षांचे आंत कन्येचा विवाह करावा असें आहे. आणि त्यावरून कित्येकांनी अशी दृढ समजूत झालेली दिसते कीं, दहा वर्षांपुढें कन्येचा विवाह करणें ही गोष्ट अगदीं शास्त्रविरुद्ध आहे; पण ती यथार्थ नाहीं. दहा वर्षांनंतर आणि ऋतुकालापूर्वी किंवा त्या सुमारास कन्येचा विवाह केला असतां सर्वथैव धर्मशास्त्रसंमत आहे, हें खालीं दिलेल्या निरनिराळ्या श्रुति, सूत्र, स्मृति व पुराण ग्रंथांतील वचनांवरून ध्यानीं येईल. जर उत्कृष्ट वर म्हणजे वय, विद्या, वैभव वगैरे गुणांनीं युक्त, असा वर मिळत असेल, तर मात्र आठव्या वर्षीही मुलीचें लग्न उरकून घ्यावें, असा मन्वादि स्मृतिकारांचा अभिप्राय आहे. असो; आतां प्रौढविवाहाच्या समर्थनार्थ प्रथम एक दोन श्रुतिवचनें देतों. कोणतीही गोष्ट करण्याविषयीं किंवा न करण्याविषयीं वेदांमध्यें स्पष्ट आज्ञा कोठेंच आढळत नाहीं; तथापि अमक्यानें अमुक प्रसंगीं अमुक केलें, अशा अर्थाचीं वचनें मात्र पुष्कळ आढळतात; त्यांवरून वेदकालीन रीतिभातींचा निर्णय करणें अयुक्त होणार नाहीं. खालीं दिलेला वैदिक मंत्र ऋग्वेदसंहितेंतील आठव्या अष्टकाच्या तिसऱ्या अध्यायांतील "सत्येनोत्तभिता" नामक सूक्तांतील आहे. हें पंचवर्गात्मक सूक्त विवाहविधिच्या [illegible] गौरीहराची पूजा करीत असतां ब्राह्मणांनीं पठन करावें व [illegible] अंतःपट धरून मंगलाष्टकें म्हणावीं, असा प्रघात आहे.

सोमो वधूयुरभवदश्विनास्तामुभा वरा ।
सूर्यां यत्पत्ये शंसतीं मनसा सविता ददात् ॥ अ० ३ व० २१

या मन्त्रावरील सायणाचार्यांचे भाष्य आहे ते असें —

सोम० वधूयु० वधूकाम० वरः अभवत् । तस्मिन् समये अश्विनाऽश्विनौ उभा उभौ वरा वरौ आस्ताम् । यत् यदा सूर्यां पत्ये शंसतीं पतिं कामयमानां पर्याप्तयौवनामित्यर्थः । मनसा सहिताय सोमाय वराय सविता तत्पिता अददात् दित्सां चकार ॥

अर्थ—आपणाला स्त्री असावी अशी इच्छा सोमाच्या मनात उत्पन्न झाली त्या समयीं अश्विनीकुमारही लग्नासाठीं वर तयार होते, परंतु आपल्या सूर्यानामक कन्येवर सोमाचें मन बसलें आहे असें पाहून, पतीविषयीं वासना उत्पन्न झाली आहे जिला, अशी जी पर्याप्तयौवना म्हणजे यौवनपूर्ण झालेली कन्या सूर्या, तिला तिच्या बापानें सोमास देण्याचें ठरविलें. यावरून सूर्या विवाहापूर्वी ऋतुमती असली पाहिजे, हे स्पष्ट दिसतें. याच अर्थाचा दुसराही मंत्र आहे.

कामद्युवं विमदायोहथुर्युवम् । ऋग्वे० अष्ट० ८ अ० व० ११

भाष्य—कामद्युवं कामस्यदीपनीं घेनपुत्रीं विमदायर्थं युवं ऊहथु० प्रापयथ ।

अर्थ—कामजागृति करणारी वेनराजाची कन्या तुम्हीं विमदऋषीला दिली. येथें कामस्य दीपनीं या पदानें येमकन्या विवाहसमयीं ऋतुमती असली पाहिजे हेच सिद्ध होतें. ब्राह्मविवाहविधि करितांना सप्तपदीच्या प्रसंगीं जे मंत्र म्हटले जातात ते देखील प्रौढ वधूलाच उद्देशून आहेत. त्यांपैकीं एकच मुख्य येथ देतों.

अमोहमस्मि सात्वं सा त्वमस्य मोहम् ।
सामाहमस्मि ऋक्त्वं द्यौरहं पृथिवीत्वम् ।
तावेह विवहावहै सह रेतो दधावहै ।
प्रजां प्रजनयावहै पुत्रान् विंदावहै बहून् ॥

या मन्त्रांत "प्रजां प्रजनयावहै०" म्हणजे आपण प्रजा निर्माण करूं वगैरे जें आहे तें आठदहा वर्षांच्या मुलीला समजणें त्यास कठिण आहे. तसेंच, जवळ जवळ याच अर्थाचे "प्रजाभ्यः पंचपदी भव" वगैरे मंत्र आहेत, त्या मंत्रांवरून प्राप्तयौवना वधूचाच विवाह करावा, असें बोधित होतें. असो; आतां सूत्रकार लग्नसमयीं कन्येच्या वयाची काय इयत्ता ठरवितात तें पाहूं. आश्वला गृह्यसूत्रांत वधू अमुक वयाची असावी, असें जरी निश्चित वचन नाहीं, तरी पुढील वाक्यांवरून ती प्रौढच असली पाहिजे, असा गर्भितार्थ निघतो

अग्राता या पदाचा अर्थ 'कामस्पृहा यस्या नोत्पन्ना' म्हणजे जिला कामेच्छा उत्पन्न झाली नाहीं, असा केला आहे. यावरून प्रौढ कन्येचाच विवाह करावा असा अर्थ ध्वनित होतो.

त्रिंशद्वर्षोद्वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम् । मनु० अ० ९ श्लो० ९४.

तीस वर्षांच्या मनुष्यानें स्वतःला पसंत अशी बारा वर्षांची कन्या वरावी.

अतो रजोदर्शनं विवाहात्पूर्वं यथा न भवति तथा कुर्यादित्युक्तं भवति ॥ संस्कारमयूखकार.

विवाहापूर्वी रजोदर्शन होणार नाहीं अशी तजवीज (पित्यानें किंवा पालकानें) ठेवावी म्हणजे रजोदर्शनापूर्वी लग्न करावें.

एवं च यावद्रजोदर्शनं न भवति तावत्कन्योद्वाहो न विरुद्ध इत्युक्तं भवति । स्मृतिचंद्रिकाकार.

कोणीकडून तरी रजोदर्शनापूर्वी कन्येचा विवाह केला असतां शास्त्रविरुद्ध होत नाहीं.

प्रयच्छेन्नग्निकां कन्यामृतुकालभयात्पिता ।
ऋतुमत्यां हि तिष्ठन्त्यां दोषः पितरमृच्छति ॥ १० ॥ वसिष्ठ.

कन्येला ऋतुप्राप्ति होईल ह्या भीतीनें रजोदर्शनापूर्वी तिचें दान करावें. कारण ऋतुमती कन्या अविवाहित ठेविली असतां तिच्या बापाला दोष लागतो.

तस्मादुद्वाहयेत्कन्यां यावन्नर्तुमती भवेत्—यम.

म्हणून कन्येला ऋतुप्राप्ति होण्यापूर्वी तिचा विवाह करावा.

ऊर्ध्वं दशाब्दाया कन्या प्रागरजोदर्शनात्तु सा ।
गांधारी सा समुद्वाह्या चिरंजीवितुमिच्छता ॥११॥ प्रयोगपारिजात.

दहा वर्षांनंतर व रजोदर्शन होण्यापूर्वी कन्येला गांधारी अशी संज्ञा आहे. ज्याला चिरंजीव व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें अशा कन्येशीं विवाह करावा.

वर दिलेल्या वचनांवर कदाचित् एक शंका निघण्यासारखी आहे ती अशी कीं, 'दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला' या पराशरवचनाप्रमाणें दहा वर्षांनंतर कन्येला रजस्वला अशी संज्ञा प्राप्त होते आणि म्हणूनच दहा वर्षांपुढें कन्येचा विवाह अयुक्त मानिला आहे; परंतु या वाक्याचा अर्थ स्मृतिचंद्रिका व संस्कारमयूख या ग्रंथांत असा दिला आहे कीं, दहा वर्षांपासून कन्येला रजस्वला ही संज्ञा प्राप्त न होतां दहा वर्षांनंतर कोटीं कालानें प्राप्त होते. कारण

१ नग्निकां तु वदेत् कन्यां यावन्नर्तुमती भवेत्—जोंपर्यंत कन्येला ऋतु प्राप्त झाला नाहीं तोंपर्यंत तिला नग्निका ह्मणतात.

'अत ऊर्ध्वं रजस्वला' असें म्हणून नंतर लागलेंच 'प्राप्ते तु द्वादशे वर्षे यः कन्यां न प्रयच्छति' असें वचन पराशरानें ग्रथित केलें आहे व अकराव्या वर्षांचा कांहींच उल्लेख त्यानें केला नाहीं, त्यावरून अकराव्या वर्षी रजस्वलात्व दोष नाहीं हें सहज ध्वनित होतें आणि तेंच प्रायः सर्वत्र अनुभवाशीं जुळतें.

> विवाहे वितते तंत्रे होमकाल उपस्थिते ।
> कन्यामृतुमतीं दृष्ट्वा कथं कुर्वंति याज्ञिकाः ॥ १२ ॥
> स्नापयित्वा तु तां कन्यामर्चयित्वा यथाविधि ।
> युंजानामाहुतिं दत्वा ततस्तन्त्रं प्रवर्तयेत् ॥१३॥ यज्ञपार्श्व. नि० सिं०

विवाहविधि चालला असतां कन्या ऋतुमती होईल तर तिला हविष्मतीनें स्नान घालून व दुसरे वस्त्रालंकार देऊन 'युंजानानेति' मंत्रानें होमांत आहुती देऊन नंतर पुढील विवाहविधि करावा. यावरून लग्नांत आसन्नार्तवा किंवा न्हाण आलेली वधू असली तरी चालेल असा अर्थ निघतो. येथें कन्येच्या पित्याला प्रायश्चित्त वगैरे कांहीं सांगितलेलें नाहीं. वरील दोन श्लोक किंचित् पाठभेदानें आपस्तंबस्मृतींत पठण केले आहेत, त्यावरून आपस्तंबाचेंही मत, लग्नांत आसन्नार्तवा वधू असली तरी चालेल, असें दिसतें. रजोदर्शनानंतर कन्येचा विवाह केला असतां पित्यानें प्रायश्चित्त घ्यावें असें आश्वलायनस्मृतींत सांगितलें आहे; तथापि कांहीं ग्रंथांतून प्रायश्चित्त न सांगतां संकटकालीं ऋतुदर्शन झाल्यावर देखील कन्येचा विवाह केला तरी चालेल, अशीं वचनें आढळतात; तीं खालीं दिलीं आहेत.

> काममामरणात्तिष्ठेद्गृहे कन्यर्तुमत्यपि ।
> न चैवैनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ॥१४॥ मनु० अ० ९ श्लो० ८९.

ऋतु प्राप्त झाल्यावर देखील कन्या पित्याच्या घरीं अविवाहित राहिली तरी चिंता नाहीं; परंतु गुणहीन म्हणजे वय, विद्या वपु इत्यादिकांनीं वधूला अयोग्य अशा वराला ती कधींही देऊं नये.

> ऋतुदर्शनेपि न दद्याद्यावद्गुणवान्वरो न प्राप्तः । मेधातिथि.

वर दिलेल्या मनुवचनावर मेधातिथीची ही टीका आहे; त्याचा अर्थ वरच्याच प्रमाणें आहे. स्मृतिकारांचा या संबंधानें असा स्पष्ट आशय दिसतो की, सुस्थळ न मिळाल्यामुळें कन्या ऋतुमती झाली तरी चालेल; परंतु रजस्वलात्व दोषाच्या भयानें अहस्त्याच अयोग्य वराला ती देऊन टाकूं नये. तथापि उद्दामरगानें ~~~ ऋतुदर्शनानंतर कन्या अविवाहित ठेवूं नये.

> दद्याद्गुणवते कन्यां नग्निकां ब्रह्मचारिणे ।
> अपि वा गुणहीनाय नोपरुंध्याद्रजस्वलाम् ॥

नग्निका म्हणजे तिला ऋतुदर्शन झालें नाहीं अशी कन्या सद्गुणी वराला द्यावी. तसा वर न मिळाल्यामुळे तिला ऋतुदर्शन झालें तरी हरकत नाहीं. परंतु मूर्ख वराला ती कदापि देऊं नये.

दशवर्षादूर्ध्वं विवाहो निषिद्धः। तथापि दातुरभावे द्वादशषोडशाब्दे ज्ञेये रजोभावे इदम् ॥ निर्णयसिंधु

कन्येचा विवाह दहा वर्षांनंतर निषिद्ध होय, तथापि योग्य दात्याचा अभावं असेल तर रजोदर्शन झालें तरीही बाराव्या किंवा सोळाव्या वर्षी कन्येचा विवाह करावा. तथापि, ही १६ वर्षांची सवड शास्त्रकारांनीं अडचणीपुरतीच ठेविली आहे, हे विसरू नये. याशिवाय ऋतुप्राप्ति झाल्यानंतर तीन वर्षेपर्यंत पित्राहेची वाट पाहून चवथ्या वर्षी कन्येनें स्वतः योग्य वर वरावा, अशाविषयीं मनु, बौधायन इत्यादिकांचीं वचनें आहेत, त्यांतून कांहीं येथे देतों.

त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ॥ १६ ॥

ऋतु प्राप्त झाल्यानंतर बाप आपणांस दान करितो किंवा नाहीं याची तीन वर्षे वाट पाहून, नंतर कन्येनें आपल्याला योग्य पति शोधून त्याच्याशीं विवाह करावा.

त्रीणि वर्षाण्यृतुमतीं यः कन्यां न प्रयच्छति ।
स तुल्यं भ्रूणहत्यायै दोषमृच्छत्यसंशयम् ॥ १७ ॥
न याचते चेदेवं स्याद्याचते च पृथक् पृथक् ।
ततश्चतुर्थे वर्षे तु विन्देत सदृशं पतिम् ॥ १८ ॥ बौधायन.

कन्या ऋतुमती झाल्यानंतर तीन वर्षांचे आंत मुलगी मागण्याकरितां कोणी आला असून जर बाप तिचें दान करणार नाहीं, तर प्रत्येक ऋतूला त्याला भ्रूणहत्येचें पातक लागतें. परंतु कोणी याचमानच नसेल तर मात्र पित्याला मुळींच दोष नाहीं. कन्येच्या घरीं जाऊन वरानें किंवा त्याच्या पित्यानें मुलगी मागावी असा प्रघात शास्त्राला अनुसरून पूर्वी असे. मुलीनें ऋतुदर्शनानंतर तीन वर्षेपर्यंत बाप आपलें दान करितो कीं नाहीं हें पाहून नंतर स्वतः वर शोधावा. असो, याप्रमाणें अनेक स्मृतिकारांचीं प्रौढ विवाहाविषयीं अनुकूल मतें आहेत. आतां, प्राचीन काळीं प्रौढ वधूचेच विवाह होत असत अशाविषयीं पुराणांतील कांहीं आधार देतों —

मथुरायां यदुश्रेष्ठो दाशार्ह इति विश्रुतः ।
कृतोद्वाहः सराजेन्द्रः संप्राप्य निजमंदिरम् ।
रात्रौ तां शयनारूढः संगमाय समाह्वयत् ॥ १९ ॥ स्कंदपु० ब्रह्मो०

आसीदियं पूर्वभवे काचिद्ब्राह्मणकन्यका।
सा भर्तारमनुप्राप्य नवयौवनशालिनी।
कंचित्कालं शुभाचारा रेमे बंधुभिरावृता ॥ २० ॥ स्कंदपु० महो०

स शीलयन् देवयानीं कन्यां संप्राप्तयौवनाम्।
पुष्पैः फलैः प्रेषणैश्च तोषयामास भारत ॥ २१ ॥ महाभारत.

अशीं हीं तीन पौराणिक उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत पहिल्या उदाहरणांत विवाहकालीं वधू प्रौढ असून पतिसमागमाला योग्य होती. दुसऱ्यांत नवयौवनशालिनी म्हणजे नुकतीच यौवनदशेनें युक्त झालेली होती. तिसऱ्या उदाहरणांत शुक्राची कन्या देवयानी ही प्राप्तयौवनाच होती. याशिवाय पुराणकालीं प्रौढ वधूंचेच विवाह होत असत, अशीं वर्णनें पुराणांत सर्वत्र आहेत. सारांश, प्रौढ वधूंचे विवाह शास्त्रविरुद्ध नाहींत, हें वर दिलेल्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त वचनांवरून सिद्ध होतें. आतां ज्या स्मृतिकारांनीं आठव्या वर्षापासून दहाव्या वर्षापर्यंत कन्येचा विवाह करावा असें लिहिलें आहे, त्यांचा आशय इतकाच असला पाहिजे कीं, कांहीं झालें तरी कन्येला विवाहापूर्वी ऋतुदर्शनाचा दोष लागूं नये. म्हणून ऋतुदर्शनाचा जो सामान्य काल पधरावें किंवा सोळावें वर्ष त्यापूर्वी निदान चार पांच वर्षें तरी मुलींचें लग्न करावें असें त्यांनीं ठरविलें असावें. आणि त्यामुळें कन्याविवाहाच्या वयाची इयत्ता आंत आंत येत जाऊन शेवटीं दहावें वर्ष हा लग्नाचा अतीत काल त्यांनीं ठरविला असावा. पण ही बालविवाहाची रूढि अस्तित्वांत येत गेली त्याच्या बरोबर आपत्तिही उत्पन्न झाल्या आहेत, असा सर्वांचा अनुभव आहे. तसेंच स्त्री पुष्पवती झाल्यानंतर तिला अविवाहित ठेविल्यामुळेंही भलत्याच आपत्ति उत्पन्न झाल्याचीं उदाहरणें आहेत. यासाठीं समंजस आईबापांनीं ऋतुदर्शन कालाचे सुमारास कन्येचा विवाह करावा हेंच युक्त आहे. सूत्रकारांच्या किंवा बौधायनाच्या अनुशासनाप्रमाणें संकटकालीं आमक्षातें[1]या किंवा ऋतुमती वधूंचे विवाह केले असतां, निदान आठपासून चवदा वर्षांचे आंतील बालविधवा आपल्या समाजांत दृष्टीस पडणार नाहींत. धर्मशास्त्र म्हणजे धार्मिक कायदे, हे विद्वान्, तेजस्वी व नीतिमान् पुरुषांनीं वय मनुष्यांनींच केलें असल्यामुळें तें ईश्वरकृतीप्रमाणें सर्वथैव निर्दोष व सर्वकालीं अबाधित असणें शक्य नाहीं; व या कारणामुळेंच समकालीन नमणाऱ्या स्मृतिकारांची या विषयासंबंधीं एकवाक्यताही नाहीं. तस्मात् कालानुरोधाप्रमाणें समाजाच्या सोयीकरितां धार्मिक नियमांतही अत्यंत विचारपूर्वक फेरफार होणें अगत्याचें असतें. परंतु अतिरेक न होऊं देण्याविषयीं जपलें पाहिजे.

## वधूचें लक्षण.

कुलमग्रे परीक्षेत ये मातृतः पितृतश्चेति । आश्व० सूत्र.

अनन्यपूर्विकां कान्तामसपिंडां यवीयसीम् ।

अरोगिणीं भ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् ॥ २२ ॥ याज्ञवल्क्य.

कन्येच्या मातृवंशाची व पितृवंशाची परीक्षा करून नंतर त्या कन्येशीं विवाह करावा, म्हणजे सुकुलांतील कन्या वरावी. तसेंच, दान किंवा उपभोग यासंबंधीं जिचें ग्रहण पुरुषान्तरानें केलें नाहीं, आपल्याशीं जिचें सापिंड्य नाहीं, आपल्यापेक्षां वयानें व शरीरानें कमी, निरोगी, सोदर भ्राते असलेली, आपल्या गोत्राहून भिन्न गोत्रांत उत्पन्न झालेली आणि आपल्याशीं सप्रवर नाहीं अशा कुलांतील कन्येशीं विवाह करावा. त्याप्रमाणेंच 'जनपदधर्मा ग्रामधर्माश्च तान् विवाहे प्रतीयात्' या आश्वलायनसूत्रोक्तीप्रमाणें देशाचार, ग्रामाचार व कुलाचार यांचाही विवाहकालीं अवश्य विचार करावा.

## सप्रवर.

असमानप्रवरैर्विवाहः ।

स्वगोत्रोत्पन्न कन्येशीं विवाह होत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. परंतु ज्या गोत्रांचा परस्पर शरीरसंबंध होत नाहीं अशीं काहीं गोत्रें आहेत. कारण, त्यांचे प्रवर सारखे असतात. म्हणून तसा संबंध घडल्यास तो दोषार्ह असून त्यास सप्रवर म्हणतात. तीं गोत्रें कोणतीं हें त्यांच्या प्रवरांसह खालीं सांगतों.

भारद्वाजाश्च गार्ग्याः कपिकुलमिलिता जामदग्न्याश्च वत्साः ।
बाभ्रव्याः कौशिकाः स्युः प्रवरसमयुता विष्णुवृद्धानिरुद्धाः ॥
वासिष्ठाः कौंडिण्येयाः पुनरपि मिलिताः काश्यपाः शांडिलेयाः ।
ज्ञेया विप्रैर्द्विरेते परिणयसमये वर्जनीयाः प्रयत्नात् ॥ २३ ॥

पुढें जीं कोष्टकें दिलीं आहेत त्या प्रत्येकांत असलेल्या गोत्रांचा परस्परांशीं विवाहसंबंध होत नाहीं असें समजावें. गोत्रभूत जो पुरुष त्याचा बाप, आजा पणजा हेच प्रवर होत.

---

१ सापिंड्यासंबंधीं माहिती सापिंड्यदीपिका, धर्मसिन्धु इत्यादि ग्रंथांत पहावी हा विषय दुर्बोध असल्यामुळे येथें विस्तृत रीतीनें लिहावा लागला असता, म्हणून विस्तारभयास्तव या लहानशा पुस्तकांत त्याचा समावेश केला नाहीं.

| | गोत्र | प्रवर |
|---|---|---|
| १ | भारद्वाज<br>गार्ग्य<br>कपि. | आंगिरस बार्हस्पत्य भारद्वाजेति.<br>आंगिरस सैन्य गार्ग्येति.<br>आंगिरस आमैह्य औरुक्षेति. |
| २ | जामदग्न्य<br>वत्स | भार्गव च्यावनाप्नवान और्व जामदग्न्येति. |
| ३ | बाभ्रव्य<br>कौशिक | विश्वामित्र अवदल बाभ्रव्येति.<br>वैश्वामित्राघमर्षण कौशिकेति. |
| ४ | विष्णुवर्धन<br>निध्रुवन | आंगिरस पौरुकुत्सत्रासदस्येति. |
| ५ | वासिष्ठ<br>कौंडिण्य | वासिष्ठेंद्र प्रमदा भरद्वस्विति<br>वासिष्ठ कौंडिण्य मैत्रावरुणेति. |
| ६ | काश्यप<br>शांडिल्य. | काश्यपावत्सारासितेति. किंवा, काश्यपावत्सार नैध्रुवेति<br>शांडिलासितदेवलेति. |
| ७ | अत्रि | आत्रेयार्चनानस श्यावाश्वेति ( अत्रिगोत्राचे कोणत्याही गोत्राशी जमतें ह्मणून "अत्रीची सर्वत्र मैत्री" अशी ह्मण पडली आहे ) |

## कन्याक्रयविक्रयाचा दोष.

न कन्यायाः पिता विद्वान् गृह्णीयाच्छुल्कमण्वपि ।
गृह्णन् शुल्कं हि लोभेन स्यान्नरोऽपत्यविक्रयी ॥ २४ ॥
स्त्रीधनानि तु ये मोहादुपजीवन्ति बांधवाः ।
नारीयानानि वस्त्रं वा ते पापा यान्त्यधोगतिम् ॥ २५ ॥

अपत्यविक्रय करून त्याचें द्रव्य घेणें ह्यास मनूनें शुल्क असें म्हटलें आहे. आणि जो बाप कन्याविक्रय करून द्रव्य घेईल किंवा उपजीविकेकरितां स्त्रीधनाचा अपहार करील, तो अधोगतीस जाईल असेंही सांगितलें आहे. मुलाचा हुंडा घेणें हा देखील मनूच्या मताप्रमाणें अपत्यविक्रयच होय. परंतु हुंडा घेणें ही गोष्ट लोकांत वाईट समजली जात नाहीं! आणि कन्याविक्रयमात्र लोक निंद्य समजतात! तथापि शास्त्रदृष्ट्या शुल्क किंवा हुंडा घेणारे दोघेही सारखेच दोषी आहेत. तसेंच कोणत्याही पुरुषानें वधू विकत घेऊन तिचें पाणिग्रहण करूं नये. कारण मनूनें असें सांगितलें आहे कीं, "क्रयक्रीता च या कन्या पत्नी सा न विधीयते"। वधू विकत घेऊन तिचें पाणिग्रहण केलें असतां ती वधू, पत्नी या पवित्र संज्ञेला पात्र होत नसून दासी होते. आणि धर्मकृत्यांत दासी वर्ज्य मानिलेली आहे. यासाठीं विचारी पुरुषानें वधू विकत घेऊन तिच्याशीं विवाह करूं

नये म्हणजे त्या योगानें कन्याविक्रयाच्या पातकाला उत्तेजन दिल्याचा दोष लागणार नाहीं, व दासीच्या पाणिग्रहणापासून घडणारें पातकही टळेल, असे दोन अर्थ साधिता येतील

## विवाहास निषिद्धकन्या.

मातुः सपत्न्या भगिनीं तत्सुतां च विवर्जयेत् ।
पितृव्यपत्नीभगिनीं तत्सुतां च विवर्जयेत् ॥ २६ ॥
पैतृष्वस्रेयीं भगिनीं स्वस्रीयां मातुरेव च ।
एतास्तिस्रस्तु भार्यार्थे नोपयच्छेत बुद्धिमान् ॥ २७ ॥
मातुलस्य सुतामूढ्वा मातृगोत्रां तथैव च ।
समानप्रवरां चैव त्यक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥ २८ ॥

वधूचें लक्षण पूर्वी सांगितलें आहे तें ध्यानांत ठेवून, त्याशिवाय आतेबहीण, मावसबहीण व मामेबहीण यांच्याशीं विवाह करू नये किरयेक ठिकाणीं मामे बहिणीशीं लग्न करण्याचा परिपाठ आहे, पण तो गौण पक्ष होय आपल्या सावत्र आईच्या बहिणीची कन्या, चुलत्याच्या बायकोची बहीण, व तिची कन्या, सावत्र मातेची बहीण व त्या बहिणींच्या कन्या ह्यांबरोबर विवाह करू नये तसेंच, 'ज्येष्ठो भ्राता पितुः समः' । म्हणजे वडील भाऊ बापाप्रमाणें होय, असें वचन असल्या मुळें, ज्येष्ठ भ्रात्याच्या पत्नीची बहीण ती आपणाला मावशीप्रमाणें होते, म्हणून तीही वर्ज्य करावी, असें कित्येक म्हणतात माध्यंदिन शाखेच्या ब्राह्मणांनीं मामाचें गोत्र वर्ज्य करावें असें सांगितलें आहे, म्हणजे त्या गोत्रांतील किंवा त्या गोत्राच्या समान प्रवरांतील कन्येशीं विवाह करू नये किंवा त्या गोत्रांत कन्या देऊ नये तथापि अडचणीच्यावेळीं केवळ मामाचें गोत्र पाळावें प्रवराचा विचार करण्याची जरूरी नाहीं, असें शास्त्रमत आहे

## विवाहाचे प्रकार.

ब्राह्मो दैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।
गांधर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥ २९ ॥

१ ब्राह्म, २ दैव, ३ आर्ष, ४ प्राजापत्य, ५ आसुर, ६ गांधर्व, ७ राक्षस आणि ८ पैशाच असे आठ प्रकारचे विवाह आहेत. त्यांपैकीं सांप्रत ब्राह्म आणि गांधर्व असे दोन प्रकारचे विवाह मात्र प्रचारांत आहेत त्यांचीं लक्षणें येथ सांगतों

## ब्राह्मविवाहाचें लक्षण.

आच्छाद्य चार्चयित्वा च श्रुतिशीलवते स्वयम् ।
आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥ ३० ॥

विद्वान् आणि गुणवान् असा वर आपल्या घरीं आपण बोलावून आणून, वस्त्रांनीं आच्छादित आणि अलंकारांनीं यथाशक्ति विभूषित केलेली आपली कन्या त्यास विधियुक्त देणें अशा प्रकारच्या विवाहाला ब्राह्मविवाह म्हणतात.

## गांधर्वविवाहाचें लक्षण.

इच्छयान्योन्यसंयोगः कन्यायाश्च वरस्य च ।
गांधर्वः स तु विज्ञेयो मैथुन्यः कामसंभवः ॥ ३१ ॥

कन्या आणि वर यांच्या परस्पर प्रेमानें व विषयाच्या लालसेनें होणारा जो विवाह त्यास गांधर्व किंवा प्रीतिविवाह म्हणतात. सर्व विवाहांत विषयाचा उद्देश आहेच आहे, तेव्हां वरील श्लोकांत 'कामसंभवः' हें पद विशेषेंकरून घालण्यांत ग्रंथकाराचा इतकाच उद्देश दिसतो कीं, कामेच्छा उत्पन्न होऊन विवाहाची आवश्यकता भासण्याइतकें प्रौढ दंपत्य असावें; म्हणजे परस्परांच्या संमतीनें हा विवाह व्हावा. तथापि दात्याची म्हणजे पिता किंवा पालक यांचीही संमति त्याला अवश्य पाहिजे. कारण, त्यावांचून विवाह सशास्त्र होत नाहीं. असो; हा प्रीतिविवाह असल्यामुळें अर्थात् पत्रिका पाहून घटित जमविण्याची आवश्यकता नाहीं. *ब्राह्मणांवांचून इतर वर्णांला मात्र गांधर्वविवाहाची मोकळीक शास्त्रकारांनीं ठेविली आहे.*

## वधूवरांचें पत्रिकामेलन.

वर्णो वश्यं तथा तारा योनिर्ग्रहगणस्तथा ।
भकूटं नाडिमैत्री च इत्येता चाष्टमैत्रिका ॥ ३२ ॥
एकैकवृद्धितो ज्ञेया वर्णादीनां गुणाः क्रमात् ।
विवाहे शुभदास्तेषां गुणे स्वष्टादशाधिके ॥ ३३ ॥

वधूवरांचें टिप्पण जमविणें ह्याला ज्योतिषांत घटित किंवा मैत्री जमविणें असें म्हणतात. ही मैत्री जन्मनक्षत्र आणि जन्मराशि ह्यांवरून जमवितात. ती जमविल्याशिवाय वधूवरांचा विवाह करूं नये असें धर्मशास्त्रकारांनीं लिहिलें आहे. तिचे आठ प्रकार आहेत ते असेः—१ वर्ण २ वश्य ३ ताराबल ४ योनि ५ ग्रहमैत्री ६ गणमैत्री ७ राशिकूट आणि ८ नाडी. ह्या आठ भेदांचे अनुक्रमें करून एक दोन तीन असे पूर्ण गुण धरावे. म्हणजे शुभवर्णाचा गुण १ वश्याचे गुण २ शुभताराबलाचे ३ योनीचे ४ ग्रहमैत्रीचे ५ गणाचे ६ राशिकूटाचे ७ आणि नाडीचे ८. ह्याप्रमाणें सर्व शुभ असतां एकंदर छत्तीस गुण येतात. ह्या छत्तीस गुणांपैकीं अठरापेक्षां अधिक गुण आले म्हणजे ती मैत्री ग्राह्य आहे, असें समजावें. ही मैत्री जन्मपत्रिकेवरूनच जमविली पाहिजे. जन्मपत्रिका नसली म्हणजे

कित्येक लोक वधूवराच्या व्यावहारिक नावावरूनच घटित जमवितात, परंतु असें करणे शास्त्रविरुद्ध आहे कारण, असें सांगितलें आहे की,

> विवाहे सर्वमांगल्ये यात्रादौ ग्रहगोचरे।
> जन्मराशेः प्रधानत्वं नामराशिं न चिंतयेत् ॥ ३४ ॥

म्हणजे विवाहकालीं, इतर मंगलकार्यांत, यात्रादिप्रयाणसमयीं मुहूर्त व साडू ग्रह हे जन्म राशीवरूनच पहावे व्यावहारिक नावाचा उपयोग करू नये असो ही आठ प्रकारची मैत्री जमविण्यापूर्वी वधूवरास अनिष्ट मंगळ किंवा दुष्टनक्षत्रांवर त्यांचा जन्म आहे की काय, हें यालीं सांगतल्याप्रमाणे प्रथम पहावे

## अनिष्ट मंगळ.

> लग्ने तुर्येऽष्टमे भौमे सप्तमेऽस्त्येव जन्मनि।
> भर्तुर्योषिद्विनाशः स्यात् स्त्रियाभर्तुर्विनाशनम् ॥ ३५ ॥
> एकस्मिन्कुजे जन्मस्थे विवाहो न कदाचन।
> पापौ वा गुणबाहुल्ये कुजे वा तादृशे द्वयोः ॥ ३६ ॥

जन्मपत्रीं किंवा लग्नापासून चवथा, सातवा, आठवा आणि बारावा असा पांच स्थानीं मंगळ असेल तर तो अनिष्ट मंगळ होय वधूवरांतून एकाला अनिष्ट मंगळ असून दुसऱ्याला मुळीच नसेल तर तें मात्र नाहीं वधूवरांपैकीं एकाला ज्या स्थानांतील मंगळ असेल त्याच स्थानीं दुसऱ्याला असला पाहिजे असें नाहीं फक्त पांच स्थानांपैकीं कोणत्या तरी एका स्थानांतील असावा तसेंच एकाच्या सप्तम स्थानांत मंगळ असून दुसऱ्याच्या सप्तम स्थानात शनि असेल तर तेही ग्राह्य धरून विवाह करावा असं कित्येकाचं मत आहे तसेंच, कित्येक ज्योतिष्यांच्या मतें, सप्तमेश पाप असेल त्या स्थानापासून २।४।७।८। १२ या स्थानीं मंगळ असेल, तर मात्र तो अनिष्ट मंगळ समजावा असें आहे तथापि दोन्ही नियम अपवादात्मक आहेत असा अनुभव आहे गुणांची संख्या पूर्ण असतां कुज दोष कमी होतो येथ एवढें अवश्य सांगितलें पाहिजे कीं, मंगळ वगैरे पाहणें असेल तर जन्मपत्रिका मात्र अत्यंत विश्वसनीय म्हणजे जन्म काल बरोबर साधून केलेली असली पाहिजे घड्याळाशिवाय अनुमानानें वेळ ठरवून त्याप्रमाणे कुंडली तयार केलेली असेल तर ती व्यर्थ होय कारण पांच दहा मिनिटांचा फरक पडला तरी देखील सर्व कुंडली बदलते अशा वेळेस आपण चवथा मंगळ म्हणून जो ठरवावा तो तिसरा किंवा पाचवा दृष्टीस असू शकेल याकरितां आपण केलेली कुंडली विश्वसनीय आहे अशी आपली पक्की खात्री असेल तरच कुंडलीत अनिष्ट मंगळ असल्यास, त्याचा विचार करावा

शनि आदिकरून इतर पापग्रह विशेष दोषास्पद न मानितां विवाहकालीं मंगळच मुख्यत्वेंकरून कां अमंगळ मानिला आहे हें कळत नाहीं. मुहूर्तचिंतामणि, मुहूर्तमार्तंड, बृहज्जातक, सारावली वगैरे ग्रंथांतून विवाहघटिताचा विस्तृत विचार केलेला आहे, परंतु त्यांत मंगळाविषयीं कांहीं उलेख नाहीं. वधूचें सप्तम व अष्टम स्थान पापग्रहानें दूषित नसावें इतकेंच त्यांत सांगितलेलें आहे. यावरून असें दिसतें कीं, ही कुजदोषाची कल्पना अर्वाचीन म्हणजे शें दोनशें वर्षांची असावी. आधाराकरितां घेतलेले उपरिनिर्दिष्ट दोन श्लोक मुहूर्तगणपति नामक ग्रंथांतील असून तो ग्रंथ गुर्जरप्रांतस्थ ज्योतिर्विदानें रचिलेला आहे, यावरून गुजराथ प्रांतांतून ही कुजदोषाची कल्पना आली असावी असें कित्येकांचें मत आहे. शिवाय हा भौमदोष पाहण्याचे दोन तीन प्रकार आढळतात. कोणी चंद्रापासून म्हणजे जन्मलग्नकुंडलींत जेथें चंद्र असेल तेथपासून मंगळ मोजतात; कित्येक सप्तमेश जेथें असेल तेथून मंगळ मोजतात; आणि कोणी जन्मलग्नापासून मोजतात. यांपैकीं अधिक विश्वसनीय प्रकार कोणता हें निश्चितपणें कोणीं ठरविलेलें नाहीं. सारांश पापग्रहांचा विचार कर्तव्य असेल तर पत्रिका सूक्ष्मगणितानें सिद्ध केलेली व विश्वसनीय तरी असावी.

## मंगळाचा दोषपरिहार

जामित्रे च यदा सौरिर्लग्ने वा हिबुकेऽथवा ।
नवमे द्वादशे चैव भौमदोषो न विद्यते ॥

कुंडलींत सप्तमस्थानीं, लग्नीं, चतुर्थस्थानीं, नवमस्थानीं किंवा द्वादशस्थानीं शनि असतां भौमदोष मानूं नये.

## आश्लेषादि जन्मनक्षत्रांचीं फळें.

आश्लेषाख्यसमुत्पन्नौ श्वश्रूं कन्यासुतौ हतः।
मूलजौ श्वशुरं हंति ज्येष्ठोत्था स्वधवाग्रजम् ॥ ३७ ॥

यालीं लिहिलेले अपवाद सोडीनकरून आश्लेषानक्षत्रावर जन्मलेली कन्या अथवा पुत्र हीं आपल्या विवाहानंतर आपल्या सासूला वाईट असतात. मूलनक्षत्रीं जन्मलेली कन्या किंवा पुत्र सासऱ्याला वाईट असतात. ज्येष्ठानक्षत्रोत्पन्न कन्या आपल्या पतीच्या वडील दिराला वाईट आणि विशाखानक्षत्रीं जन्मलेली कन्या धाकट्या दिराला वाईट असते, असें मानिलेलें आहे. वाईट म्हणजे क्लेश देणारीं असतात असें समजावें.

## आश्लेषादि नक्षत्रांचे अपवाद.

आश्लेषाप्रथमः पादः पादो मूलांतिमस्तथा ।
विशाखाज्येष्ठयोराद्यास्त्रयः पादाः शुभावहाः ॥ ३८ ॥

आश्लेषांचा पहिला चरण, मूळनक्षत्राचा शेवटचा चरण आणि विशाखा व ज्येष्ठा या दोन नक्षत्रांचे पहिले तीन चरण यांवर कन्या किंवा पुत्र यांचा जन्म झाला असतां शुभ होय; म्हणजे त्यांच्या ठिकाणीं वर लिहिलेले दोष नसतात असें समजावें. अनिष्ट मंगळ व दुष्टनक्षत्रीं जन्म हें प्रथम पाहून नंतर अष्टमैत्री पहावी. ती पाहण्याची रीति आतां सांगतों.

## वर्णविचार.

कर्कवृश्चिकमीनाख्या ब्राह्मणा अथ बाहुजाः ।
मेषसिंहधनुष्काख्या वृषकन्यामृगा विशः ॥ ३९ ॥
तुलाद्वंद्वघटाः शूद्राश्चैते वर्णाश्च राशिजाः ।
वर्णाधिक्ये वरः श्रेष्ठो न कन्या वर्णतोधिका ॥ ४० ॥

कर्क, वृश्चिक आणि मीन या राशींचा ब्राह्मणवर्ण होय. मेष, सिंह आणि धन या राशींचा क्षत्रिय, वृषभ, कन्या आणि मकर यांचा वैश्य आणि तूळ, मिथुन व कुंभ यांचा शूद्र, याप्रमाणें राशींचे वर्ण जाणावे. हे वर्ण ध्यानांत ठेवण्याची सोपी रीति अशी आहे कीं, मीनापासून कुंभापर्यंत बारा राशींचे अनुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हेच वर्ण पुनः पुनः आणावे. जसें, मीनराशीचा विप्रवर्ण, मेषराशीचा क्षत्रिय, वृषभराशीचा वैश्य, आणि मिथुनराशीचा शूद्र; पुनः कर्कराशीचा विप्र याप्रमाणें पुढें कुंभराशीपर्यंत वर्ण मोजावे. दोघांचा एक वर्ण किंवा वराचा उच्चवर्ण असेल तर गुण एक. वधूचा उच्चवर्ण असतां गुण शून्य. वर्णांच्या उच्चतेसंबंधानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र [redacted] क्रम जाणावा.

## वश्यविचार.

द्वंद्वंचापपूर्वघटकन्यकातुलौ मानवा अजवृषौ चतुष्पदौ ।
कर्कमीनमकरौ जलोद्भवाः केसरीवनचरोलिकीटकाः ॥ ४१ ॥
वैरभक्ष्ये गुणाभावो द्वयोः साम्ये गुणद्वयम् ।
वश्यवैरे गुणश्चैको वश्यभक्ष्ये गुणार्धकम् ॥ ४२ ॥

वरील श्लोकामध्यें यद्यांवर जे अंक दिले आहेत ते राशींचे अनुक्रमांक आहेत. मिथुन, धन, कुंभ, कन्या आणि तूळ ह्या मनुष्यराशी होत. मेष, वृषभ ह्या

चतुष्पादराशी होत. कर्क, मीन आणि मकर ह्या जलचरराशी होत. सिंह ही वनचरराशि आणि वृश्चिक ही कीटकराशि आहे असें जाणावें. ह्या परस्पर राशींचें मित्रत्व किंवा वैर वगैरे व्यवहारावरून ठरवावें. तथापि बाजूस गुणांचें कोष्टक दिलें आहे, त्यावरूनही ठरवितां येईल. ज्या परस्पर राशींचें साम्य ह्मणजे मैत्री आहे, त्याचे २ गुण आहेत. ज्यांचें वश्यवैर आहे त्याला १ गुण आहे. ज्यांचा वश्यभक्ष्य संबंध आहे त्यांचा ॥ गुण आहे. ज्यांचा वैरभक्ष्य संबंध आहे त्यांचा शून्य गुण आहे. परस्पर वैरभक्ष्य संबंध म्हणजे, उदाहरणार्थ, जलचरराशी ह्या मानवराशींचें भक्ष्य आहे व मानवराशींचें जलचरांशीं वैर आहे म्हणून हा परस्पर वैरभक्ष्य संबंध होय. याप्रमाणें वश्यवैर, वश्यभक्ष्य इत्यादि जाणावें. वधूवरांच्या समानप्रकृतीच्या राशी असतां २ गुण; दोघांतून एकाची चतुष्पाद व दुसऱ्याची मानव असतां ॥ गुण; जलचर असतां १ गुण; वनचर किंवा कीटक असतां शून्य गुण याप्रमाणें सर्व कोष्टक पहावें.

| | चतु | मा० | जल. | वन. | कीट. |
|---|---|---|---|---|---|
| चतु. | २ | ॥ | १ | ० | ० |
| मान. | ॥ | २ | ० | ० | ० |
| जल. | १ | ० | २ | २ | २ |
| वन. | ० | ० | २ | २ | ० |
| कीट | १ | ० | १ | ० | २ |

## तारावल.

कन्याभं वरभाद्गण्यं वधूभाद्वरभं तथा ।
नवहृच्छेषमे नेष्टे सप्तपंचत्रिसंख्यके ॥ ४३ ॥
शुभा चेदेकतस्तारा तदा सार्धगुणोदयः ।
शुभा चेत्स्युस्त्रयः शून्यं चोभयोश्चेत्त्रयोऽशुभाः ॥ ४४ ॥

वराच्या जन्मनक्षत्रापासून वधूच्या जन्मनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं; त्यास नवांनीं भागावें; बाकी ३।५।७ राहिले तर अशुभ आणि १।२।४।६।८।० राहिले तर शुभतारावल आहे, असें समजावें. तसेंच, वधूनक्षत्रापासून वरनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून नवांनीं भागावें आणि वरच्याप्रमाणेंच शुभाशुभ समजावें. दोघांची शुभ तारा आली तर गुण तीन. एक शुभ व दुसरी अशुभ असतां गुण दीड व दोन्ही अशुभ असतां शून्य गुण धरावा.

## नक्षत्रांच्या योनि.

अश्वो गजो मेषसर्पौ सर्पः श्वानो विडालकः ।
मेषो विडालकश्चैव मूषको मूषकश्च गौः ॥ ४५ ॥

महिषी च ततो व्याघ्रो महिषी व्याघ्र एव च ।
मृगो मृगः सारमेयो वानरो नकुलस्तथा ॥ ४६ ॥
नकुलश्च कपिः सिंहस्तुरगः केसरी च गौः ।
मतंगजः क्रमादेवं मानां प्रोक्तास्तु योनयः ॥ ४७ ॥

वरील श्लोकांत अश्विनीपासून रेवतीपर्यंत २७ नक्षत्रांच्या अनुक्रमें २७ योनि सांगितल्या आहेत त्या खालील कोष्टकांत पहा.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्वि० | अश्व | पुष्य. | मेष | स्वाती. | हंस | अभि० | नकुल |
| भर० | गज | आश्ले० | माजर | विशा० | व्याघ्र | श्रव० | वानर |
| कृत्ति० | मेष | मघा | उंदीर | अनु० | हरिण | धनि० | सिंह |
| रोहि० | सर्प | पूर्वा | उंदीर | ज्येष्ठा. | हरिण | शत० | अश्व |
| मृग | सर्प | उत्तरा | गाय | मूळ | श्वान | पू. भा. | सिंह |
| आर्द्रा | श्वान | हस्त | हंस | पू. षा. | वानर | उ. भा. | गौ |
| पुनर्व० | मार्जार | चित्रा | व्याघ्र | उ. षा. | नकुल | रेव. | गज |

## महावैरयोनि व योनिमैत्रीचे गुण.

गोव्याघ्रं महिषाश्वं च श्वैणं मार्जारमूषकम् ।
सिंहेभं कपिमेषं च वैरं तु नकुलोरगम् ॥ ४८ ॥
एकयोन्यां शुभं विद्याद्भिन्नयोन्यां [illegible] मध्यमं ।
अधमं शत्रुयोन्यां स्यान्महावैरे न कर्हिचित् ॥ ४९ ॥
अतिमैत्रे तु चत्वारो योग्योर्मैत्रे त्रयो गुणाः ।
औदासीन्ये द्वयं चैकं वैरं शं चातिशात्रवे ॥ ५० ॥

गाय आणि वाघ, हंस आणि घोडा, कुत्रा आणि हरिण, मार्जार आणि उंदीर, सिंह आणि हत्ती, वानर आणि मेष व मुंगूस आणि सर्प ह्या परस्पर योनींचें महावैर आहे असें समजावें. कोणत्या जन्मनक्षत्राची कोणती योनि असते हें वर दिलेंच आहे. वधूवरांची एक योनि असेल तर गुण चार, उभयतांच्या योनींचें मित्रत्व असतां गुण ३, एकस्वभाव असतां गुण २, शत्रुत्व असेल तर गुण १ आणि महावैर असतां शून्य गुण जाणावा. वधूवरांच्या परस्पर योनिमैत्रीचे किती गुण धरावे हें खालील गुणांच्या कोष्टकावरुन ध्यानीं येईल.

| योनि | अश्व | गज | मेष | सर्प | श्वान | मार्जार | मूषक | गौ | महिष | व्याघ्र | मृग | वानर | नकुल | सिंह |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्व | ४ | २ | २ | ३ | २ | २ | २ | १ | ० | १ | ३ | ३ | २ | १ |
| गज | २ | ४ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | ३ | १ | २ | ३ | २ | ० |
| मेष | २ | ३ | ४ | २ | १ | २ | १ | ३ | ३ | १ | २ | ० | ३ | १ |
| सर्प | ३ | ३ | २ | ४ | २ | १ | १ | १ | १ | २ | २ | २ | ० | २ |
| श्वान | २ | २ | १ | २ | ४ | २ | १ | २ | २ | १ | ० | २ | १ | १ |
| मार्जार | २ | २ | २ | १ | २ | ४ | ० | २ | २ | १ | ३ | ३ | १ | १ |
| मूषक | २ | २ | १ | १ | १ | ० | ४ | २ | २ | २ | २ | २ | १ | २ |
| गौ | १ | २ | ३ | १ | २ | २ | २ | ४ | ३ | ० | ३ | २ | २ | १ |
| महिष | ० | ३ | ३ | १ | २ | २ | २ | ३ | ४ | १ | २ | २ | २ | १ |
| व्याघ्र | १ | १ | १ | २ | १ | १ | २ | ० | १ | ४ | १ | १ | १ | १ |
| मृग | ३ | २ | २ | २ | ० | ३ | २ | ३ | २ | १ | ४ | २ | २ | १ |
| वानर | ३ | ३ | ० | १ | २ | ३ | २ | २ | २ | १ | २ | ४ | ३ | २ |
| नकुल | २ | २ | ३ | ० | १ | २ | १ | २ | २ | २ | २ | ३ | ४ | २ |
| सिंह | १ | ० | १ | २ | १ | १ | २ | १ | २ | १ | १ | २ | २ | ४ |

स्पष्टीकरण-वरील कोष्टकांतील पहिली ओळ पहा. वधूवरांतून एकाची अश्वयोनि व दुसऱ्याचीही अश्वयोनीच असेल तर ४ गुण धरावे. एकाची अश्व व दुसऱ्याची गज किंवा मेष असतां २ गुण धरावे. याप्रमाणें सर्व कोष्टक पहावें.

## राशींचे स्वामी.

भौमः शुक्रो बुधश्चंद्रः सूर्यः सौम्यो भृगुः कुजः ।
गुरुः शनैश्चरो मंदो गुरुर्मेषादिराशिपाः ॥ ५१ ॥

वरील श्लोकांत मेषापासून मीनापर्यंत अनुक्रमें बारा राशींचे बारा स्वामी सांगितले आहेत. त्यांचें कोष्टक खालीं दिलें आहे त्यावरून स्पष्ट कळेल.

| राशी स्वामी. | राशी स्वामी. | राशी स्वामी. | राशी स्वामी. |
|---|---|---|---|
| मेष — मंगळ. | कर्क — चंद्र. | तूळ — शुक्र. | मकर — शनि. |
| वृषभ — शुक्र. | सिंह — रवि. | वृश्चिक— मंगळ. | कुंभ — शनि. |
| मिथुन— बुध. | कन्या — बुध. | धन — गुरु. | मीन — गुरु. |

## ग्रहांचा शत्रुमित्रविचार.

चंद्रुमं रविमित्राणि, बुसमो, शशु वैरिणौ ।
चंद्रमित्रे रबु, समाः शत्रुमंगु, न वैरिणः ॥ ५२ ॥

पूर्वेकडे गेलें असतां तो जाणाराला सन्मुख होतो व उत्तरेकडे गेलें असतां उजवा होतो; व जेव्हां पश्चिमेकडे दिसत असेल तेव्हां पश्चिमेकडे जाणाराला सन्मुख व दक्षिणेस जाणाराला उजवा होतो. अशा समयीं उलट दिशेनें गेलें असतां मात्र दोष नाहीं. याविषयीं आणखी अपवाद आहे तो असा कीं, ऋतुमती कन्या असता तिला पतिगृहीं जाण्यास, किंवा कोणत्याही स्वगृहीं प्रवेश करण्यास, किंवा भृगु, अंगिरा, वत्स, वसिष्ठ, कश्यप, अत्रि, आणि भरद्वाज या गोत्रांतील मनुष्यास सन्मुख शुक्राचा कधींही दोष नाहीं.

## षोडशसंस्कार.

गर्भाधानं पुंसवनं सीमंतोन्नयनं तथा।
जातकर्म नामसंस्कारो निष्क्रमश्चान्नभोजनम्॥ १३१॥
चौलकर्मोपनयनं वेदव्रतचतुष्टयम्।
केशांतः स्नानमुद्वाह संस्काराः षोडश स्मृताः॥ १३२॥

धर्मशास्त्रकारांनीं सोळा संस्कार ठरविले आहेत त्यांचीं नांवें. १ गर्भाधान, २ पुंसवन, ३ सीमंतोन्नयन, ४ जातकर्म, ५ नामकरण, ६ निष्क्रमण, ७ अन्नप्राशन, ८ चौल, ९ उपनयन, १०–१३ चार वेदांचे अध्ययन, (हे चार संस्कारच धरिलेले आहेत.) १४ केशांतक, १५ समावर्तन आणि १६ विवाह. ह्या षोडशसंस्कारांतून सांप्रत उपनयन आणि विवाह हे दोन संस्कार मात्र सर्व लोक करितात. गर्भाधान संस्कारही बहुतेक करितात. इतर संस्कार मात्र फारच क्वचित् होतात. प्रत्येक संस्कारात मात्र. होमवहन हा मुख्य विधि आहे.

## प्रथम रजोदर्शनसमयीं अशुभ.

आद्यर्तौ पौषशुक्रोर्जमधुशुचिनभस्याः कुयुक्पापवारा।
रिक्तामार्काह्यपष्ठ्यः परगृहकुपदे वाधिसंध्यापराह्णाः॥
मिश्रोग्रामूलतीक्ष्णं वियरमनरुणाल्पाधिकाश्च गराद्यो-
त्पातः पापस्य लग्नं न सदरुणजरत्नीलचित्रांबरं च॥ १३३॥

आद्यर्तौ म्हणजे पहिल्या रजोदर्शनाच्या वेळीं, पुढें लिहिलेले सर्व योग, अशुभ समजावे. जसें, पौष, शुक्र म्हणजे ज्येष्ठ, ऊर्ज म्हणजे कार्तिक, मधु म्हणजे चैत्र शुचि म्हणजे आषाढ आणि नभ म्हणजे भाद्रपद हे सहा महिने, कुयुक् म्हणजे विष्कंभ, शूल, गंड, अतिगंड, व्याघात, वज्र, व्यतीपात, परिघ आणि वैधृति हे नऊ दुष्ट योग; पापवारा म्हणजे रवि, मंगळ, शनि हे वार, (१ रोगी, २ पतिव्रता, ३ दुःखी. ४ पुत्रिणी. ५ भोगभागिनी. ६ पतिप्रिया. ७ क्लेशभागी. सूर्यवारादिषु क्रमात्॥ अशीं रविवारादि सात वारांचीं अनुक्रमें सात फळें आहेत.) रिक्तामार्काह्यपष्ठ्य रिक्ता म्ह० चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, अमावास्या,

द्वादशी, अष्टमी आणि षष्ठी ह्या तिथी; दुसऱ्याच्या घरीं आणि कुपदे म्हणजे बाहेर जागेंत; रात्रीं; दिवस आणि रात्र यांच्या संधिसमयीं; तसेंच, अपराह्णकाळीं म्हणजे दुपारीं १ पासून तीन वाजेपर्यंत; मिश्र, उग्र, तीक्ष्ण इत्यादि नक्षत्रीं म्हणजे कृत्तिका, विशाखा, तिन्ही पूर्वा, भरणी, मघा, आश्लेषा ज्येष्ठा, आर्द्रा, अशा दहा नक्षत्रांवर, विवर म्ह० तिथि किंवा नक्षत्र यांची संधि; अकरण म्हणजे आरक्त रगाहून भिन्न रजोरंग; तसेंच, विशेष अल्प किंवा विशेष अधिक रज; गरकरणा-पासून आठ करणें; उत्पात; ज्यांचे स्वामी पापग्रह आहेत अशीं लग्नें; म्ह० मेष, सिंह, वृश्चिक, मकर आणि कुंभ; तसेंच, अरुण म्हणजे तांबडें, जर म्हणजे फाटकें, नील म्हणजे निळें आणि चित्र म्हणजे अनेक रंगांचें, अशीं वस्त्रें अंगावर असणें; हातांत केरसुणी, सूप, अग्नि, तृण, काष्ठ असणें, इत्यादि सर्व योग प्रथम रजोद-र्शनसमयीं अशुभ होत. प्रथमरजोदर्शन खेरीज करून रजस्वलेनें तांबूलभक्षण, तैलाभ्यंग, डोळ्यांत काजळ घालणें इत्यादि वर्ज्य करावीं.

## गर्भाधानास मुहूर्त.

गंडांतं त्रिविधं त्यजेन्निधनजन्मर्क्षे च मूलांतकं ।
दास्रं पौष्णमघोपरागदिवसान्पातं तथा वैधृतिम् ॥
पित्रोः श्राद्धदिनं दिवा च परिघाद्यर्धं स्वपत्नीगमे ।
भान्युत्पातहतानि मृत्युभवनं जन्मर्क्षतः पापभम् ॥ १३४ ॥
भद्राषष्ठीपर्वरिक्ताश्च संध्या भौमार्कार्कीनाद्यरात्रीश्च तस्रः ।
गर्भाधानं त्र्युत्तरेंद्वर्कमैत्रब्राह्मस्वातीविष्णुवस्वंबुपे सत् ॥ १३५ ॥

पुढें लिहिलेले सर्व दिवस वर्ज्य करून गर्भाधानसंस्कार करावा. जसें, तीन प्रकारचें गंडांत, ( प्रकरण पहिलें पान ४० पहा ) निधनर्क्षें म्हणजे जन्मनक्षत्रा-पासून सप्तमनक्षत्र, जन्मनक्षत्र, मूळ, भरणी, अश्विनी, रेवती आणि मघा हीं नक्षत्रें; ग्रहणदिवस, व्यतीपात, वैधृति, मातापितरांचे श्राद्धदिवस, परिघयो-गाचा पूर्वार्ध, पूर्वी षण्मासांत उत्पात झाला असता तीं नक्षत्रें; जन्मलग्नापासून व जन्मराशीपासून अष्टमलग्न, पापग्रहांनीं युक्त नक्षत्रें. तसेंच, कल्याणी ज्या तिथींला असते अशा तिथी, षष्ठी, पर्वतिथी म्हणजे चतुर्दशी, अष्टमी, अमा-वास्या, पूर्णिमा, संक्रांति; रिक्ता म्ह० ४।९।१४ ह्या तिथी; मंगळ, रवि, शनि हे वार; रजोदर्शनापासून पहिल्या चार रात्री; हे सर्व दिवस स्त्रीगमनास म्हणजे गर्भाधानास वर्ज्य करावे. तिन्ही उत्तरा, मृगशीर्ष, हस्त, अनुराधा, रोहिणी, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका हीं नक्षत्रें गर्भाधानास उत्तम होत. चित्रा, पुनर्वसु, पुष्य, अश्विनी हीं नक्षत्रें देखील सामान्यतः शुभ आहेत. गर्भाधान-दिवशीं उभयतांला चंद्रबल असावें. ऋतुदर्शनापासून १६ रात्रींचे आंत गर्भा-

धान करावें. त्यांत कित्येकांच्या मतें ११ व १३ ह्या रात्री निंद्य आहेत. शुभकालीं प्रथम ऋतुदर्शन होणें हें कोणाच्याही स्वाधीन नाहीं. म्हणून एखादा अशुभ योग असतां तद्दोषपरिहारार्थ गर्भाधानसंस्कारसमयीं प्रथम भुवनेश्वरीनामक शांति करण्याचा सर्वत्र प्रचार आहे. ज्या दिवशीं ती शांति करावयाची असेल त्या दिवशीं अग्नि व आहुती असावी. अग्निआहुतीची माहिती पुढें मुहूर्तप्रकरणांत सांगितली आहे.

## पुंसवन आणि सीमंतोन्नयन.

द्वितीये वा तृतीये वा मासि पुंसवनं स्मृतम् ।
मासे षष्ठेऽष्टमे वापि गर्भे सीमंतकं विदुः ॥ १३६
पुनर्वसुद्वये मूलश्रवणे मृगहस्तयोः ।
गुरुभौमार्कवारेषु प्रोक्तं पुंसवनादिकम् ॥ १३७ ॥

प्रथम समयीं स्त्री गर्भवती असतां दुसऱ्या किंवा तिसऱ्या महिन्यांत पुंसवन आणि सहाव्या किंवा आठव्या महिन्यांत सीमंतोन्नयन हे संस्कार करावे असें सांगितलेलें आहे. हे संस्कार प्रतिगर्भसमयीं करावे असें कित्येक ग्रंथकार म्हणतात. पुनर्वसु, पुष्य, मूल, श्रवण, मृग, हस्त ह्या सहा नक्षत्रांवर व गुरु भौम आणि रवि ह्या वारीं हे संस्कार करावे.

## जन्मकाळीं अशुभयोग.

गंडांतः परिघः शूलं व्यतीपातोथ वैधृतिः ।
मूलाश्लेषा तथा ज्येष्ठा यमघंटोर्कसंक्रमः ॥ १३८ ॥
वज्रगंडौ मृतिर्भद्रा व्याघातो दग्धवासरः ।
अमा चतुर्दशी कृष्णा तातसोदरजन्मभे ॥ १३९ ॥
अधर्मं ग्रहणं निंद्यं जन्मकाले स्त्रित्रिकम् ।
तद्दोषपरिहाराय शांतिं कुर्याद्यथाविधि ॥ १४० ॥

तीन प्रकारचें गंडांत; परिघ, शूल, व्यतीपात, वैधृति हे योग, मूळ, आश्लेषा आणि ज्येष्ठा हीं नक्षत्रें, यमघंटयोग, सूर्यसंक्रमणाची वेळ, वज्रयोग, गंडयोग, मृत्युयोग, कल्याणी, व्याघातयोग, दग्धयोग, अमावास्या, कृष्णचतुर्दशी, पिता, भ्राता यांचें जन्मनक्षत्र, क्षयतिथि व ग्रहण हे सर्व योग जन्मकाळीं अशुभ मानिलेले आहेत. तसेंच, तीन पुत्रांनंतर कन्येचें जनन किंवा तीन कन्यांच्या पाठीवर पुत्र होणें हेंही अशुभ होय. तथापि शांतीनें ह्या सर्वांचा संपूर्ण दोष परिहार होतो असेंही सांगितलें आहे.

## जातकर्म व नामकरण.

जातमात्रकुमारस्य जातकर्म विधीयते ।
स्तनप्राशनतः पूर्वं नाभिकर्तनतोपि वा ॥ १४१ ॥
द्वादशैकादशे वापि जन्मतोपि त्रयोदशे ।
पुनर्वसुद्वये हस्तत्रये मैत्रद्वये मृगे ॥ १४२ ॥
मूलोत्तराधनिष्ठासु शिशोर्नाम कृतं शुभम् ।
स्थिरे लग्ने शुभे वारे कालातिक्रमणे विदुः ॥ १४३ ॥

पुत्रजन्म झाल्यावरोबर नाळछेदनापूर्वी जातकर्मसंस्कार करावा. नामकरण अकराव्या, बाराव्या किंवा तेराव्या दिवशीं करावें. ह्या दिवशीं नक्षत्र वगैरे पाहण्याची गरज नाहीं. तथापि अमावास्या, ग्रहण, वैधृति, व्यतीपात वगैरे कुयोग नसावे. कारणपरत्वें १२।११३ या दिवशीं तें न घडेल तर पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, मृग, मूळ, तिन्ही उत्तरा, धनिष्ठा, या नक्षत्रीं व शनि, मंगळ खेरीज करून इतर वारीं, स्थिर लग्नावर बाळकाचें नांव ठेवावें.

## बालकाचें नांव ठेवणें.

ज्या नक्षत्रावर बालकाचें जन्म झालें असेल, त्या नक्षत्राच्या आरंभापासून समाप्तिपर्यंत घटिका मोजून त्यांचे चार भाग करावे. प्रत्येक भागाला चरण अशी संज्ञा आहे. ज्या चरणावर जन्म झाला असेल त्या चरणाचें जें नक्षत्राचें अक्षर असेल (याच प्रकरणांत मागें नक्षत्राचें अवकहडाचक्र दिलें आहे तें पहा.) तें नांवाचें आद्याक्षर असावें. उदाहरणार्थ, शततारका नक्षत्र एकंदर ६४ घटिका आहे व त्या नक्षत्राच्या ५ घटिका गेल्यानंतर म्हणजे पहिल्या चरणावर बालकाचा जन्म झाला आहे असें समजा. शततारका नक्षत्राच्या प्रथम चरणाचें अक्षर "गो" असें आहे म्हणून मुलगा असल्यास "गोपाळ" व मुलगी असल्यास गोदावरी वगैरे नांवें ठेवावीं. जन्मकालीं ज्या राशीला चंद्र असतो तीच त्या मनुष्याची रास जाणावी.

## जन्मनक्षत्र कोठें पडलें तें पहाणें.

शीर्षे त्रीणि मुखे त्रयं च रविभादेकैकमं स्कंधयो-
रेकैकं भुजयोस्तथा करतले धिष्ण्यानि पंचोदरे ॥
नाभौ गुह्यतले च जानुयुगले चैकैकमृक्षं क्षिपे-
ज्जंतोः केचिदिति ब्रुवंति गणकाः शेषाणि पादद्वये ॥ १४४ ॥
त्रिभं मूर्ध्नि मुखे सप्तस्तनयोरष्टमं हृदि ।
त्रिभं नाभौ त्रिभं नारीचक्रे गुह्ये त्रिभं न्यसेत् ॥ १४५ ॥

सूर्यनक्षत्रापासून जन्मनक्षत्रापर्यंत (जन्मनक्षत्रसुद्धां) नक्षत्रें मोजून पुढें लिहिल्याप्रमाणें त्यांचीं स्थानें जाणावीं. पहिलीं ३ नक्षत्रें मस्तकावर, दुसरीं ३ मुखावर, प्रत्येक खांद्यावर १।१, बाहूंवर १।१; तळहातांवर १।१, हृदयावर ५, नाभीवर १, गुह्यावर १, प्रत्येक जानूवर १।१ व प्रत्येक पावलावर ३।३ याप्रमाणें २७ नक्षत्रांची व्यवस्था जाणावी. उदाहरणार्थ, सूर्यनक्षत्रापासून जन्मनक्षत्रापर्यंत ७ नक्षत्रें झालीं, अशी कल्पना करा. यांतून ३ मस्तकावर, ३ मुखावर, अशीं ६ नक्षत्रें गेलीं. सातवें नक्षत्र स्कंधावर आलें म्हणून जन्मनक्षत्र स्कंधावर पडलें असें जाणावें. स्त्रियांची नक्षत्रविभागणी निराळी आहे, ती अशी ३ मस्तकावर, ७ मुखावर, ८ स्तनांवर, ३ हृदयावर, ३ नाभीवर व ३ गुह्यावर. जन्मनक्षत्र तळहस्तावर, गुह्यावर व पावलांवर पडलें असतां अशुभ व अन्यस्थानीं पडलें असतां शुभ मानिलेलें आहे.

## पाळण्यांत घालण्यास दिवस.

आंदोलारोहणे पुंसो द्वादशो दिवसः शुभः ।
त्रयोदशस्तु कन्याया न नक्षत्रविचारणा ॥ १४६ ॥
षोडशे दिवसे चापि द्वात्रिंशे दिवसेपि वा ।
मैत्रक्षिप्रस्थिरर्क्षेषु कुर्यादान्दोलनं शिशोः ॥ १४७ ॥
रविभात्पंचमे सौख्यं ततः पंचदशस्वपि ।
अशुभं च ततः शेषे शुभं दोलाधिरोहणम् ॥ १४८ ॥

पाळण्यांत घालण्यास मुलाला बारावा दिवस व मुलीला तेरावा दिवस प्रशस्त मानिला आहे. ह्या दिवशीं अडचण असेल तर किंवा अमावास्यादि विशेष,कुयोग असतील तर सोळावा, अठरावा, बाविसावा किंवा बत्तिसावा हे दिवस व मृग, चित्रा, अनुराधा, रेवती, पुनर्वसु, पुष्य, अश्विनी, हस्त, रोहिणी, मृग आणि तिन्ही उत्तरा हीं नक्षत्रें सांगितलेलीं आहेत. तसेंच, सूर्यनक्षत्रापासून पहिलीं पांच आणि नंतरचीं सात नक्षत्रें शुभ होत व बाकी राहिलेलीं १५ नक्षत्रें दोलारोहणास वर्ज्य करावीं असें कित्येक ग्रंथकार म्हणतात. पूर्वेकडे मस्तक करून शिशूस प्रथम पाळण्यांत घालावें.

## दुग्धपान, भूम्युपवेशन व जलपूजा.

एकत्रिंशद्दिने चैव पयः शंखेन पाययेत् ।
अन्नप्राशननक्षत्रे दिवसोदयराशिषु ॥ १४९ ॥
शुभाहे पंचमे मासि भौमोप्यत्र विशेषतः ।
दोलारोहणनक्षत्रे बालकं चोपवेशयेत् ॥ १५० ॥

पुनर्वसुद्वये हस्ते मृगे मूलानुराधयो । 
श्रवे गुरौ बुधे चंद्रे सतिथौ जलपूजनम् ॥ १५१ ॥
गुरौ शुक्रेऽस्तगे चैत्रे पौषे वा मलमासके ।
मासपूर्तौ विरुद्धाहे न कुर्यात्तु जलार्चनम् ॥ १५२ ॥

जन्मापासून एकतिसाव्या दिवशीं आणि अन्नप्राशनाला जी नक्षत्रें पुढें सांगितलीं आहेत त्या नक्षत्रावर, शंखामध्यें दूध घालून तें बालकाला प्रथम पाजावें या मुहूर्तांचा अर्थात् स्तनपानाशीं संबंध नाहीं. तसेंच शिशूला पाळण्यांत घालण्यास जीं नक्षत्रें वर सांगितलीं आहेत त्या नक्षत्रावर, शुभदिवशीं, विशेषत मंगळवारीं, पांचव्या महिन्यांत कटिसूत्र बांधून, पृथ्वीची व वराहाची पूजा करून बालकाला प्रथम भूमीवर बसवावें प्रसूत झालेल्या स्त्रीनें जलपूजा करण्याचा कित्येक ठिकाणीं प्रचार आहे ही जलपूजा प्रसूतीला एक महिना झाल्यानंतर चैत्र, पौष व मलमास वर्ज्य करून कोणत्याही महिन्यांत, गुरु, बुध किंवा सोमवारीं गुरुशुक्रास्त नसेल तेव्हां रिक्तातिथि वर्ज्य करून इतर तिथींला पुनर्वसु, पुष्य, हस्त, मृग, मूल, अनुराधा, श्रवण ह्या सात नक्षत्रावर, शुभ आहे असे जाणावें.

## कान व नाक टोंचणें.

शुभे वारेऽह्नि जन्माहाद्द्वादशे षोडशे दिने ।
कर्णवेधोऽथवा मासे षष्ठे सप्ताष्टमेपि वा ॥ १५३ ॥
रेवतीद्वितये पुष्ये पुनर्वस्वनुराधयो ।
श्रवणद्वितये चित्रामृगे हस्ते शुभे तिथौ ॥ १५४ ॥
युग्माब्दं जन्ममासं च पौषं चैत्रं हरेः शयम् ।
जन्मतारां विहायाथ त्र्युत्तरेपि च केचन ॥ १५५ ॥

जन्मदिवसापासून १२ व १६ ह्या दिवशीं किंवा ६।७।८ ह्या महिन्यांत, बुध, गुरु, शुक्र [redacted] सोम या वारीं, रेवती, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, चित्रा, मृग आणि हस्त या नक्षत्रीं बालकाचे कान टोंचावे हेच दिवस कन्येचें नाक टोंचण्यास विषम वर्षीं म्हणजे ३।५।७ या वर्षीं शुभ होत समवर्ष, जन्ममास, पौष, चैत्र, क्षयतिथि, चातुर्मास्य, जन्मनक्षत्र हीं कान व नाक टोंचण्यास वर्ज्य करावीं. कित्येकाच्या मतें तिन्ही उत्तरा या कार्यांत वर्ज्य कराव्या.

## अन्नप्राशन.

रेवती द्वितये पुष्ये पुनर्वस्वनुराधयोः ।
श्रवणादित्रये हस्तत्रितये रोहिणीमृगे ॥ १५६ ॥

उत्तरायां शुभे लग्ने मीनमेषालिमिङ्गगे ।
षष्ठान्मासि समे पुंसः पंचमाद्विषमे स्त्रियः ॥ १५५
त्यक्त्वा रिक्तां क्षयं नंदां द्वादशीमष्टमीममाम् ।
शनिभौमार्कवारांश्च, प्रथमान्नाशनं शुभम् ॥ १५८ ॥

रेवती, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, चित्रा, स्वाती, रोहिणी, मृग, आणि तिन्ही उत्तरा या नक्षत्रांवर, मीन, मेष आणि वृश्चिक हीं लग्नें वर्ज्य करून मुलाला सहाव्या महिन्यापासून सम म्हणजे ६।८।१०।१२ ह्या महिन्यांत व कन्येला पांचव्या महिन्यापासून विषम म्हणजे ५।७।९।११ ह्या महिन्यांत अन्नप्राशन म्हणजे उष्टावण करावी. रिक्तातिथि, म्ह० ४।९।१४, क्षयतिथि, नंदातिथि म्ह० १।६।११ अष्टमी, अमावास्या, द्वादशी ह्या तिथि वर्ज्य करून व रवि, मंगळ व शनिवार खेरीजकरून इतर दिवशीं अन्नप्राशनाचा संस्कार करावा.

## अब्दपूर्ति. ( वाढदिवस. )

सर्वैश्च जन्मदिवसे स्नातैर्मङ्गलधारिभिः ।
प्रतिसंवत्सरं यत्नात्कर्तव्यश्च महोत्सवः ॥ १५९ ॥

ज्या दिवशीं जन्म झाला असेल तो दिवस पुन. दुसऱ्या वर्षी आला म्हणजे त्याला वाढदिवस म्हणतात. दर वर्षास जन्मतिथीचे दिवशीं वाढदिवस करावा. वर्षपर्यंत प्रतिमासीं करावा. जन्मतिथीचा दोन दिवस योग असतां जन्मनक्षत्रयुक्त जी तिथि असेल ती घ्यावी. जन्मनक्षत्राचाही दोन दिवस योग असेल तर जी तिथि सूर्योदयाला असून चार घटिकांहून अधिक असेल ती घ्यावी. असा योग नसेल तर प्रथम दिवसाची तिथि घ्यावी. व्यवहारांत सामान्य लोक फक्त लहान मुलांचाच वाढदिवस करितात. फार श्रीमंत लोक मोठ्यांचाही वाढदिवस करितात. वाढदिवसाचे दिवशीं अंगाला सुवासिक तेल वगैरे लावून उष्णोदकानें मंगलस्नान करितात. धर्मसिंधूमध्यें याविषयीं असें सांगितलें आहे कीं, वाढदिवसाचे दिवशीं स्नान झाल्यानंतर एका लहानशा तंदुलराशीवर सुपारी ठेवून ती मार्कंडेयरूपी देवता आहे असें कल्पून प्रथम कुलदेवतेचें व तसेंच, अश्वत्थामा, बली, व्यास, हनूमान, बिभीषण, कृप, परशुराम इत्यादि चिरंजीवांचें स्मरण करून नंतर मार्कंडेयरूपी देवतेची पूजा करावी, आणि शेवटीं पुढील मंत्रानें प्रार्थना करावी. मार्कंडेय नमस्तेस्तु सप्तकल्पांतजीवन । आयुरारोग्यसिद्ध्यर्थं प्रसीद भगवन्मुने ॥ चिरंजीवी यथा त्वं तु मुनीनां प्रवर द्विज । कुरुष्व मुनिशार्दूल तथा मां चिरजीविनम् ॥ असो; वाढदिवसाचे दिवशीं श्मश्रु, कलह, मांसभक्षण वगैरे करूं नयेत.

## चौलसंस्कार.

जन्मतो गर्भतो वाब्दे प्रथमेऽथ द्वितीयके ।
तृतीये पंचमे वापि चौलकर्म प्रशस्यते ॥ १६० ॥
माघफाल्गुनवैशाखज्येष्ठे मासि शुभं स्मृतम् ।
जन्ममासेऽधिमासे न ज्येष्ठे ज्येष्ठस्य नो भवेत् ॥ १६१ ॥
द्वितीयाथ तृतीया च पंचमी सप्तमी शुभा ।
दशम्येकादशी चापि त्रयोदश्यपि शस्यते ॥ १६२ ॥
श्रवणादित्रये हस्तत्रितये रेवतीमृगे ।
पुष्याश्विन्यऽदित्यृक्षेषु चूडाकर्म शुभावहम् ॥ १६३ ॥
सूनोर्मातरि गर्भिण्यां चूडाकर्म न कारयेत् ।
पंचाब्दात् प्रागथोर्ध्वं तु गर्भिण्यामपि कारयेत् ॥ १६४ ॥

जन्मकालापासून किंवा गर्भधारणापासून विषम म्हणजे १।३।५।७ या वर्षी, व केचिन्मतेंकरून दुसऱ्या वर्षी; माघ, फाल्गुन, वैशाख व ज्येष्ठ या महिन्यांस व कित्येकांच्या मतें मार्गशीर्ष महिन्यांत बुध, गुरु, शुक्र, चंद्र ह्या वारीं, २।३।५।७।१०।११।१३ या तिथींला, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, चित्रा, स्वाती, रेवती, मृग, पुष्य, अश्विनी, पुनर्वसु या नक्षत्रांवर मुलाला चंद्रबल पाहून चूडाकर्म म्हणजे जावळ करणें शुभ मानिलें आहे. माता रजस्वला असतां मुलाचें चौल करूं नये. सदरचा मावाचें चौल एकाच दिवशीं करूं नये. तसेंच, माता गर्भवती असून पांच महिन्यांहून अधिक महिने झाले असतील तर चौलसंस्कार करूं नये. परंतु मुलाचें वय पांच वर्षांहून अधिक असेल तर मात्र मातेला पांचांहून अधिक महिने गेले असतांही चौल करणें दोषास्पद नाहीं. माता ऋतुमती असतां तिच्या पुत्राचें चौल किंवा कोणताही अन्य संस्कार करूं नये, ज्येष्ठ अपत्याचें ज्येष्ठ मासांत कोणतेंही मंगल करूं नये.

## विद्यारंभ.

सौम्यायने शुभे मासि स्वाध्यायदिवसे शुभे ।
स्वस्थे जीवबुधे शुक्रे लग्ने खेटबलान्विते ॥ १६५ ॥
रेवतीद्वितये पुष्ये पुनर्वस्वनुराधयोः ।
आर्द्राख्ये श्रवणे हस्ते स्वातौ चित्राभिधे तथा ॥ १६६ ॥
हेरंबविष्णुवाग्देवीं तथाभ्यर्च्येष्टदेवताः ।
पंचमाब्दे नरः कुर्याद्विद्यारंभं सदा बुधः ॥ १६७ ॥

उत्तरायणांत, शुभ मासांत म्हणजे माघापासून पुढें पांच महिन्यांत, स्वाध्याय-

दिवशीं म्हणजे १।८।१३।१५।३० या तिथि वर्ज्य करून गुरु, बुध, शुक्र, या वारीं, २।३।५।१०।११।१२।१३ ह्या तिथींला, व रेवती अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, अनुराधा, आर्द्रा, श्रवण, हस्त, चित्रा, स्वाती हीं नक्षत्रें व शिवाय मुहूर्तचिंतामणिकारांच्या मतें धनिष्ठा, शततारका, तिन्ही पूर्वा, तिन्ही उत्तरा, मूळ, आश्लेषा हीं नक्षत्रें देखील विद्यारंभास प्रशस्त आहेत. वृषभ, मिथुन, कन्या, धन, मीन या शुभग्रहांच्या लग्नीं, त्रिकोणीं म्ह० ५।९ व केंद्रीं १।४।७।१० या स्थानीं शुभग्रह असतां, मुलाच्या पांचव्या वर्षी गणपति, सरस्वती, विष्णु व कुलदेवता इत्यादि देवतांची पूजा करून बालकाकडून प्रातःकाळीं विद्यारंभ करावा.

## उपनयनास शुभाशुभ.

गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम्।
गर्भादेकादशे राज्ञो गर्भाच्च द्वादशे विशः॥ १६८॥
आषोडशाद्द्वाविंशाच्च चतुर्विंशाच्च वत्सरात्।
ब्रह्मक्षत्रविशां कालो ह्यौपनायनिकश्च सः॥ १६९॥
माघादिपंचमासेषु मेखलाबंधनं शुभम्।
द्वित्र्येकादशदिक्पंचद्वादशीप्रमिते तिथौ
मौञ्जीबन्धः शुभः सोमे भृगुजीवज्ञभास्करे॥ १७०॥
मघा च भरणी ज्येष्ठा विशाखा चैव कृत्तिका।
नक्षत्रपंचकं प्रोक्तं ग्राह्यं व्रतबंधने॥ १७१॥
कृष्णे प्रदोषेऽनध्याये शनौ निश्यपराह्णके।
प्राक्संध्यागर्जिते नेष्टो व्रतबंधो गलग्रहे॥ १७२॥

गर्भापासून किंवा जन्मापासून आठव्या वर्षी ब्राह्मणांचा, अकराव्या वर्षी क्षत्रियांचा व बाराव्या वर्षी वैश्यांचा व्रतबंध करावा. तथापि अडचणीच्या प्रसंगीं ब्राह्मणांला १६ वर्षेपर्यंत, क्षत्रियांला २२ वर्षेपर्यंत, व वैश्यांला २४ वर्षेपर्यंत मुंजीचा गौणकाळ सांगितलेला आहे. परंतु तो क्रमानें हीन होत जातो. तसेंच, ब्राह्मणाला पांचवें किंवा सातवें वर्षीही उपनयनाला उक्त आहे. माघापासून ज्येष्ठापर्यंत पांच महिन्यांत उपनयन करावें. द्वितीया, तृतीया पंचमी, दशमी, एकादशी, द्वादशी ह्या तिथींला व कृष्णपक्षांतील पंचमीपर्यंत सर्व तिथींवर आणि सोम, बुध, गुरु, शुक्र आणि रवि या वारीं व्रतबंध करावा. मघा, भरणी, ज्येष्ठा, विशाखा आणि कृत्तिका हीं पांच नक्षत्रें वर्ज्य करून इतर २२ नक्षत्रांवर, उपनयन करणें शुभ जाणावें. कृष्णपक्षांत षष्ठीपासून पुढील तिथींवर, प्रदोषाचे दिवशीं, अनध्यायदिवशीं, शनिवारीं, रात्रीस, अपराह्णकाळीं, प्रातःकाळीं मेघगर्जना झाली असतां त्या दिवशीं, आणि गलग्रह तिथींवर (त्रयोदशीपासून ४

तिथि, सप्तमीपासून ३ तिथि व चतुर्थी अशा आठ तिथींवर ) उपनयनसंस्कार करणें अशुभ मानिलेलें आहे.

## वर्णस्वामी व शाखास्वामी.

जीवशुक्रौ तु विप्रेशौ भूभुजां रविमंगलौ ।
विशोऽब्जो सौम्य शूद्राणामंत्यजानां पतिः शनिः ॥ १७३ ॥
ऋग्वेदेशो गुरुः प्रोक्तो यजुषां भार्गवः पतिः ।
सामवेदेश्वरो भौमः पतिश्चाथर्वणे बुधः ॥ १७४ ॥
शाखाधिपतिवारश्च शाखाधिपबलं तथा ।
शाखाधिपतिलग्नं च दुर्लभं त्रितयं व्रते ॥ १७५ ॥

ब्राह्मणवर्णाचे शुक्र व गुरु हे दोन स्वामी आहेत. क्षत्रियांचे मंगळ व रवि, वैश्यांचा चंद्र, शूद्रांचा बुध आणि अंत्यजांचा शनि असे भिन्न वर्णांचे भिन्न स्वामी. कल्पिलेले आहेत. तसेंच, ऋग्वेदाचा स्वामी गुरु, यजुर्वेदाचा शुक्र, सामवेदाचा मंगळ आणि अथर्ववेदाचा बुध असे निरनिराळ्या शाखेचेही निरनिराळे स्वामी आहेत. आपल्या वर्णाचा व शाखेचा जो स्वामी असेल त्याचा वार, तो ज्याचा स्वामी आहे असें लग्न किंवा तो शुभस्थानीं असणें हीं व्रतबंधाला अत्यंत शुभ मानिलेलीं आहेत. म्हणून ज्याप्रमाणें रवि, चंद्र, व गुरु यांचें बल पाहिजे त्याचप्रमाणें वर्ण व शाखा यांच्या स्वामीचेंही बल असणें शुभ-कारक आहे.

## उपनयनास गुरुबल.

बटुकन्याजन्मराशेस्त्रिकोणायद्विसप्तगः ।
श्रेष्ठो गुरुः खषट्त्र्याद्ये पूजयान्यत्र निंदितः ॥ १७६ ॥
शुभोत्तिकाले तुर्याष्टव्ययस्थो द्विगुणार्चनात् ।
चैत्रे मीनगते भानौ अनिष्टोपि गुरुः शुभः ॥ १७७ ॥
स्वोच्चे स्वभे स्वमैत्रे वा स्वांशे वर्गोत्तमे गुरुः ।
रिःफाष्टतुर्यगोपीष्टो नीचारिस्थः शुभोप्यसन् ॥ १७८ ॥

बटूच्या जन्मराशीपासून ज्या राशीला गुरु असेल त्या राशीपर्यंत मोजावें. आणि नववा, पांचवा, अकरावा, दुसरा, व सातवा या स्थानीं गुरु असला म्हणजे गुरुबल उत्तम आहे असें समजून बटूचा व्रतबंध करावा. १०।६।३।१ या स्थानीं असतां गुरुबल मध्यम समजून गुरूची पूजा करावी व नंतर व्रतबंध करावा. ४।८।१२ या स्थानीं असणारा गुरु निंद्य आहे; तथापि उपनयनाचा काल होऊन गेला असेल तर दोन वेळ गुरूची पूजा करून बटूची मुंज करावी; परंतु

मुनीचा कालातिक्रम होऊ देऊ नये   ह्याशिवाय आणखी गुरुबलानिषयीं दुसरे अपवाद आहेत ते असे कीं, चैत्र महिन्यात मीनराशीस सूर्य असेल तर अनिष्ट गुरूचा दोष मानू नये, किंवा उच्चीचा म्हणजे कर्क राशीस असता, स्वक्षेत्रींचा म्हणजे धन किंवा मीन राशींला असता, मित्रगृहींचा ह्मणजे मेष आणि वृश्चिक राशीला असतां, स्वांशीं म्हणजे कोणत्याही राशीस असून धन किंवा मीन राशीच्या नवांशीं असतां, वर्गोत्तम म्हणजे ज्या राशीला गुरु असेल त्याच राशीच्या नवांशामध्ये म्हणजे मेष राशीस असता, मेषाच्या नवांशीं, वृषभ राशीस असता वृषभाच्या नवांशीं इत्यादि कोणताही प्रकार असतां, जरी अनिष्ट ह्मणजे जन्मराशीपासून १२।८।४ या स्थानीं गुरु असेल तरीही तो शुभ मानावा तसेंच नीचस्थानीं ह्मणजे मकर राशीला व शत्रुक्षेत्रीं ह्मणजे मिथुन, कन्या, तूळ व वृषभ या राशींस असून जरी वहूल्या शुभस्थानीं गुरु असेल तरीही तो निंद्य होय, असेंही काहीं ग्रथकार ह्मणतात

## उपनयनास जन्ममासाचा विचार.

जन्मर्क्षमासलग्नादौ व्रते विद्याधिको व्रती ।
आद्यगर्भेपि विप्राणां क्षत्राद्यीनामनादिमे ॥ १७९ ॥

जन्मनक्षत्र, जन्ममास, जन्मलग्न आणि जन्मतिथि इत्यादि योगांवर व्रतबंध संस्कार केला असतां तो बटु अधिक विद्वान् होतो   यास्तव ब्राह्मणानीं प्रथम गर्भोत्पन्न किंवा इतर पुत्राचा व्रतबंधसंस्कार अवश्यंकरून जन्मनक्षत्रादिकांवरच करावा   क्षत्रिय आणि वैश्य ह्यानीं प्रथम गर्भोत्पन्न पुत्राचा व्रतबंध जन्मनक्षत्रादिकांवर करू नये, परंतु इतरांचा मात्र अवश्य करावा

## उपनयनास शुभाशुभ ग्रह.

व्रतबंधेऽष्टषड्रि फैर्वर्जिता शोभनाः शुभा ॥
त्रिषडाये खलाः पूर्णो गो कर्कस्थो विधुस्तनौ ॥ १८० ॥
जीवेंदुभृगुलग्नेशा व्रते नेष्टा षडष्टगाः ।
शुक्रेंदुव्ययगाविष्टौ खला लग्नाष्टपंचगा ॥ १८१ ॥

ज्या मेषादि लग्नीं उपनयन करावयाचें असेल त्या इष्टलग्नापासून ८।६।१२ ह्या स्थानीं शुभग्रह नसावे   यावाचून इतर सर्व स्थानीं शुभग्रह व्रतबधाला इष्ट मानिलेले आहेत   ३।६।११ या स्थानीं पापग्रह असावे   वृषभ किंवा कर्क राशीला शुक्ल पक्षातील चद्र असून तो लग्नीं असावा   गुरु, चद्र, शुक्र आणि लग्नस्वामी हे ६।८ या स्थानीं असता अनिष्ट होत   तसच, शुक्र, चद्र हे द्वादश स्थानीं नसावे, आणि लग्नीं, अष्टमस्थानीं व पचमस्थानीं पापग्रह असतां अनिष्ट मानिलेलें आहे

## मातृरजोदोषनिर्णय.

मातृ रजस्वलादोषे नांदीश्राद्धोत्तरं तदा ।
आवश्यके व्रतं चौलं शांति कुर्याद्व्रते गृही ॥ १८२ ॥

नांदीश्राद्ध म्हणजे पुण्याहवाचनादि देवकप्रतिष्ठा झाल्यानंतर बटूची माता किंवा ज्यानें नांदीश्राद्ध केलें असेल त्याची पत्नी रजस्वला झाली तर धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें श्रीशांति करून त्याच मुहूर्तांवर चौलव्रतबंधादि संस्कार केले असतां दोष नाहीं. शांतीवांचून संस्कार करणें मात्र अशुभ मानिलेलें आहे.

## सोडमुंजीस मुहूर्त.

व्रतोक्तदिवसादौ हि समावर्तनमिष्यते ।
विभौमभानुजे वारे नक्षत्रे च व्रतोदिते ।
चंद्रताराविशुद्धौ च स्यात्समावर्तनक्रिया ॥ १८३ ॥

मौंजीस जो मुहूर्त मागें लिहिला आहे त्याच मुहूर्तांवर समावर्तन म्हणजे सोडमुंज करावी. मंगळवार व शनिवार खेरीजकरून व्रतबंधास जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत त्या नक्षत्रांवर चंद्रबल पाहून समावर्तन करावें. हल्लीं मौंजीबंधन झाल्या दिवसापासून चार किंवा आठ दिवसांच्या आंतच समावर्तन म्हणजे सोडमुंज करितात. परंतु विद्यार्जनाकरितां बारा वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य पाळून नंतर समावर्तनविधि करावा अशी शास्त्राज्ञा आहे. ब्रह्मचर्य पाळणें म्हणजे सर्वथा शुचिर्भूत राहणें. शुचिर्भूत राहून विद्यार्जन केलें असतां तेज, बल आणि मनोनिग्रह हीं वृद्धिंगत होतात. ब्रह्मचर्यवृत्ति धारण्याचा लोप झाल्यामुळें प्रस्तुतकाळीं विद्यार्थ्यांची तेजोबलविवेकविहीन अशी शोचनीय स्थिति दृष्टीस पडते.

---

# जातकप्रकरण ३.



ह्या प्रकरणात जन्मपत्रिकेंत येणाऱ्या विषयासंबंधीं संक्षिप्त विचार केला आहे म्हणजे स्पष्टग्रह, स्पष्टलग्न, लग्नकुंडली, भावचलितकुंडली, दशा, ग्रहांचीं फल इत्यादिकांविषयीं लिहिलें आहे पत्रिकेंत गणिताचा भाग पुष्कळ असतो, त्याचा ह्या लहानशा पुस्तकात स्थलसंकोचास्तव सविस्तर विचार करिता येत नाहीं तथापि विषयप्रवेश होण्यापुरती आवश्यक तेवढी माहिती येथ दिली आहे गणितविषय स्वभावत मनोरंजक नसल्यामुळें सहृदयांनीं पुष्कळास तो कठिण वाटेल हें खरें, परंतु वास्तविक तो तितका कठिण आहे असें नाहीं पुन पुन वाचला असता इतर विषयाप्रमाणे हाही सहज समजण्यासारखा आहे असो आता प्रथम ग्रह कसे स्पष्ट करावे हें सांगतों

## स्पष्टग्रह करण्याची रीति.

कोणताही ग्रह स्पष्ट करणें म्हणजे तो इष्टकाळीं आकाशात किती अंशादिकांवर आहे हें गणिताच्या साहाय्यानें सिद्ध करणें ह्या कृत्यास ग्रहांस चालन देणें असेंही म्हणतात मागें 'पंचांग पहाण्याची रीति', या विषयाखालीं सांगितलेंच आहे कीं, पंचांगांत उजव्या बाजूच्या कोपऱ्यात कुंडलीच्या वरच्या बाजूस प्रत्येक पूर्णिमेचे आणि अमावास्येचे सूर्योदयींचे स्पष्टग्रह दिलेले असतात, व त्या अंकाखालीं त्या त्या ग्रहाच्या गतींचे अंक दिलेले असतात त्या गतींवरून खालीं लिहिलेल्या रीतीप्रमाणें पाहिजे त्या वेळेचे स्पष्टग्रह तयार करिता येतात तथापि ही रीति स्थूलमानाची आहे यापेक्षां ग्रहलाघवावरून तयार केलेले ग्रह अधिक सूक्ष्म असतात परंतु तें गणित बरेंच कठिण आहे असो चंद्र खेरीजकरून इतर सर्व ग्रह स्पष्ट करण्याची रीति एकच आहे अलीकडे कित्येक पंचांगांतून रोजचे सूर्योदयींचे स्पष्टग्रह दिलेले असतात, त्यावरून इष्टकाळचे स्पष्टग्रह तयार करणें हें कमी श्रमाचें आहे

रीति—ज्या गांवचे स्पष्टग्रह तयार करावयाचे असतील त्या ठिकाणीं जें पंचांग चालत असेल त्याचाच उपयोग करावा ज्या वेळेचे आपणास स्पष्टग्रह करावयाचे असतील त्या वेळेपासून पूर्णिमेच्या किंवा अमावास्येच्या सूर्योदया पर्यंत दिवस मोजावे अंक वाढू नयेत म्हणून पूर्णिमा किंवा अमावास्या यांपैकीं जो दिवस जवळ असेल तो घ्यावा तितके दिवस, घटी आणि पळ होतील त्याला ग्रहांच्या गतींच्या अंकांनीं गुणावें हे गतींचे अंक कला आणि विकला असतात म्हणून त्यांच्या विकला करून नंतर गुणावें जो गुणाकार येईल त्याला एका दिवसाचीं पळ ३६०० यानीं भागावें भाग त्याचे अंश,

५८।, ५७ इत्यादि करावी. जर मागील पंधरवड्याच्या कोष्टकांतील ग्रहगति घेऊन उदाहरण केलें असेल तर त्या त्या ग्रहांच्या अंशांत हे अंक मिळवावे; आणि चालू पंधरवड्याच्या कोष्टकावरून गणित केलें असेल तर त्या अंकांतून वजा करावे. पंचांगांतील ग्रह राश्यात्मक असतात; म्हणजे राशी, अंश, कला आणि विकला असतात आणि आपला गुणाकार फक्त अंशात्मक आहे; म्हणजे अंश, कला आणि विकला आहेत; म्हणून ह्या परस्परांची बेरीज किंवा वजावाकी करितेवेळीं राशीखालीं शून्य व अंशाखालीं अंश वगैरे मांडावे. एकाद्याचा जन्म पूर्णिमेच्या किंवा अमावास्येच्या सूर्योदयाबरोबर झाला असेल तर पंचांगस्थ स्पष्टग्रह हेच त्याच्या जन्मकाळचे स्पष्टग्रह होत. खालीं उदाहरणपूर्वक एक दोन ग्रह स्पष्ट करून दाखविले आहेत, त्याप्रमाणें इतर सर्व ग्रह स्पष्ट करावे. चंद्र स्पष्ट करण्याची रीति निराळी आहे, तीही पुढे दिलीच आहे. राहूची गति नेहमीं ऋण म्हणजे उलट असते म्हणून पंचांगस्थ स्पष्टग्रहांत मिळवणीच्या ठिकाणीं राहूचें चालन नेहमीं वजा करावें आणि वजावाकीच्या ठिकाणीं मिळवावें. तसेंच, कोणताही ग्रह वक्री असतां त्याची गति देखील उलट असते; म्हणून वक्री ग्रहाचें उदाहरण राहूप्रमाणेंच करावें.

उदाहरण पहिलें—शके १८३२ वैशाखकृष्ण ३ शुक्रवार ता० २७ मे १९१० या दिवशीं दुपारीं १ वाजून ३७ मिनिटांनीं एकाचा जन्म झाला आहे त्या वेळेचा स्पष्ट सूर्य करा. या दिवशीं रवीचा उदय ५ वाजून २५ मिनिटांनीं आहे. म्हणजे सूर्योदयापासून ८ तास व १२ मिनिटांनीं जन्म झाला आहे. आतां प्रथम ८ तास व १२ मिनिटे यांच्या घटिका व पळें केलीं पाहिजेत. म्हणून, ८×२॥=२० घटिका व १२×२॥=३० पळें म्हणजे शुक्रवारीं सूर्योदयापासून २० घटका ३० पळांनीं जन्म झाला. या ठिकाणीं पूर्णिमा जवळ आहे, म्हणून मागील पंधरवड्याच्या कोष्टकांतील गतीवरून उदाहरण करू. प्रथम दिवस मोजा. पूर्णिमेचा सर्व दिवस, प्रतिपदेचा सर्व दिवस, द्वितीयेचा सर्व दिवस आणि तृतीयेचा २० घटिका ३० पळांनीं जन्म झाला आहे, म्हणून एकंदर ३ दिवस २० घटिका आणि ३० पळें इतका काळ झाला. याला सूर्याच्या गतीनें गुणा-

---

1 ज्या वेळीं मागील पंधरवड्याच्या कोष्टकांतील ग्रहगतीवरून पुढील दिवसाचा ग्रह तयार करावयाचा असेल त्या वेळीं तो पंधरवड्याचा शेवटचा सर्व दिवस हिशेबात धरावा. परंतु पुढील दिवसाच्या ग्रहगतीवरून मागील दिवसाचा ग्रह तयार करितांना त्या पंधरवड्याचा दिवस हिशेबात धरूं नये. कारण पंचांगस्थ ग्रहगति त्या त्या दिवसाच्या सूर्योदयाच्या वेळेच्या आहेत. ह्मणून दिवस मोजणें ते एका ठिकाणीं सूर्योदयापासून व दुसऱ्या ठिकाणीं सूर्योदयापर्यंत मोजले पाहिजेत हें ध्यानांत ठेवावें.

वयाचें आहे. सूर्याची गति ५७ कला आणि २० विकला आहे या सर्वांच्या विकला करा. ५७×६०=३४२०+२०=३४४० ही विकलात्मक एका दिवसाची सूर्याची गति झाली. आतां ३ दिवस २० घटिका आणि ३० पळें या सर्वांची पळें करावयाचीं आहेत, म्हणून ३×६०=१८० घटी+२० घटी=२०० घ० ×६० =१२००० पळें +३०=१२०३० पळें याला ३४४० यांनीं गुणा, व एका दिवसाचीं म्ह० ६० घटिकाचीं पळें ६०×६०=३६०० यांनीं भागून भागाकार पलात्मक येईल त्याचे घटी, अंश वगैरे करून ते अंक पंचांगातील राश्यादि अंकांत मिळवा म्हणजे इष्ट काळचा स्पष्ट रवि येईल त्याचें उदाहरण करून दाखविलें आहे तें पहा

| | | पौर्णि० पंचा० स्पष्ट सूर्य | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | रा० | अं० | क० | वि० |
| १२०३० | –६०) ११४९५ | | | | |
| ×३४४० | भागा० १९१ घा० ३५ वि० | १ | ९ | २६ | ३१ |
| –३६००) ४१३८३२०० | –६०) अं० ३ घा० ११ कला | +० | ३ | ११ | ३५ |
| ११४९५ | | १ | १२ | ३८ | ६ |

बाकी १२०० प्रति विकला सोडा

हा वैशाखकृष्णतृतीयेचा इष्टकाळचा स्पष्ट सूर्य झाला त्रैराशिक रीतीनेंही हें उदाहरण करितां येईल जसें—एका दिवसास म्ह० ३६०० पळांस जर ३४४० विकला गति तर ३ दिवस २० घ० व ३० प०=१२०३० पळांस किती? वस्तुत याच रीतीनें वरील उदाहरण केलें आहे

मागील पधरवड्याच्या कोष्टकातील गतीवरून पुढील दिवसाच्या ग्रहास चालन देण्याचें हें एक उदाहरण झालें आतां चालू पधरवड्याच्या कोष्टकांतील गतीवरून मागील दिवसाचा ग्रह तयार करण्याचें आणखी एक उदाहरण करून दाखवितों

उदाहरण दुसरें—शके १८३२ वैशाखकृष्ण १२ शनिवारीं दुपारीं ११ वाजून ३५ मिनिटांनीं एकाचा जन्म झाला आहे, त्या वेळेचा स्पष्ट सूर्य करा या दिवशीं ५ वाजून २५ मिनिटांनीं सूर्योदय आहे म्हणजे सूर्योदयापासून ६ तास व १० मिनिटांनीं म्हणजे ( ६×२॥ व १०×२॥ ) १५ घटिका २५ पळांनीं जन्म झाला आहे म्हणून, त्या वेळेपासून अमावास्येपर्यंत दिवस मोजा अमावास्या मंगळवारीं आहे अहोरात्राच्या घटी ६० यांतून उणे जन्मापूर्वीच्या शनिवारच्या १५ घटिका व २५ पळें =४४ घटिका ३५ पळें ह्या शनिवारच्या जन्मानंतरच्या शेष घटिका झाल्या आतां रवि आणि सोमवार हे संपूर्ण दोन दिवस व शनिवारच्या ४४ घटिका व ३५ पळें मिळून २ दिवस ४४ घटिका व ३५ पळें हा जन्मवेळेपासून अमावास्येच्या सूर्योदयापर्यंत इष्टकाळ झाला ह्या वेळीं सूर्य किती अंशावर होता हें सिद्ध करावयाचें आहे एका दिवसाची

सूर्याची गति ५७ कला आणि ११ विकला आहे. या सर्वांच्या विकला करा. जसें, ५७×६०=३४२०+११=३४३१ विकला झाल्या. या अंकांनीं, २ दिवस ४४ घटिका आणि ३५ पळें म्हणजे ( २×६०=१२०+४४=१६४×६०=९८४०+३५ ) एकंदर ९८७५ पळें, याला गुणून एका दिवसाचीं पळें ३६०० यांनीं भागा. उत्तर पलात्मक येईल त्याला ६० नीं भागून त्याचे अंश वगैरे करून पंचांगस्थ रवीच्या अंकांत वजा द्या. म्हणजे इष्टकाळचा स्पष्ट सूर्य झाला. खालीं उदाहरण करून दाखविलें आहे तें पहा.

| | | अमावा० पंचां० सूर्य. | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | रा. | अं. | क. | वि. |
| ९८७५ | ÷६०) ९४११ | | | | |
| ×३४३१ | भागा० १५६ बा०५१ वि० | १ | २२ | ४८ | ८ |
| ÷३६००) ३३८८११२५ | ÷६०) अं०२बा०३६कला.–० | | २ | ३६ | ५१ |
| ९४११ बा. १२२५ | | १ | २० | ११ | १७ |

१२२५ प्रति विकला सोडा.

हा वैशाखकृष्ण १२ शनिवारचा दुपारचा स्पष्ट सूर्य झाला. आतां कांहीं पंचांगांतून प्रत्येक दिवसाचे प्रातःकाळचे ग्रह दिलेले असतात, त्यावरून इष्ट काळचे ग्रह कसे सिद्ध करावे, तें सांगतों.

ज्या पंचांगांतून रोजचे सूर्योदयींचे स्पष्टग्रह दिलेले असतील तेथें आजचा सूर्योदयींचा ग्रह व उद्यांचा सूर्योदयींचा ग्रह या दोघांची वजाबाकी करावी. म्हणजे ग्रहाची एका दिवसाची गति येते. वरील उदाहरणांतील जन्मकाळ घेऊन मंगळ तयार करा. प्रथम मंगळाच्या गतीचें प्रमाण आपणाला काढलें पाहिजे. म्हणून:–

| | रा. | अं. | क. | वि. |
|---|---|---|---|---|
| वैशाखकृष्ण चतुर्दशीचा मंगळः— | २ | २७ | ४९ | ४८ |
| वैशाखकृष्ण त्रयोदशीचा मंगळः— | २ | २७ | १३ | २६ |
| ही मंगळाची एका दिवसाची गति होयः— | ० | ० | ३६ | २२ |

या सर्वांच्या विकला करा. जसें–३६×६०=२१६०+२२=२१८२ विकला झाल्या. आतां सूर्योदयापासून १५ घटिका २५ पळांनीं जन्म झाला आहे. म्हणून या सर्वांचीं पळें करून (१५×६०=९००+२५=९२५ ) त्या पळांनीं मंगळाच्या गतीला म्हणजे वर दाखविल्याप्रमाणें २१८२ यांला गुणा व त्या गुणाकाराला एका दिवसाचीं पळें ३६०० यांनीं भागून, भागाकार पलात्मक येईल, त्याच्या घटी, अंश वगैरे करून ते अंक दुसऱ्या दिवसाच्या स्पष्ट ग्रहांत वजा द्या किंवा आदल्या दिवसाच्या स्पष्टग्रहांत मिळवा. पुढील उदाहरण पहा.

| | | | दुसऱ्या दिवसाचा मंगळ | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २१८२ | ६० ) ५६० | | | | | |
| ×९२५ | ९–२० | | २ | २७ | ४९. | ४८ |
| ३६०० ) २०१८३५० | | क. वि. उणें–० | ० | ० | ९ | २० |
| ५६० बा. २३५० | | उत्तर | २ | २७ | ४० | २८ |

हा वैशाखकृष्ण त्रयोदशीचा दुपारीं १५ घ० २५ पळांचा स्पष्ट मंगळ होय. याचप्रमाणें चंद्र खेरीज करून इतर सर्व ग्रह स्पष्ट करावे

## चंद्र स्पष्ट करण्याची रीति. .

ज्या वेळेचा आपणास स्पष्ट चंद्र करावयाचा असेल त्या वेळेपर्यंत, त्या दिवसाचे ज नक्षत्र असेल, त्या नक्षत्राच्या आरंभापासून जितक्या घटिका व पळें गेलीं असतील त्या सर्वांचीं पळें करून त्यास साठांनीं गुणावें आणि त्या गुणाकारास त्याच नक्षत्राच्या आरंभापासून समाप्तिपर्यंतच्या एकंदर घटिकापळांचीं पळं करून त्यांनीं भागावें जो भागाकार येईल ते अंश होत बाकी राहील त्याच्या कला आणि विकला कराव्या नंतर हे अंशाचे अंक, त्या दिवसाच्या नक्षत्रापूर्वींचीं जितकीं नक्षत्रें गत झालीं असतील त्या गत नक्षत्रांच्या अनुक्रमांकाला साठांनीं गुणून जो अंशात्मक गुणाकार येईल, त्यांत मिळवावे जी बेरीज येईल त्या बेरजेला दोहोंनीं गुणून नवांनीं भागावें, जे उत्तर येईल ते अंशात्मक येईल हे अंश तिसांपेक्षा अधिक असतील तर तिसांनीं भागून त्याच्या राशि कराव्या म्हणजे स्पष्ट चंद्र झाला तसेंच, ४८००० या संख्येला नक्षत्राच्या घटिकांनीं भागिलें म्हणजे चंद्राची गति काढितां येते उदाहरण—शके १८३२ वैशाख कृष्ण १३ रविवारीं प्रातःकाळीं ६ वाजून १३ मिनिटांनीं जन्म झाला आहे त्या दिवशीं सूर्योदय ५ वाजून २५ मिनिटांनीं आहे म्हणने सूर्योदयापासून ४८ मिनिटांनीं म्ह० २ घटिकांनीं जन्म झाला आहे, त्या वेळेचा स्पष्ट चंद्र करा शनिवारीं अश्विनी नक्षत्र ४४ घटिका ७ पळ होतें नंतर भरणीनक्षत्र लागलें अहोरात्राच्या घटिका ६० यांतून उणे अश्विनीनक्षत्र ४४ घ० ७ प०=१५ घ० ५३ प० ह्या शनिवारच्या भरणीनक्षत्राच्या घटिका झाल्या रविवारीं २ घटिकांनीं जन्म झाला आहे, म्हणून त्यांत २ घटिका मिळवा म्हणजे भरणीनक्षत्राच्या आरंभापासून इष्टकालपर्यंत १७ घ० ५३ प० गेलीं या सर्वांचीं पळें करा १७×६०=१०२०+५३ १०७३ पळें झालीं रीतीप्रमाणे याला ६० नीं गुणा १०७३×६०=६४३८० आतां या गुणाकारास भरणीनक्षत्राच्या एकंदर घटिकापळांनीं भागावयाचें आहे म्हणून शनिवारच्या भरणीनक्षत्राच्या १५ घ० ५३ प० व रविवारीं भरणीनक्षत्र ३९ घ० ५९ पळें आहे म्हणने आरंभापासून समाप्तिपर्यंत एकंदर ५५ घ० ५२ पळें भरणीनक्षत्र आहे याचीं पळें करा ५५×६०=३३००+५२ ३३५२ पळ भरणीनक्षत्रांत चंद्र होता आतां ६४३८० या संख्येला ३३५२ या संख्येनें भागा खालीं भागाकार केला आहे तो पहा

३३५२)६४३८०(१९ अं ३३५२)४१५२०(१२ क ३३५२)७७७६०(२३ वि

६९२×६०=४१५२० १२९६×६०=७७७६० ६६४

आतां भरणीनक्षत्रापूर्वीं एकच नक्षत्र गत झालें होतें म्हणून रीतीप्रमाण

१×६०=६० अंश यांत वरील भागाकाराचे अंक मिळवून त्या बेरजेस दोहोंनी गुणून नवांनीं भागावयाचे आहे म्हणून

| अं | क | वि |
|---|---|---|
| ६० | ० | ० |
| +१९ | १२ | २३ |
| ७९ | १२ | २३ |
| | | ×२ |
| ९) १५८ | २४ | ४६= |
| अं १७ | क ३६ | वि ५ |

येथें तिसांपेक्षा अंश कमी आहेत म्हणून ० राशी १७ अंश ३६ कला ५ विकला इतका स्पष्टचंद्र झाला. राशि शून्य असल्यामुळें पहिल्याच म्हणजे मेष राशींत चंद्र आहे असा अर्थ झाला. या रीतीप्रमाणें स्पष्टचंद्र करावा. येथें १७ अंशांचे ठिकाणीं ४७ अंश असते तर ४७-३०=१ रा १७ अं ३६ क ५ वि इतका स्पष्टचंद्र झाला असता.

## स्पष्टजन्मलग्नसाधन.

जन्मलग्न सिद्ध करण्याकरितां अयनांश, सायनग्रह, पलभा, चरखंडें, एकोदशावरून स्वदेशीय मेषादि लग्नांचे उदय तयार करणें, इत्यादि साधनें लागतात म्हणून हीं कृत्यें कशीं करावीं याविषयीं प्रथम माहिती सांगतों.

## अयनांश

शालिवाहन शकांतून ४४४ वजा करावे. बाकी जे अंक राहतील तितक्या वर्षास साठांनीं भागावें. जो भागाकार येईल, ते अंश आणि बाकी राहील त्या कला होत. ह्यास अयनांश म्हणतात. उदाहरण—शके १८३२ या वर्षाचे अयनांश काढावयाचे आहेत. म्हणून रीतीप्रमाणें १८३२-४४४ १३८८÷६०=२३ अंश ८ कला हे १८३२ या वर्षाचे अयनांश झाले. परंतु हे मेषसंक्रांतीच्या वेळेचे अयनांश झाले. म्हणून मेषसंक्रांतीपासून जन्मदिवसापर्यंत दिवस मोजून त्रैराशिक रीतीनें अयनांश काढावे. निरयन मेषसंक्रांति एप्रील महिन्याच्या सुमारें १२ तारखेस होते. उदाहरणार्थ, एकाचा जन्म मेच्या ३० तारखेस आहे म्हणजे मेषसंक्रांतीपासून ४९ दिवसांनीं आहे असी कल्पना करा. या वेळचे अयनांश काढावयाचे आहेत म्हणून ३६५ दि. ४९ दि. ६० वि. ८ विपळ्या हे विकलात्मक अयनांश मेषसंक्रांतीच्या वेळेच्या वरील अयनांशांत मिळविले म्हणजे एकंदर २३ अंश ८ कला आणि ८ विकला हे जन्मसमयाचे अयनांश झाले.

## ग्रह सायन करण्याची रीति.

स+अयन=सायन. निर्+अयन=निरयण. अयनांशासहित जे ग्रह ते सायन ग्रह होत. आणि ज्यांत अयनांश नाहींत ते निरयण ग्रह होत. मागें रवि, चंद्र स्पष्ट करून दाखविले आहेत ते निरयण ग्रह आहेत म्हणून त्यांत अयनांश मिळविले असतां तेच सायन स्पष्टग्रह होतील. मागील उदाहरणांपैकीं रवीचें पहिलें उदाहरण घ्या.

| | रा. | अं. | क. | वि. |
|---|---|---|---|---|
| निरयण स्पष्ट रवि. | १ | १२ | ३८ | ८ |
| +अयनांश | ० | २३ | ८ | ८ |
| =सायन स्पष्ट रवि | १ | ३५ | ४६ | १६ |

त्याच रीतीनें सर्व ग्रह सायन करितात.

## पलभा आणि चरखंडें.

मेषादिगे सायनभागसूर्ये दिनार्धजा भा पलभा भवेत्सा ।
त्रिस्था हतास्युर्दशभिर्भुजंगैर्दिग्भिश्चराद्धांनि गुणोद्धृतांत्या ॥१॥

ज्या दिवशीं सायन रवि, ० राशि ० अंश ० कला होऊन सायन मेषसंक्रांतीला आरंभ होतो त्या दिवशीं (एप्रील तारीख २१) मध्याह्नीं सूर्य असतां सपाट जागेवर बारा अंगुळें उंचीचा शंकु (मेख) ठेवून त्याची जी छाया पडते तिला पलभा अशी संज्ञा आहे. मुंबईची पलभा ४।७ म्हणजे ४ अंगुलें आणि ७ व्यंगुलें आहे पुण्याची बरोबर ४ अंगुलें आहे. ह्याप्रमाणें प्रत्येक ठिकाणची पलभा निराळी असते म्हणून कांहीं प्रसिद्ध शहरांच्या पलभा येथें देतों. आपल्या गांवची पलभा ठाऊक नसल्यास आपल्या गांवाजवळ असलेल्या एखाद्या गांवाची घ्यावी. तसें केल्यानें दोन चार व्यंगुलांचाच फरक पडेल.

| शहराचें नांव | पलभा अं. व्यं. | शहराचें नांव | पलभा अं. व्यं. | शहराचें नांव | पलभा अं. व्यं. |
|---|---|---|---|---|---|
| अमदाबाद | ५– ५ | जबलपूर | ५– ८ | मिरज | ३–२७ |
| अयोध्या | ६– ३ | तंजावर | २–१७ | मुंबई | ४– ७ |
| अहमदनगर | ४– ९ | द्वारका | ४–५५ | रत्नागिरी | ३–४० |
| आग्रा | ६–१० | दिल्ली | ६–३३ | रामेश्वर | १–५७ |
| इंदूर | ५– १ | नागपूर | ४–३९ | रायपूर | ४–३९ |
| उज्जयनी | ५– ८ | नाशिक | ४–२१ | लंडन | १५– ५ |
| उमरावती | ४–३४ | पंढरपूर | ३–४८ | लाहोर | ७–३३ |
| औरंगाबाद | ४–२१ | प्रयाग | ५–४१ | श्रीरंगपट्टण | २–३९ |
| कलकत्ता | ४–५८ | पुणें | ४– ० | सागर | ५–१८ |
| काशी | ५–४३ | बडोदा | ४–५५ | सातारा | ३–४९ |
| काश्मीर | ८– ६ | बेळगांव | ३–२५ | सुरत | ४–४० |
| कोल्हापूर | ३–३६ | भुसावळ | ४–३० | सोलापूर | ३–५० |
| गया | ५–३२ | भोपाळ | ५–१० | हरदा | ४–५९ |
| ग्वालेर | ५–५४ | मथुरा | ६–१५ | हैदराबाद नि० | ३–४५ |
| गोंवें | ३–२० | मद्रास | २–४७ | हैदराबाद सिंध. | ५–४१ |

१ प्रत्येक स्थलाचे जे पलभांक येथें दिले आहेत त्यांत दोन चार व्यंगुलांचा फरक असण्याचा संभव आहे. परंतु त्यामुळें शेवटीं फारसा फरक पडणार नाहीं.

चरखंडें—आपल्या गांवची पलभा तीन ठिकाणीं मांडून तिला अनुक्रमें १०, ८ आणि १० या अंकानीं गुणावें. जे तीन गुणाकार येतील त्यास अनुक्रमें पहिलें, दुसरें व तिसरें चरखंड म्हणावें. तिसऱ्या चरखंडास मात्र तिहींनीं भागावें लागतें. खालील उदाहरणें पहा

| मुंबईचीं चरखंडें | | | पुण्याचीं चरखंडें | | |
|---|---|---|---|---|---|
| पहि० | दुस० | तिस० | पहि० | दुस० | तिस० |
| ४।७ | ४।७ | ४।७ | ४ | ४ | ४ |
| ×१० | ×८ | ×१० | ×१० | ×८ | ×१० |
| ४१।१० | ३२।५६ | ३) ४१-१० | ४० | ३२ | ३) ४० |
| | | १३।४३ | | | १३।२० |

६० व्यंगुळें म्हणजे १ अंगुळ होतें. ५० व्यंगुळापेक्षा अधिक व्यंगुळें असल्यास त्याबद्दल एक संपूर्ण अंगुळ धरावें. पण त्यापेक्षा कमी व्यंगुळें असतील तर तीं हिशेबांत धरूं नयेत. कारण तीं सोडिल्यामुळें शेवटीं म्हणण्यासारिखा फरक पडत नाहीं.

## लंकोदयावरून स्वदेशीय राशींचे उदय.

मेषापासून मीनापर्यंत १२ राशींचे लंकेंतील उदय खालीं दिले आहेत. तीं पळें आहेत. मेष, वृषभ आणि मिथुन या तीन राशींच्या उदयाचीं जीं पळें तींच उलट क्रमानें कर्क, सिंह, कन्या या राशींच्या उदयाचीं पळें होत. तसेंच, कन्याराशीपासून उलट मेषराशीपर्यंत अनुक्रमानें जी पळें तींच तूळ राशीपासून मीनराशीपर्यंत सहा राशींच्या उदयाचीं पळें समजावीं. याचा अर्थ असा कीं मेष व तूळ, कन्या व मीन, वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ, आणि मिथुन, कर्क, धन व मकर या राशींचे पलात्मक अंक सारखे असतात. पुढील कोष्टक पहा

## लंकेंतील राशींचे पलात्मक उदय.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | २७८ | कर्क | ३२३ | तूळ | २७८ | मकर | ३२३ |
| वृषभ | २९९ | सिंह | २९९ | वृश्चिक | २९९ | कुंभ | २९९ |
| मिथुन | ३२३ | कन्या | २७८ | धन | ३२३ | मीन | २७८ |

आतां लंकोदयावरून बारा राशींचे स्वदेशीय किंवा स्थानिक उदय कसे तयार करावे हें सांगतों. ज्या गांवचे उदय तयार करावयाचे असतील त्या गांवचीं चरखंडें मागें लिहिलेल्या रीतीप्रमाणें तयार करून, तीं अनुक्रमानें मेष, वृषभ आणि मिथुन या राशींच्या लंकोदयाच्या पळांतून वजा करावीं, आणि तींच चरखंडें उलट क्रमानें कर्क, सिंह, कन्या या तीन राशींच्या पळांत मिळवावीं. म्हणजे

मेषापासून कन्याराशीपर्यंतचे उदय तयार झाले आणि हेच उदय उलट क्रमानें तूळराशीपासून मीनराशीपर्यंतचे उदयकाल समजावे उदाहरणाकरितां पलभा ४।० धरून त्यावरून येणारीं चरखंड घेऊन खालीं उदय तयार करून दाखविले आहेत, ते पहा म्हणजे ध्यानात येईल

| लंकोदयपळें | चरखंड | | | स्वोदय किंवा स्थानिक पळें | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | २७८ — | ४० | = | २३८ ,, | = | ३ घ० ५८ पळें | मेष |
| वृषभ | २९९ — | ३२ | = | २६७ ,, | = | ४ घ० २७ पळें | वृषभ |
| मिथुन | ३२३ — | १३ | = | ३१० ,, | = | ५ घ० १० पळें | मिथुन |
| कर्क | ३२३ + | १३ | = | ३३६ ,, | = | ५ घ० ३६ पळें | कर्क |
| सिंह | २९९ + | ३२ | = | ३३१ ,, | = | ५ घ० ३१ पळें | सिंह |
| कन्या | २७८ + | ४० | = | ३१८ ,, | = | ५ घ० १८ पळें | कन्या. |

आतां उलट क्रमानें म्हणजे कन्येपासून मेषराशीपर्यंत जे पलात्मक उदय, तेच अनुक्रमानें तूळराशीपासून मीनराशीपर्यंत होतात, असें वर लिहिलें आहे, म्हणून तूळ ३१८ वृश्चिक ३३१ धन ३३६ मकर ३१० कुंभ २६७ मीन २३८ आता बारा राशींचे स्वोदय, किंवा स्थानिक उदय तयार झाले ते असे —

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | २३८ | कर्क | ३३६ | तूळ | ३१८ | मकर | ३१० |
| वृषभ | २६७ | सिंह | ३३१ | वृश्चिक | ३३१ | कुंभ | २६७ |
| मिथुन | ३१० | कन्या | ३१८ | धन | ३३६ | मीन | २३८ |

## लग्नसाधनाची रीति.

ज्या वेळेचें स्पष्टजन्मलग्न सिद्ध करावयाचें असेल त्या वेळेचा स्पष्टरवि करून त्यात अयनांश मिळवावे जी बेरीज येईल तींतून राशीचा अंक बाजूस ठेवावा बाकी जे अंशकलादि अंक राहतील, ते बाजूस ठेविलेल्या राशीच्या पुढील राशीचे भुक्तांश होत तीस अंश म्हणजे एक राशी होतो, म्हणून हे भुक्तांश तिसांतून वजा करावे म्हणजे त्याच राशीचे भोग्यांश येतील ज्या राशीचे हे भोग्यांश असतील त्या राशीच्या ( स्थानिक ) उदयाच्या पळांनीं त्यांस गुणून तिसांनीं भागावें ज उत्तर येईल त त्या राशीचीं भोग्य पळें होत हीं भोग्य पळें, सूर्योदयापासून जन्मकालपर्यंत जितक्या घटिका व पळें गेलीं असतील त्या सर्वांचीं पळें करून, त्यांतून वजा करावीं जी बाकी राहील तींतून, ज्या राशीच्या उदयानं गुणलें असेल, त्याच्या पुढील राशीचे जितके उदय वजा जातील तितके घ्यावे आणि नंतर जी पलात्मक बाकी राहील तिला तिसांनीं गुणावें त्या गुणाकारास अशुद्धोदयानें म्हणजे ज्या राशीचा उदय वजा गेला नसेल त्या उदयानं भागावं उत्तर अंशकलाविकलात्मक आणावं यांत मेष राशीपासून जितक्या राशींचे उदय वजा गेले असतील तितके राशअंक मिळवाव त्या बेरजेतून अयनांश वजा करावे म्हणजे निरयण स्पष्टलग्न झालें.

उदाहरण—शके १८२२ वैशाखकृष्ण २ शुक्रवारीं २० घटिका ३० पळांनीं पुत्राचा जन्म झाला आहे. या वेळेचें स्पष्टलग्न सिद्ध करावयाचें आहे. या वेळेचा स्पष्टरवि मागें दिला आहे तो ( उदाहरण पहिलें ) पहा आणि त्यांत अयनांश मिळवा. येथें राशीचा अंक २, म्हणजे वृषभराशि आहे तो बाजूस ठेवा.

| रा० | अं० | क० | वि० | |
|---|---|---|---|---|
| १ | १२ | ३८ | ६ | स्पष्टरवि. |
| +० | २२ | ८ | ८ | अयनांश. |
| २ | ५ | ४६ | १४ | सायन स्पष्टसूर्य. |

बाकी ५ अंश ४६ कला आणि १४ विकला हे वृषभ राशीच्या पुढील राशी जी मिथुन तिचे भुक्तांश होत. हे अंक ३० अंशांतून वजा या म्हणजे मिथुनराशीचे भोग्यांश निघतील.

| अं० | क० | वि० |
|---|---|---|
| ३० | ० | ० |
| –५ | ४६ | १४ |
| २४ | १३ | ४६ |

आतां हे भोग्यांश २४ अंश १३ कला आणि ४६ विकला इतके आहेत. याला मिथुनराशीच्या स्थानिक उदयाच्या पळांनीं गुणा. मिथुनराशीचे स्थानिक उदयाचे पळांक ३१० आहेत. म्हणून.

| | | |
|---|---|---|
| ४६ | १३ | २४ |
| ×३१० | ×३१० | ×३१० |
| ६०) १४२६० | ४०३० | ७४४० |
| २३७–४० बाकी | +२३७ | +७१ |
| | ६०) ४२६७ | ७५११ अंश |
| | ७१–७ बाकी | |

७५११ अंश ७ कला आणि ४० विकला उत्तर आलें. येथें कला व विकला सोडून द्या आणि अंशांला ३० नीं भागा. ७५११÷३०=२५० भागाकार आला. मिथुनलग्नाचे भोग्यांश होत. आतां इष्टकाळ २० घटिका ३० पळें आहे यांचीं पळें करा २०×६०=१२००+३०=१२३० पळें झालीं. वर मिथुनराशीच्या पळांनीं गुणिलें आहे. म्हणून मिथुनराशीचे भोग्यांश व त्याच्या पुढील राशी कर्क त्यापासून जितक्या राशींचे उदय १२३० पळांतून वजा जातील तितके !

१२३०
–२५० मिथुन राशीचें भोग्यांश
९८०
–३३६ कर्कोदय पळें
६४४
–३३१ सिंहोदय पळें
३१३

बाजूस वजाबाकी करून दाखवि
आहे ती पहा. बाकी ३१३
हिली. तींतून कन्या राशीच्या (
याचीं पळें ३१८ वजा जात नाहं
म्हणून कन्यालग्न जन्मकाळीं है
हें सिद्ध झालें. आतां सिंहो
वजा जाऊन बाकी ३१३ राहिली

हिला रीतीप्रमाण तिसांनीं गुणा आणि धनुरुद्योदयाच्या म्हणजे ज्या लग्नाचीं पळ वजा जात नाहींत त्या कन्योदयाच्या पळांनीं भागा जसें, ३१३×३०–९३९०–३१८–२९ अंश ३१ कला आणि ४१ विकला इतके कन्यालग्नाचे अंश उदित होते यातून अयनांश वजा था आणि मेषराशीपासून कन्याराशीचा अनुक्रमांक ६ हा अंशाचे अंकामागें मांडा म्हणजे ६ राशि ६ अंश २३ कला आणि

| | | |
|---|---|---|
| अं० | क० | वि० |
| २९ | ३१ | ४१ |
| अय०–२३ | ८ | ८ |
| ६ | २३ | ३३ |

३३ विकला इतके निरयण स्पष्टलग्न आलें

आता भोग्यकालाहून इष्टकाल कमी असता स्पष्टलग्न कसें साधावें हे सांगतो जन्मकालाचे पलात्मक अंक कमी असून भोग्यकालाचे अंक अधिक असतील तेव्हा जन्मकालाच्या पलात्मक अंकाला ३० नीं गुणून सायनसूर्य ज्या राशीस असेल त्या राशीच्या स्थानिक उदयात्मक पलांनीं भागावें जो अंशात्मक भागाकार येईल तो त्या वेळेच्या स्पष्टसूर्यामध्ये मिळवावा म्हणजे तात्कालिक स्पष्टलग्न होतं व त्यातून अयनांश वजा केले म्हणजे निरयण स्पष्ट लग्न होतें यरचेच उदाहरण घ्या सायन स्पष्ट रवि २ रा० ५ अं० ४६ क० १४ विकला येथपासून मागील उदाहरणात तयार केलेला भोग्यकाल २५० पळे आहे आता जन्मकाल सूर्योदयापासून १ घटिका १५ पळांनीं आहे असे समजा याचीं पळ ७५ झालीं या इष्टकालातून भोग्यकाल २५० पळ वजा होत नाहीं, म्हणून रीतीप्रमाण ७५×३० २२५० याला मिथुनराशीच्या उदयाच्या पळांनीं भागा कारण सायनसूर्य मिथुनराशीला आहे २२५०–३१०=७ अंश १५ कला २९ विकला इतका भागाकार आला हे अंशादि अंक सायन स्पष्टसूर्यांत मिळवा सायन स्पष्टसूर्य २ रा०, ५ अं०, ४६ क०, १४ वि०,+० रा०, ७ अं०, १५ क०, २९ वि० २ रा०, १३ अं०, १ क०, ४३ वि०, इतकें स्पष्ट लग्न झालें यातून अयनांश २३ अं० ८ क० ८ वि० वजा करा म्हणजे १ रा० १९ अं० ५३ क० ३५ वि० इतकें इष्टकालचें निरयण स्पष्टलग्न झालें

## लग्नसाधनाची स्थूल रीति.

मेषे मीने चतुर्नाड्य सार्द्धाश्च वृषकुम्भयो ।
मिथुने मकरे पंच शेषा सार्द्धा प्रकीर्तिता ॥ २ ॥
मेषे मीने पलान्यष्टौ नवकं वृषकुम्भयो ।
मिथुने मकरे द्विक शेषा रुद्रा प्रकीर्तिता ॥ ३ ॥

इष्टकालचें लग्न कसें साधावें याची सूक्ष्म रीति वर दिलीच आहे आतां लग्नसाधनाची स्थूल रीति सांगतो प्रश्न वगैरे पहावयाचे असतील म्हणजे

ज्या वेळेस लग्नाचे मुक्तमोम्यारा वगैरे बळण्याची विशेष आवश्यकता नसेल अशा वेळीं स्थूल रीतीनें लग्न साधाव म्हणजे मोठ्या वेळात काम होईल स्थूल रीतीनें लग्न सिद्ध करण्याकरिता मेषादि लग्न एकंदर किती घटिका भोगतात, व प्रत्येक दिवशीं त्याचीं किती पळे भुक्त होतात हे समजलें पाहिजे, म्हणून त्याविषयीं प्रथम लिहितो मेष व मीन हीं दोन लग्न चार घटिका भोगतात वृषभ व कुंभ साडेचार घटिका भोगतात मिथुन व मकर हीं पांच घटिका व बाकीचीं म्हणजे कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक आणि धन हीं साडेपाच घटिका भोगतात एकाद्या लग्नाच्या जितक्या एकंदर भोग्य घटिका असतील त्या घटिकाच्या दुप्पट पळे रोज त लग्न कमी होत जात जस मेष व मीन रोज ८ पळ वृषभ व कुंभ रोज ९ पळ मिथुन व मकर रोज १० पळ व बाकीचीं म्हणजे कर्क, सिंह, कन्या तूळ, वृश्चिक आणि धन हीं रोज ११ पळ भोगतात रीति—ज्या वेळेच लग्न पाहिजे असेल त्या वेळेपर्यंत त्या दिवसाच्या सूर्योदया पासून किती घटिका व पळ गत झाला आहेत हें प्रथम काढाव त्यास इष्टकाळ म्हणतात नंतर जी चालू लग्नात असेल तिला आरंभ होऊन नितके दिवस झाले असतील नितक्या दिवसाला त्या लग्नाचीं प्रतिदिवशीं भोगण्याचीं जीं पळे असताल त्यानीं गुणाव जो गुणाकार येईल ना पळ होत त्याला ६० नीं भागून घटिका कराव्या त्या घटिका त्या लग्नाच्या एकंदर घटिकातून वजा कराव्या बाकी जी राहील तितकी लग्नात भोगावयाची राहिली अस समजाव जी चालू लग्नात असेल तच दिवसाच प्रथम लग्न होय न नितक भोगावयाचें राहिलें असेल तितकें काढून त्याच्या खाला अनुक्रमाने त्याच्या पुढील लग्नाच्या घटिका माडीत जाव्या ज्या लग्नाच्या घटिकात आपला इष्टकाळ येईल त त्या वळच लग्न होय उदाहरणार्थ सहाव्या तारखेस सायकाळी साडेपाच वाजता कोण लग्न आहे त काढावयाच आहे त्या दिवशी सूर्योदय बरोबर साडेसहा वाजता झाला आहे म्हणजे सूर्योदयापासून एकंदर ११ तास म्हणजे २७ घटिका ३० पळ झाला हा इष्टकाळ झाला आता चालू लग्नात कन्या आहे असें समजा तिला पहिल्या तारखेस सकाळीं साडेसहा वाजता आरंभ झाला आहे पहिल्या तारखेपासून इष्टकाळपर्यंत म्हणजे सहाव्या तारखेच्या दिवशीं सायकाळी साडेपाच वाजेपर्यंत एकंदर ५॥ दिवस झाले म्हणून रीतीप्रमाण ५॥×११ (कन्यालग्नाचीं प्रतिदिवशीं भोगण्याची पळ) ६०॥—१ घटिका ॥ पळ अर्धे पळ सोडाव =१ घटिका कन्यालग्न इष्टकाळपर्यंत भुक्त झाल कन्यालग्नाच्या एकंदर घटिका ५॥—१ भुक्त घटिका =४॥ घटिका म्हणजे ४ घटिका ३० पळे

इतकें कन्यालग्न भोगावयाचें राहिलें. आतां आपल्याला २७॥ घटिका दिवसास कोण लग्न आहे ते पहावयाचें आहे म्हणून बाजूस दाखविल्याप्रमाणें मकरलग्न २६ घटिका दिवसास संपून नंतर पुढें कुंभलग्न ४॥ घटिका म्हणजे ३० घटिका दिवसापर्यंत आहे व आपला इष्टकाळ २७॥ घटिका आहे म्हणजे २६ घटिकांपुढे व ३० घटिकांच्या आंत आहे म्हणून इष्टकाळीं कुंभलग्न आहे असें जाणावें.

| | | |
|---|---|---|
| | घ० | प० |
| कन्या | ४ | ३० |
| तूळ | ५ | ३० |
| वृश्चिक | ५ | ३० |
| धन | ५ | ३० |
| मकर | ५ | ० |
| | २६ | ० |

## द्वादशभावसाधन.

ज्या इष्टकालचे भाव साधावयाचे असतील त्या वेळेचें लग्न पूर्वी सांगितल्याप्रमाणें साधावें म्हणजे तोच प्रथमभाव होतो. दशमभावांतून सप्तमभाव उणें करून बाकी राहील तिला तिहींनीं भागून भागाकाराचे राश्यादि अंक प्रथमभावास मिळवावे म्हणजे द्वितीयभाव होतो. दशमभावांतून सप्तमभाव वजा करून जी वजाबाकी येईल तिला तिहींनीं भागावें. जो भागाकार येईल त्याची दुप्पट करून ती प्रथमभावास मिळवावी म्हणजे तृतीयभाव होतो. दशमभावास ६ राशी मिळविल्या म्हणजे चतुर्थभाव होतो. दशमभावांतून सप्तमभाव वजा करून त्या वजाबाकीस तिहींनीं भागावें. जो भागाकार येईल तो २ राशी ० अंश ० कला यांतून उणें करावा. जे शेषांक राहतील ते चतुर्थभावास मिळवावे म्हणजे पंचमभाव होतो, व त्याच शेषांकाची दुप्पट करून चतुर्थभावास मिळवावी म्हणजे षष्ठभाव होतो. प्रथमभाव, द्वितीयभाव आणि तृतीयभाव यांस सहा सहा राशी मिळविल्या म्हणजे अनुक्रमें सप्तमभाव, अष्टमभाव आणि नवमभाव तयार होतात. तसेंच, पंचमभावास सहा राशी व षष्ठभावास सहा राशी मिळविल्या म्हणजे अनुक्रमें एकादशभाव आणि द्वादशभाव तयार होतात. आतां दशमभाव साधनाची रीति सांगतों. लग्नादि द्वादशभाव साधनाचा प्रकार किंचित् कठिण आहे. त्यांतल्यात्यांत दशमभाव साधणें थोडें अधिक कठिण आहे. दशमभाव तयार झाल्यानंतर इतर भाव तयार करणें मात्र बरेंच सोपें आहे. असो. दशमभाव साधण्याकरितां नतोन्नत काढावें लागतें म्हणून तत्संबंधी थोडीं माहिती लिहितों. पण नतोन्नत म्हणजे काय हें येथें प्रथम सांगितलें पाहिजे. नतांश खस्वस्तिकापासून मोजितात. आपल्या डोकीवर समोरासमोर आकाशांतील जो बिंदु त्याला खस्वस्तिक म्हणतात. खस्वस्तिकबिंदु हाच कुंडलींतील दशमभाव होय. खस्वस्तिक बिंदूंत मध्याह्नीं सूर्य असतो. अर्थात् त्याच्यापूर्वी तो खालीं असेल हें उघड आहे. परंतु तो किती खालीं आहे म्हणजे नतांश किती आहेत, हें, दिनार्धांतून इष्टकाल उणें करावा

म्हणजे समजतें. तात्पर्य, मध्याह्नींचा सूर्य आणि इष्टकाल या दोहोंमधील जें आकाशांतील अंतर किंवा जो कोन त्यासच नताश असी संज्ञा आहे. खस्व स्तिक बिंदूच्या समोरासमोर ( लग्नापासून चतुर्थस्थान ) म्हणजे आपल्या पाया खालच्या आकाशांतील जो बिंदु तें अधःस्वस्तिक होय. या बिंदूत मध्यरात्रीं पाताळांत सूर्य असतो. आकाशस्थ इष्ट वस्तु व प्रहाची क्षितिजावरील उंची या दोहोंमधील जो कोन त्यास उन्नतांश म्हणतात.

दिवसा मध्याह्नापूर्वी जन्म असल्यास सूर्योदयापासून जितक्या घटिकांनीं जन्म असेल तितक्या घटिका दिनमानाचें अर्ध करून त्यांतून वजा केल्या म्हणजे दिवसपूर्वनत होत. दिवसा मध्याह्नानंतर जन्म असल्यास सूर्योदयापासून जितक्या घटिकांनीं जन्म असेल तितक्या घटिका दिनमानांतून वजा जाव्या व बाकी राहील ती दिनार्धांतून वजा करावी म्हणजे दिवसपश्चिमनत होतें. मध्यरात्रीनंतर जन्म असल्यास जन्मकालापासून पुढें जी शेष रात्र राहिली असेल तिला दिनार्ध मिळविलें म्हणजे रात्रिपूर्वनत होतें. मध्यरात्रीपूर्वी इष्टकालपर्यंत जी गतरात्र असेल तिला दिनार्ध मिळविलें म्हणजे रात्रिपश्चिमनत होत. नत काल ३० घटिकांतून वजा केला म्हणजे उन्नतकाल होतो. पूर्वनत वजा केलें असल्यास त्यास पूर्वोन्नतकाल म्हणतात, व पश्चिमनत वजा केलें असल्यास पश्चिमोन्नतकाल म्हणतात. पूर्वनत असेल तर पूर्वोन्नतकाल करून त्यासच इष्टकाल कल्पून तात्कालिक स्पष्ट सूर्य करून त्यास ६ राशी मिळवून एकोदयानीं पूर्वोक्त रीतीप्रमाणें लग्न साधावें म्हणजे तोच दशमभाव होतो. आणि पश्चिमनत असेल तर नतकाल हाच इष्टकाल कल्पून तात्कालिक स्पष्ट सूर्य करून एकोदयानीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें लग्न साधावें, म्हणजे तोच दशमभाव होतो. बरोबर मध्याह्नीं जन्म झाला असता तात्कालिक स्पष्ट सूर्यच दशमभाव होतो आणि बरोबर मध्यरात्रीं जन्म झाला तर तात्कालिक सूर्य हाच चतुर्थभाव होतो.

उदाहरण—वैशाख शुद्ध ८ सोमवार जन्मकाल ५ घटिका ३० पळें. दिनमान ३२ घटिका १६ पळें यांचें दिवसपूर्वनत काढा. दिनमानार्ध अर्धे १६ घटिका ८ पळें. यांतून उणे जन्मकाल ५ घटिका ३० पळें =१० घ० ३८ पळें हें दिवसपूर्वनत होय. जर मध्याह्नानंतर जन्मकाल असेल तर दिवसपश्चिमनत काढून दशमभाव साधन केलें पाहिजे. उदाहरणार्थ, जन्मकाल २४ घ० १२ पळांनीं आहे. या घटिका दिनमानांतून म्हणजे ३२ घटिका १६ पळांतून वजा करितां बाकी ८ घटिका ४ पळें राहतात. हीं घटिका पळें दिनार्धांतून म्हणजे १६ घटिका ८ पळांतून वजा जातां बाकी ८ घटिका ४ पळें राहतात हें दिवसपश्चिमनत झालें. एकाचा जन्म रात्रीं सूर्योदयापासून ५५ घ० ५ पळांनीं आहे, म्हणून दशमभावसाधनार्थ येथें रात्रिपूर्वनत काढलें पाहिजे.

रीतीप्रमाणें इष्टकाल ५५ घटिका ५ पळें हीं अहोरात्राच्या घटिका ६० यांतून वजा करितां शेष ४ घ० ५५ प० राहतात. हीं दिनमानार्ध घ० १६ प० ८ यांत मिळवितां घ० २१ प० ३ इतकी वेरीज आली. हें रात्रिपूर्वनत होय. गतरात्र घ० १० प० १२ या वेळीं म्हणजे मध्यरात्रीपूर्वी पुत्राचा जन्म आहे म्हणून दशमभाव साधण्याकरितां येथे रात्रिपश्चिमनत काढलें पाहिजे. म्हणून गतरात्र घ० १० प० १२+ दिनार्ध घ० १६ प० ८=घ० २६ प० २० हें रात्रिपश्चिमनत होय. आतां द्वादशभाव तयार करून दाखवितों.

उदाहरण—शके १८३२ वैशाख शुक्ल ८ सोमवार तारीख १६ मे १९१० ह्या दिवशीं ७ वाजून ४० मिनिटांनीं एकाचा जन्म झाला आहे त्या वेळेचे भाव साधावयाचे आहेत. या दिवशीं सूर्योदय ५ वाजून २८ मिनिटांनीं आहे, म्हणून इष्टकालपर्यंत २ तास आणि १२ मिनिटें म्हणजे ५ घटिका ३० पळें झालीं. या वेळचा स्पष्टसूर्य १ रा० १ अं० ५० क० २६ विकला आहे. यांत २२ अंश ८ क० ८ वि० इतके अयनांश मिळवा. वेरीज १ रा० २४ अं० ५८ क० ३४ वि० इतकी आली हा इष्टकालचा स्पष्टसूर्य झाला. याचे अंशादि अंक ३० तून वजा करा. बाकी ५ अं० १ क० २६ वि० इतकी आली. इष्टकालचा रवि वृषभ राशीस आहे म्हणून या बाकीस वृषभोदय पळें २६७ यांनीं गुणा. गुणाकार १३४१ अंश २६ क० ४२ वि० इतका आला. येथें कला व विकला सोडून द्या आणि अंशाला ३० नीं भागा. १३४१–३०=४४ हा भागाकार आला. [redacted] रविभोग्यकाल झाला. इष्टकाल घ० ५ प० ३०=३३० पळें आहे, यांतून रविभोग्यकाल वजा करा. ३३० उणे ४४ बाकी २८६ पळें राहिलीं. ह्यांतून मिथुनोदय पळें ३१० वजा जात नाहींत म्हणून मिथुनोदय हा अशुद्धोदय झाला. आतां २८६×३०=८५८० याम अशुद्धोदय जो मिथुनोदय याचीं पळें ३१० यांनीं भागा. भागाकार २७ अं० ४० क० ३८ वि० इतका आला. येथें अशुद्धोदय मिथुन आहे म्हणून त्याच्या पूर्वीचा वृषभ राशीचा अंक २ हा अंशाच्या मागें राशिस्थानीं मिळविला तेव्हां २ रा० २७ अं० ४० क० ३८ वि० हें सायन लग्न झालें. यांतून अयनांश ० रा० २३ अं० ८ क० ८ वि० वजा केले म्हणजे २ रा० ४ अं० ३२ क० ३० वि० हें इष्टकालचें निरयण स्पष्टलग्न झालें. हा प्रथमभाव झाला. याला ६ राशी मिळविल्या म्हणजे ८ रा० ४ अं० ३२ क० ३० विकला हा सप्तमभाव झाला.

आतां दशमभाव साधनाचें उदाहरण करून दाखवितों. जन्मकाल सूर्योदयापासून ५ घटिका ३० पळांनीं आहे. या वेळचा दशमभाव सिद्ध करावयाचा आहे. जन्मकाल मध्याह्नापूर्वी आहे म्हणून येथें दिनपूर्वनत केलें पाहिजे. दिनमान ३२ घटिका १६ पळें आहे. याचें अर्ध १६ घटिका ८ पळें यांतून उणे ५

घटिका ३० पळें =१० घ० ३८ प० हें दिनपूर्वनत झालें. हें ३० तून वजा केलें म्हणजे १९।२२ हें दिनपूर्वोंचत झालें. आतां १९ घ० २२ प० इष्टकाल कल्पून उमाप्रमाणें दशमभाव साधिलों. इष्टकालचा सायन स्पष्टसूर्य राशी १ अंश २४ क० ५८ वि० ५४ इतका आहे यास ६ राशि मिळवा म्हणजे राशी ७ अंश २४ क० ५८ वि० ५४ इतकी बेरीज होते. याचे भोग्य अंश काढावयाचे आहेत म्हणून राशीचा अंक ७ हा बाजूस ठेवून बाकीचे अंशकलादि अंक ३० तून वजा करा. अं० ३० क० ० वि० ० यांतून उणें अं० २४ क० ५८ वि० ३४=५ अं० १ क० २६ वि० इतकी वजाबाकी आली. हिला २९९ अंकांनीं गुणा; कारण, बाजूस ठेविलेला अंक ७ हा तूळ राशीचा दर्शक आहे व याच्या पुढील राशि वृश्चिक आहे व लंका वृश्चिकोदय पळें २९९ आहेत. गुणाकार १५०२ अं० ८ क० ३४ वि० इतका आला. येथें कला व विकला यांचे अंक सोडून द्या किंवा यायद्दल १ अंश धरूं म्हणजे १५०३ अंश झाले. त्याला ३० नीं भागा. भागाकार ५० आला. हा भोग्यकाळ झाला. आतां हा भोग्यकाळ उन्नतकालरूप इष्ट घ० १९ पळें० २२ याचीं पळें करून त्यांतून वजा करा. १९×६०=११४०+२२=११६२ यांतून उणें भोग्यकाल पळें ५० बाकी १११२ राहिली. यांतून वजा लंका धनोदय पळें ३२३ बाकी ७८९ राहिली. यांतून वजा लंका मकरोदय पळें ३२३ बाकी ४६६ राहिली. यांतून लंका कुंभोदय पळें २९९ वजा जातां बाकी १६७ राहिली. यांतून लंका मीनोदय पळें २७८ वजा जात नाहींत म्हणून हा अशुद्धोदय होय. बाकी १६७ राहिली तिला ३० नीं गुणिलें. १६७×३० गुणाकार ५०१० आला. त्यास अशुद्धोदय जो मीन त्याच्या उदयपळांनीं म्हणजे २७८ नीं भागिलें. तेव्हां भागाकार १८ अं० १ क० १७ वि० इतका आला. यांत अशुद्धोदयाच्या पूर्वीचा राशि ११ मिळविला तेव्हां ११ राशि १८ अंश १ क० १७ वि० इतकी बेरीज झाली. यांतून अयनांश २३ अं० ८ क० ८ वि० उणें केले तेव्हां वजाबाकी १० रा० २४ अं० ५२ क० ९ वि० इतकी आली. हा दशमभाव झाला.

| अं० | क० | वि० |
|---|---|---|
| ५ | १ | २६ |
| | | ×२९९ |
| १५०२ | ८ | ३४ |

आतां दशमभावामध्यें सप्तमभाव वजा करा. दशमभाव १० रा० २४ अं० ५२ क० ९ वि० यांतून उणें सप्तमभाव ८ रा० ४ अं० ३१ कला ३० वि० बाकी २ रा० २० अं० २० क० ३९ वि० इतकी आली. या बाकीचा तृतीयांश ० रा० २६ अं० ४६ क० ५३ वि० इतका आहे. (येथें राशीचा अंक २ याचा तृतीयांश काढितांना तिहींनीं भाग जात नाहीं म्हणून तिसांनीं गुणून राशीचे अंश करून नंतर भागिलें आहे. जसें २×३०=६०+२०=८०÷३=२६ इत्यादि)

हा प्रथम म्हणजे तनुभावामध्ये मिळवा. प्रथमभाव २ रा० ४ अं० ३२ क० ३० वि०+० रा० २६ अं० ४६ क० ५३ वि० या दोहोंची बेरीज ३।१।१९।२३ इतकी आली. हा द्वितीयभाव झाला. पूर्वी आणिलेल्या तृतीयांशाची दुप्पट अं० २६।४६।५३×२=रा० १।२३।३३।४६ हे अंक तनुभावांत मिळविले म्हणजे रा० ३।२८।६।१६ इतकी बेरीज आली. हा तृतीयभाव झाला. वर दिलेल्या दशमभावांत ६ राशी मिळविल्या तेव्हां ४।२४।५३।१९ हा चतुर्थभाव झाला. आतां पूर्वी आणिलेला तृतीयांश दोन राशींत वजा करा. असें, २ रा० ० अं० ० क० ० वि० यांतून वजा ० रा० २६ अं० ४६ क० ५३ विकला बाकी १ रा० ३ अं० १३ क० ७ वि० इतकी राहिली. हीं चतुर्थभावास मिळविली तेव्हां ५।२८।६।१६ इतकी बेरीज आली. हा पंचमभाव झाला. आतां २ राशींतून तृतीयांश वजा करून जी बाकी म्हणजे १।३।१३।७ राहिली हिची दुप्पट २।६।२६।१४ ही चतुर्थभावांत म्हणजे ४।२४।५३।१९ या अंकांत मिळविली म्हणजे ७।१।१९।२३ इतकी बेरीज आली हा षष्ठभाव झाला. सप्तमभाव वर उदाहरण करून दाखविलाच आहे. द्वितीयभावास म्हणजे ३।१।१९।२३ या अंकांत ६ राशी मिळविल्या म्हणजे ९।१।१९।२३ हा अष्टमभाव झाला. तसेंच, तृतीयभावास ६ राशी मिळविल्या म्हणजे ९।२८।६।१६ इतकी बेरीज आली हा नवमभाव झाला. दशमभाव वर उदाहरण करून आणिलाच आहे. पंचमभावास ६ राशी मिळविल्या तेव्हां ११।२८।६।१६ इतका एकादशभाव झाला. आणि षष्ठभावास म्हणजे ७।१।१९।२३ या अंकांत ६ राशी मिळविल्या तेव्हां १।१।१९।२३ हा द्वादशभाव म्हणजे व्ययभाव झाला. याप्रमाणें द्वादश भाव तयार करितात.

आतां भावसंधिप्रकार सांगतों. तनुभाव म्हणजे प्रथमभाव आणि धनभाव म्हणजे द्वितीयभाव या दोहोंची बेरीज करून अर्ध केलें म्हणजे तनुभावाचा विरामसंधि आणि द्वितीयभावाचा आरंभसंधि होतो. द्वितीयभाव आणि तृतीयभाव या दोहोंची बेरीज करून अर्ध केलें म्हणजे द्वितीयभावाचा विरामसंधि आणि तृतीयभावाचा आरंभसंधि होतो. याचा अर्थ असा कीं, पूर्वीच्या भावाचे आणि त्याच्या पुढील भावाचे जे राश्यादि अंक, त्या दोहोंची बेरीज करून त्या बेरजेस दोहोंनीं भागिलें म्हणजे जें लब्ध येईल ते पूर्वीच्या भावाचा विरामसंधि व पुढील भावाचा आरंभसंधि होतो. याचप्रमाणें द्वादशभावांचे संधि तयार करावे. शेवटचा म्हणजे व्ययभाव आणि प्रथमभाव या दोहोंची बेरीज करून तिचें अर्ध केलें म्हणजे व्ययभावाचा विरामसंधि व तनुभावाचा आरंभसंधि होतो. आतां पूर्वी तयार केलेले द्वादशभाव घेऊन भावसंधीचें उदाहरण करून दाखवितों

प्रथमभाव २ रा० ४ अं० ३२ क० ३० वि० आणि द्वितीयभाव ३ रा० १ अं०

१९ क० २३ वि० या दोहोंची बेरीज ५ रा० ५ अं० ५१ क० ५३ वि० इतकी झाली. या बेरजेचें अर्ध केलें तेव्हां २ रा० १७ अं० ५५ क० ५७ वि० हा तनुभावाचा विरामसंधि व द्वितीयभावाचा आरंभसंधि झाला. द्वितीयभाव ३ रा० १ अं० १९ क० २३ वि० आणि तृतीयभाव ३ रा० २८ अं० ६ क० १६ वि० यांची बेरीज ६ रा० २९ अं० २५ क० ३९ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां ३ रा० १४ अं० ४२ क० ४९ वि० हा द्वितीयभावाचा विरामसंधि व तृतीयभावाचा आरंभसंधि झाला. तृतीयभाव ३ रा० २८ अं० ६ क० १६ वि० आणि चतुर्थभाव ४ रा० २४ अं० ५३ क० ९ वि० यांची बेरीज ८ रा० २२ अं० ५९ क० २५ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां ४ रा० ११ अं० २९ क० ४२ वि० हा तृतीयभावाचा विरामसंधि आणि चतुर्थभावाचा आरंभसंधि झाला. चतुर्थभाव ४ रा० २४ अं० ५३ क० ९ वि० आणि पंचमभाव ५ रा० २८ अं० ६ क० १६ वि० यांची बेरीज १० रा० २२ अं० ५९ क० २५ वि० इतकी झाली. हिचें अर्ध ५ रा० ११ अं० २९ क० ४२ वि० हा चतुर्थभावाचा विरामसंधि व पंचमभावाचा आरंभसंधि झाला. पंचमभाव ५ रा० २८ अं० ६ क० १६ वि० आणि षष्ठभाव ७ रा० १ अं० १९ क० २३ वि० या दोहोंची बेरीज १२ रा० २९ अं० २५ क० ३९ वि० इतकी झाली. या बेरजेचें अर्ध केलें म्हणजे ६ रा० १४ अं० ४२ क० ४९ वि० [illegible] पंचमभावाचा विरामसंधि व षष्ठभावाचा आरंभसंधि झाला. आतां षष्ठभाव ७ रा० १ अं० १९ क० २३ वि० आणि सप्तमभाव ८ रा० ४ अं० ३२ क० ३० वि० यांची बेरीज १५ रा० ५ अं० ५१ क० ५३ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां ७ रा० १७ अं० ५५ क० ५६ वि० हा षष्ठभावाचा विरामसंधि व सप्तमभावाचा आरंभसंधि झाला. सप्तमभाव ८ रा० ४ अं० ३२ क० ३० वि० आणि अष्टमभाव ९ रा० १ अं० १९ क० २३ वि० यांची बेरीज १७ रा० ५ अं० ५१ क० ५३ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां ८ रा० १७ अं० ५५ क० ५६ वि० हा सप्तमभावाचा विरामसंधि आणि अष्टमभावाचा आरंभसंधि झाला. अष्टमभाव ९ रा० १ अं० १९ क० २३ वि० आणि नवमभाव ९ रा० २८ अं० ६ क० १६ वि० या दोहोंची बेरीज १८ रा० २९ अं० २५ क० ३९ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां ९ रा० १४ अं० ४२ क० ४९ वि० हा अष्टमभावाचा विरामसंधि व नवमभावाचा आरंभसंधि झाला. नवमभाव ९ रा० २८ अं० ६ क० १६ वि० आणि दशमभाव १० रा० २४ अं० ५३ क० ९ वि० यांची बेरीज २० रा० २२ अं० ५९ क० २५ वि० इतकी झाली. हिचें अर्ध केलें तेव्हां १० रा० ११ अं० २९ क० ४२ वि० हा नवमभावाचा विरामसंधि व दशमभावाचा आरंभसंधि झाला. दशमभाव १० रा० २४ अं० ५३ क० ९ वि० आणि एकादशभाव ११

रा० २८ अं० ६ क० १६ वि० यांची बेरीज २२ रा० २२ अं० ५९ क० २५ वि०, इतकी झाली. हिचें अर्धे केलें तेव्हां ११ रा० ११ अं० २९ क० ४२ वि० हा *दशम भावाचा विरामसंधि आणि एकादशभावाचा आरंभसंधि झाला.* एकादशभाव ११ रा० २८ अं० ६ क० १६ वि० आणि द्वादशभाव १ रा० १ अं० १९ क० २३ वि० या दोहोंची बेरीज ० रा० २९ अं० २४ क० ४९ वि० इतकी झाली. हिचें अर्धे केलें तेव्हां ० रा० १४ अं० ४२ क० ४९ वि० हा एकादशभावाचा विरामसंधि व द्वादशभावाचा आरंभसंधि झाला. आतां द्वादशभाव १ रा० १ अं० १९ क० २३ वि० आणि प्रथमभाव २ रा० ४ अं० ३२ क० ३० वि० यांची बेरीज ३ रा० ५ अं० ५१ क० ५३ वि० इतकी झाली. हिचें अर्धे केलें तेव्हां १ रा० १७ अं० ५५ क० ५६ वि० हा द्वादश म्हणजे व्ययभावाचा *विरामसंधि व प्रथम म्हणजे तनुभावाचा आरंभसंधि झाला.*

येथें जे तन्वादिद्वादशभाव तयार करून दाखविले आहेत त्याचें कोष्टक पुढें भावचलितकुंडली या विषयासाठीं दिलें आहे. त्या कोष्टकांत द्वादशभावाचे राश्यादि अंक मांडण्याची रीति अशी आहे कीं, पहिल्या कोष्टकांत तनुभावाचे अंक मांडून त्याच्या बाजूच्या दुसऱ्या कोष्टकांत तनुभावाच्या विरामसंधीचे अंक मांडावे. असेंच, तिसऱ्या कोष्टकांत धनभावाचे व शेजारच्या म्हणजे चवथ्या कोष्टकांत धनभावाच्या विरामसंधीचे अंक मांडावे. याचप्रमाणे सर्व कोष्टकांत द्वादशभावाचे अंक लिहावे. या अंकांचा उपयोग भावचलित कुंडलींत ग्रह मांडितांना होतो. आतां लग्नकुंडलींत ग्रह कसे मांडावे हें प्रथम सांगतों; म्हणजे भावचलित कुंडलींत ग्रह मांडण्याची पद्धति सुलभतेनें समजेल.

## लग्नकुंडलींत ग्रह मांडणें.

बाजूस द्वादशगृहात्मक जी चतुष्कोण आकृति दाखविली आहे तिला कुंडली म्हणतात. कुंडली वर्तुलाकृतीनेंही दाखवितात. कुंडलींत बारा कोष्टकें किंवा घरें असावीं हा मुख्य मुद्दा आहे. कुंडलींतील प्रत्येक गृहास स्थान, क्षेत्र, भुवन किंवा भाव अशा संज्ञा आहेत. अमुक वेळीं अमुक ग्रह आकाशांत कोणत्या ठिकाणीं आहे हें तात्कालिक कुंडलीवरून समजतें.




कुंडलींतील मध्यगृहांत लग्नाचा किंवा राशीचा दर्शक अंक प्रथम मांडून डाव्या बाजूकडील कोष्टकांत त्याच्या पुढील अंक मांडितात कुंडलींत राशींचीं नांवें लिहीत नाहींत. फक्त राशीचा अनुक्रमांक लिहितात. जसें, मेषराशीबद्दल १, वृषभराशीबद्दल २ इत्यादि. वर जी

उदाहरणार्थ कुडली दाखविली आहे तींत मध्यगृहात पाच हा अक लिहिला आहे आणि मेषराशीपासून पाचवी रास सिंह आहे, म्हणून ही कुडली सिंह लग्नाची किंवा सिंह राशीची आहे, म्हणजे जन्मकाली सिंहराशी क्षितिजावर उदित होती असे समजावें मध्यगृह हे कुडलींतील प्रथमस्थान होय उदाहरणार्थ, वरील पाच हा अक ज्या कोष्टकात आहे तें प्रथमस्थान, सहा आहे ते द्वितीयस्थान सात आहे ते तृतीयस्थान इत्यादि, आणि चार हा अक जेथ आहे ते द्वादशस्थान होय म्हणजे जन्मलग्नाचा किंवा जन्मराशीचा अक मध्यगृहात लिहिल्यानतर त्याच्या डाव्या बाजूच्या कोष्टकात पुढील अक अनुक्रमानें लिहिले आहेत आतां कुडलीत ग्रह मांडण्याची रीति सागतों

ज्या पचरवड्यातील जन्मलग्नकुडली आपण तयार केली असेल त्याच पचरवड्याच्या पचांगांतील कुडलींत जे ग्रह दाखविलेले असतात, तेच ग्रह त्या त्या राशयकस्थानीं आपण तयार केलेल्या कुडलीमध्ये लिहावे इतके मात्र अवश्य लक्ष्यात ठेवाव की पचागातल्या कुडलींत जे ग्रह दाखविलेले असतात, ते पचरवड्याच्या शेवटच्या दिवशींचे प्रात काळचे ग्रह असतात म्हणून जन्मकाळानतर व पचरवड्याच्या शेवटच्या दिवसापर्यंत मध्यें एखाद्या ग्रहात जर फेरबदल झाला असेल तर त्याप्रमाण आपल्या कुडलात मागील किंवा पुढील स्थानीं तो लिहावा. उदाहरणार्थ, सप्तमीस सायकाळीं एकाचा जन्म झाला अशी कल्पना करा त्या वेळीं वृश्चिकराशीस बुधग्रह आहेत, नतर दोन दिवसानीं म्हणजे नवमीस ते धनु राशीस गेले, या उदाहरणांत पचांगांतील कुडलात ते धनुराशीस दाखविलेले असतील परतु आपल्याला ते वृश्चिक म्हणजे ८ राशीसच दाखविले पाहिजेत तसेच, चद्रही २। दिवसांनी बदलणारा असल्यामुळे तो पचागस्थ कुडलीप्रमाणं दाखवू नये ज्या दिवशीं जन्म झाला असेल त्या वेळीं ज्या राशीस चद्र असेल त्या राशीस तो लिहावा चद्र कोणत्या राशीस असतो किंवा एका राशींतून दुसऱ्या राशींत तो केव्हा जातो हे पचागांतील शेवटच्या कोष्टकांत दाखविलेलें असतें याप्रमाण कुडलींत ग्रह मांडून जन्मकुडली तयार करावी परि- फेंच लग्नकुडलीच्या दोषांशीं राशिकुडली मांडितात राशिकुडलींत व लग्नकु डलींत ग्रहांची राशिस्थानें एकच असतात परतु लग्नकुडलात जसा मध्यगृहात म्हणजे प्रथमस्थानीं लग्नाचा दर्शक अक लिहितात त्याप्रमाण राशिकुडलींत, ज्या राशीस चद्र असेल त्या राशीचा दर्शक अक, प्रथमस्थानीं लिहितात व त्यापु ढील राशयक अनुक्रमानें डाव्या बाजूकडील गृहात मांडितात उदाहरणार्थ खालीं लिहिलेल्या कुडल्या पहा.

जन्मलग्नकुंडली. राशिकुंडली.







वरील पहिली कुंडली जन्मलग्नाची असून तींत मध्यगृहांत प्रथमस्थानीं ३ हा अंक आहे म्हणून मिथुनलग्नावर जन्म झालेल्या मनुष्याची ती कुंडली आहे, असें समजावें. त्याच्या बाजूची दुसरी कुंडली जन्मराशीची असून तींत प्रथमस्थानीं ५ हा अंक आहे म्हणून त्या मनुष्याची सिंह रास आहे असें समजावें. दोन्ही कुंडल्यांत ग्रहांचीं राशिस्थानें एकच आहेत. जसें, वृषभ राशीला म्हणजे २ अंक आहे त्या स्थानीं रवि आहे. ५ अंक आहे तेथें चंद्र आहे, ३ अंक आहे तेथें म्हणजे मिथुनराशीला मंगळ आहे. याचप्रमाणें सर्व ग्रह आहेत. परंतु लग्नकुंडलींत मंगळ पहिला आहे व राशीकुंडलींत तोच अकरावा आहे. याचें कारण उघड आहे कीं, एका ठिकाणीं मिथुनराशीपासून व दुसऱ्याठिकाणीं सिंहराशीपासून प्रथमस्थान धरून मोजावयाचें आहे. म्हणजे दोन्ही कुंडल्यांत प्रथमस्थानाचा राश्यंक भिन्न आहे, म्हणून ग्रहांचीं अनुक्रमस्थानें भिन्न झालीं.

जन्मकाळचे स्पष्टग्रह.

| र. | चं. | मं. | बु | गु | शु. | श | रा. | के |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ४ | २ | १ | ५ | ११ | ० | १ | ७ |
| १ | ० | १५ | १६ | १५ | १७ | ६ | ६ | ६ |
| ५० | १९ | ४३ | १२ | ४७ | ३१ | ३० | ४ | ४ |
| ४६ | १८ | ७ | ३६ | १२ | २ | २१ | ३३ | ३३ |
| | | | व | व | | | | |

बाजूच्या कोष्टकांत सूर्यादि नवग्रहांचे राशी—अंशकलादि अंक दिले आहेत त्यांवरून ग्रहांची स्पष्टस्थिति समजते; म्हणजे इष्टकाळीं आकाशांत ते ते ग्रह कोणत्या राशीस किती अंशांवर आहेत हें कळतें आणि त्याप्रमाणेंच कुंडलींत ग्रह मांडितात. यावरून कुंडली म्हणजे आकाशस्थ उदित ग्रहांचीं स्थानें दाखविणारा एक नकाशाच होय असें झालें. आतां वरील लग्नकुंडलीमध्यें जे ग्रह लिहिले आहेत त्यांचें स्पष्टीकरण करितों. त्यांत रवि वृषभराशीस म्हणजे जेथें २ अंक आहे तेथें लिहिला आहे. कारण, रवीनें १ राशि भोगून दुसऱ्या राशीच्या १ अंश ५० कलांवर आकाशांत तो जन्मकाळीं आहे, म्हणून तो दुसऱ्या म्हणजे वृषभराशीस मांडिला आहे. २ हा अंक लग्नस्थानापासून द्वादशस्थानीं आहे म्हणून जन्मलग्नीं रवि बारावा आहे असें समजावें. चंद्रानें ४ राशी भोगून पांचव्या, म्हणजे सिंहराशीच्या १९ कलांवर तो जन्म-

काळीं आहे म्हणून ५ हा अंक जेथें आहे तेथें चंद्र लिहिला. कुंडलीचें तृतीय स्थान पहा. मंगळानें २ राशी भोगून तिसऱ्या म्हणजे मिथुनराशीचे १५ अंश ४३ कला भोगिल्या आहेत म्हणून लग्नकुंडलींत मिथुनराशीस मंगळ लिहिला आहे. ह्याच रीतीनें बाकीचे सर्व ग्रह म्हणजे बुध वृषभराशीस, गुरु कन्याराशीस, शुक्र मीनराशीस, शनि मेषराशीस व राहु वृषभराशीस, लिहिले आहेत. राहु व केतु हे परस्पर समोरासमोर नेहमीं आकाशांत सातव्या स्थानीं असतात, म्हणून राहूपासून सातव्या स्थानीं केतु लिहिला आहे.

## भावचलित कुंडली.

### ससंधि द्वादशभावचक्र.

| १ त. | सं. | २ ध. | सं. | ३ स | स | ४ सु | म | ५ सु | स | ६ रि | सं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | २ | ३ | ३ | ३ | ४ | ४ | ५ | ५ | ६ | ७ | ७ |
| ४ | १७ | १ | १४ | २८ | ११ | २४ | ११ | २८ | १४ | १ | १५ |
| ३२ | ५५ | १९ | ४२ | ६ | २९ | ५३ | २९ | ६ | ४२ | १९ | ५५ |
| ३० | ५७ | २३ | ४९ | १६ | ४२ | ९ | ४२ | १६ | २९ | २३ | ५६ |
| ७ जा | स. | ८ मृ | स. | ९ ध | स | १० क | स | ११ आ | [illegible] | १२ व्य. | स |
| ८ | ८ | ९ | ९ | ९ | १० | १० | ११ | ११ | ० | १ | १ |
| ४ | १७ | १ | १४ | २८ | ११ | २४ | ११ | २८ | १४ | १ | १५ |
| ३२ | ५५ | १९ | ४२ | ६ | २९ | ५३ | २९ | ६ | ४२ | १९ | ५५ |
| ३० | ५७ | २३ | ४९ | १६ | ४२ | ९ | ४९ | १६ | ४९ | २३ | ५६ |

भावचलित कुंडलींत ग्रह मांडण्याची रीति लग्नकुंडलीपेक्षां निराळी आहे, ती अशी. कोणताही ग्रह आपल्या स्थानाच्या आरंभसंधीपेक्षां जेव्हां अंशकलादिकांनीं कमी असेल तेव्हां त्या ग्रहाची स्थापना मागील स्थानीं करितात. व जेव्हां तोच ग्रह विरामसंधीपेक्षां अंशकलादिकांनीं अधिक असेल तेव्हां तो पुढील स्थानीं मांडितात. वरील जेव्हां कोणताही ग्रह आपल्या भावाच्या आरंभसंधीपेक्षां अधिक व विरामसंधीपेक्षां कमी असेल तेव्हां तो ग्रह त्याच स्थानीं मांडितात. ह्या पद्धतीनें आतां भावचलित कुंडलीमध्यें ग्रह मांडून दाखवितों. मागें जी जन्मलग्नकुंडली मांडिली आहे त्याप्रमाणें प्रथम कुंडली मांडावी. म्हणजे मध्यगृहांत प्रथमस्थानीं ३ [illegible] [illegible] लिहून [illegible] पुढील म्हणजे डाव्या बाजूच्या रांगेंतील कोष्टकांत अनुक्रमानें [illegible] पुढील अंक लिहावे. आणि नंतर पुढें सांगितलेल्या रीतीप्रमाणें [illegible]. जसें, रवि लग्नकुंडलींत १।११।५०।४६ इतक्या अंशादिकांवर म्हणजे [illegible] दुसऱ्या अंशांत आहे. [illegible] [illegible] आहे. [illegible] [illegible] [illegible], आहे, आणि विरामसंधि १।१७।५५।५६ आहे, [illegible] [illegible] द्वादशभावचक्र पहा. येथें रवीचे राशि अंशकलादि अंक, [illegible] [illegible] आहे, त्या [illegible] आरंभ-संधीपेक्षां अधिक असून [illegible] [illegible] कमी आहेत म्हणून येथें रवि मागील किंवा पुढील [illegible] [illegible] [illegible]; [illegible] रवीचें [illegible]

व्ययभवनींच केलें. चंद्र ४।०।१९।१८ राशी भोगून पांचव्या म्हणजे सिंहराशीच्या पहिल्या अंशांत आहे. जन्मलग्नकुंडलीमध्यें सिंहराशि तृतीय स्थानीं आहे. तृतीयस्थानाचा आरंभसंधि ३।१४।४२।४९ आहे आणि विरामसंधि ४।११।२९।४२ आहे. म्हणजे चंद्राचे राशी अंशकलादि अंक, आरंभसंधीपेक्षां अधिक असून विरामसंधीपेक्षां कमी आहेत म्हणून चंद्र त्याच म्हणजे तृतीयस्थानांत मांडिला. *मंगळ २।१५।४३।७ असून तनुस्थानीं म्हणजे प्रथमभावांत मिथुन राशीस आहे.* प्रथमभावाचा आरंभसंधि १।१७।५५।५६ आहे आणि विरामसंधि २।१७।५५।५७ आहे. म्हणजे मंगळ हा प्रथमभावाच्या आरंभसंधीपेक्षां अधिक असून प्रथमभावाच्या विरामसंधीपेक्षां कमी आहे म्हणून मंगळ प्रथमस्थानींच मांडिला. बुध १।१६।१२।३६ असून वृषभराशीला व्ययस्थानीं आहे. व्ययभावाचा आरंभसंधि ०।१४।४२।४९ आहे आणि विरामसंधि १।१७।५५।५६ आहे म्हणजे बुध हा व्ययस्थानाच्या आरंभसंधीपेक्षां अधिक आहे व विरामसंधीपेक्षां कमी आहे म्हणून बुध मागें किंवा पुढें जाऊं शकत नाहीं; याकरितां बुधाचें स्थापन व्ययभवनींच केलें. गुरु ५।१५।४७।१२ आहे म्हणजे कन्याराशीच्या १६ व्या अंशांत असून लग्नकुंडलींत चतुर्थस्थानांत आहे. चतुर्थस्थानाचा आरंभसंधि ४।११।२९।४२ आहे आणि विरामसंधि ५।११।२९।४२ इतका आहे म्हणजे गुरु हा चतुर्थभावाच्या आरंभसंधीपेक्षां अधिक असून चतुर्थभावाच्या विरामसंधीपेक्षां कमी आहे, म्हणून गुरु तेथेंच म्हणजे चतुर्थस्थानीं मांडिला. शुक्र ११।१७।३१।२ आहे, म्हणजे मीनराशीच्या १८ व्या अंशांत आहे. मीनराशि कर्मस्थानीं म्हणजे लग्नापासून दशमस्थानीं आहे. दशमस्थानाचा आरंभसंधि १०।११।२९।४२ आहे व विरामसंधि ११।११।२९।४२ इतका आहे, म्हणजे शुक्र हा कर्मभावाच्या *आरंभसंधीपेक्षां अधिक असून कर्मभावाच्या विरामसंधीपेक्षांही अधिक आहे;* म्हणून तो पुढील म्हणजे एकादश भावांत मांडिला. शनि ०।६।३०।२१ इतका म्हणजे मेषराशींत ७ व्या अंशावर आहे. मेषराशि एकादशस्थानीं आहे. एकादशस्थानाचा आरंभसंधि ११।११।२९।४२ इतका असून विरामसंधि ०।१४।४२।४९ इतका आहे म्हणजे शनीचे राश्यादि अंक एकादश भावाच्या आरंभसंधीपेक्षां अधिक असून विरामसंधीपेक्षां कमी आहेत; म्हणून शनीचें स्थापन लाभस्थानींच केलें. राहु १।६।४।३३ इतका आहे म्हणजे वृषभराशीच्या सातव्या अंशांत आहे. लग्नकुंडलींत वृषभराशि द्वादशस्थानांत आहे. द्वादशस्थानाचा आरंभसंधि ०।१४।४२।४६ आहे आणि विरामसंधि १।१७।५५।५६

भावचलित कुंडली.



आहे ह्मणजे राहूचे राश्यादि अंक, ज्या स्थानीं तो आहे, त्या द्वादशस्थानच्या आरंभसंधीपेक्षा अधिक असून विरामसंधीपेक्षा कमी आहेत ह्मणून राहु द्वादशस्थानींच मांडिला. राहूचे समोर ७ व्या राशीस नेहमीं केतु असतो ह्मणून केतूचें स्थापन वृश्चिकराशीस रिपुभावांत केलें. या रीतीनें सर्व ग्रह कुंडलींत मांडावे. वर भावचलितकुंडली मांडिली आहे ती पहा, ह्मणजे स्पष्ट कळेल.

## षड्वर्गविचार.

गृहं होरा च द्रेष्काणो नवांशो द्वादशांशकः ।
त्रिंशांशश्चेति षड्वर्गास्ते सौम्यग्रहजाः शुभाः ॥ ४ ॥
त्रिंशद्भागात्मकं लग्नं होरा तस्यार्धमुच्यते ।
लग्नत्रिभागो द्रेष्काणो नवांशो नवमांशकः ।
द्वादशांशो द्वादशांशस्त्रिंशांशस्त्रिंशदंशकः ॥ ५ ॥

१ लग्न स्वामी २ होरा ३ द्रेष्काण ४ नवांश ५ द्वादशांश आणि ६ त्रिंशांश अशा सहा प्रकारच्या राशींच्या भागाच्या समुदायास षड्वर्ग ह्मणतात. अर्थात् प्रत्येक भागास वर्ग अशी संज्ञा आहे. शुभग्रहाचा ह्मणजे चंद्र, बुध, गुरु आणि शुक्र यांपैकीं कोणत्याही ग्रहाचा वर्ग शुभ आणि यायाचून इतर ह्मणजे पापग्रहाचा वर्ग अशुभ होय. लग्नाचे किंवा राशीचे अंश ३० असतात. ज्या ग्रहाची जी राशि ते त्याचें क्षेत्र होय. उदाहरणार्थ, धनराशीचा किंवा मीन राशीचा स्वामी गुरु आहे, म्हणून धन किंवा मीन यांतून कोणतेंही लग्न इष्टकाळीं असून तेथ गुरु असतां तो स्वक्षेत्रीं असून लग्न स्वामीचें बल आहे असें समजावें. राशीच्या अर्धभागाला होरा म्हणावें. पुढें होराकुंडली मांडून दाखविली आहे तेथें होऱ्यासंबंधी अधिक माहिती दिली आहे. राशीचे तीन भाग करून प्रत्येक भागास द्रेष्काण म्हणतात. राशीचे अंश ३० असतात म्हणून प्रत्येक द्रेष्काण १० अंशांचा होतो. राशीचा जो स्वामी तोच प्रथम द्रेष्काणाचा स्वामी होय. त्याच राशीपासून पांचव्या राशीचा जो स्वामी तो द्वितीय द्रेष्काणाचा स्वामी होय आणि नवव्या राशीचा स्वामी तोच तृतीय द्रेष्काणाचा स्वामी होय. उदाहरणार्थ, इष्टलग्न सिंह असून त्याचे १८ अंश भुक्त आहेत अशी कल्पना करा म्हणजे येथ सिंहलग्न १० अंशांपुढें व २० अंशांचे आंत असल्यामुळें सिंह लग्नाचा द्वितीय द्रेष्काण येतो. सिंहराशीपासून पांचवी राशि धन आहे व धनराशीचा स्वामी गुरु आहे म्हणून हा गुरूचा द्रेष्काण येतो. येथ सिंह लग्न १० अंशांचे आंत असतें तर राशिस्वामी जो रवि त्या रवीचा द्रेष्काण असता आणि २० अंशांपुढें असतें तर सिंहापासून नवव्या म्हणजे मेषराशीचा जो स्वामी मंगळ तो तृतीय द्रेष्काणाचा स्वामी असता. याचप्रमाणें सर्व राशींचे द्रेष्काण आणावे. त्यांचें

द्रेष्काणस्वामींचं कोष्टक दिलं आहे, त्यावरून स्पष्ट कळेल सूर्य, मगळ, आणि शनि याचे द्रेष्काण अशुभ व इतर ग्रहाचे शुभ होत, असें जाणाव

| अश | मे | वृ | मि | कर्क | सि | कन्या | तू | वृ | ध | म | कु | मी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | म | गु | बु | चं | र | बु | शु | म | गु | श | श | गु |
| २० | र | बु | शु | म | गु | श | श | गु | मं | शु | बु | च |
| ३० | गु | श | श | गु | म | शु | बु | च | र | बु | शु | मं |

नवाश म्हणजे राशीचा नववा भाग होय राशीचे अंश ३० असतात, म्हणून प्रत्येक नवाश ३ अश २० कलाचा होतो नवाशाची अधिक माहिती पुढें नवाशकुंडलीविषयीं लिहिलं आहे तेथ सागितली आहे द्वादशाश म्हणजे लग्नाचा बारावा भाग होय म्हणजे २ अंश ३० कलाचा एक द्वादशाश होतो तसेंच त्रिंशाश म्हणजे राशीचा तिसावा भाग होय अर्थात् प्रत्येक त्रिंशांश एक अंशाचा असतो याच समत्रिंशाश आणि विषम त्रिंशाश असे दोन भेद आहेत, ते पुढ सागितले आहेत याप्रमाण षड्वर्ग जाणावे

## होराकुंडली.

राशीच्या अर्धभागाला होरा म्हणतात हें वर सागितलेंच आहे राशीचे अंश तीस असतात म्हणून १५ अंशाचा एक होरा होतो व दोन होऱ्याची एक राशि होते विषमराशींला म्हणजे १ मेष ३ मिथुन ५ सिंह ७ तूळ ९ धन व ११ कुंभ या राशींला, पहिला होरा सूर्याचा असतो व दुसरा होरा चद्राचा असतो सम राशींला, म्हणजे २ वृषभ ४ कर्क ६ कन्या ८ वृश्चिक १० मकर व १२ मीन या राशींला, विषमराशींच्या उलट प्रकार असतो म्हणजे पहिल्या होऱ्याचा स्वामी चद्र व दुसऱ्या होऱ्याचा स्वामी रवि असतो १५ अंशाचे आत कोणतेंही लग्न असता राशीच्या पहिल्या होऱ्यात आहे व १५ अंशापुढें असता राशीच्या दुसऱ्या होऱ्यात आहे असें समजाव खाली होरासाधन कोष्टक दिलं आहे त्यावरून होराकुंडली सुलभतेनें मांडिता येईल

## होरासाधन कोष्टक.

| अश | १ म | २ वृ | ३ मि | ४ क | ५ सिं | ६ क | ७ तु | ८ वृ | ९ ध | १० म | ११ कु | १२ मी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ १५ पूर्वार्द्ध | ५ सि | ४ क | ५ सि | ४ क | ५ सि | ४ क | ५ सि | ४ क | ५ सि | ४ क | ५ सिं | ४ क |
| १५ ३० उत्तरार्द्ध | ४ क | ५ सिं | ४ क | ५ सिं | ४ क | ५ सिं | ४ क | ५ सि | ४ क | ५ सिं | ४ क | ५ सिं |

आतां होराकुंडलींत ग्रह मांडण्याची रीति सांगतों पूर्वी जी लग्नकुंडली

मांडिली आहे त्याच वेळची होराकुंडली मांडून दाखवितों. त्या वेळचें स्पष्टलग्न २ रा. अं.३२ क. ३० वि. इतकें आहे. म्हणजे वृषभलग्न संपून मिथुन लग्नाचे ४ अंश युक्त होऊन पांचव्या अंशांत मिथुन लग्न आहे. हें विषमलग्न असून १५ अंशाचे आंत आहे म्हणजे पहिल्या होऱ्यांत आहे. विषमलग्नी पहिला होरा रवीचा असतो, हे वर सांगितलेंच आहे. रवीची राशि सिंह आहे म्हणून लग्नस्थानीं म्हणजे प्रथमस्थानीं सिंहराशीचा दर्शक अंक ५ हा मांडिला. व पुढील अंक कुंडलींतील डाव्या बाजूकडील कोष्टकांत अनुक्रमानें मांडिले. प्रथम रवि कोणत्या स्थानीं मांडिला पाहिजे हें पाहूं. मागें स्पष्टग्रहांचें कोष्टक दिलें आहे त्यांत रवि वृषभराशीच्या दुसऱ्या अंशांत म्हणजे पूर्वार्धांत आहे. वृषभ राशीचा पूर्वार्ध किंवा पहिला होरा चंद्राचा असतो व चंद्राची राशि कर्क आहे म्हणून रवि कर्क ४ राशीला बाराव्या स्थानीं मांडिला. चंद्र सिंहराशीच्या पहिल्या अंशांत म्हणजे १५ अंशाचे आंत असल्यामुळें पहिल्या होऱ्यांत आहे. सिंहराशीचा पहिला होरा रवीच आहे व रवीची राशि सिंह आहे म्हणून चंद्र सिंहराशीस प्रथमस्थानीं मांडिला. मंगळ मिथुनराशीस सोळाव्या अंशांत म्हणजे दुसऱ्या होऱ्यांत आहे मिथुनराशीचा दुसरा होरा चंद्राचा असतो. चंद्राची राशि कर्क आहे म्हणून कर्कराशीस द्वादशस्थानीं मंगळ लिहिला बुध वृषभराशीस १७ व्या अंशांत म्हणजे दुसऱ्या होऱ्यांत आहे वरील कोष्टकांत वृषभराशीचा दुसरा होरा सिंह आहे म्हणून सिंहराशीस बुध लिहिला. गुरुशुक्र हे समराशींस म्हणजे अनुक्रमें कन्या व मीन राशींस १५ अंशापुढें म्हणजे दुसऱ्या होऱ्यांत आहेत. वरील होरासाधन कोष्टकांत समराशींचा दुसरा होरा सिंह आहे म्हणून सिंहराशीस गुरुशुक्र मांडिले. शनि विषम राशीच्या पहिल्या होऱ्यात आहे म्हणून तोही सिंहराशीस मांडिला. राहु समराशींस दुसऱ्या होऱ्यांत आहे म्हणून तो सिंहराशीसच मांडिला. होराकुंडलींत प्रायः केतु मांडित नाहींत; कारण त्याचें विशेष महत्त्व नाहीं. होराकुंडलींत नेहमीं सर्व ग्रह कर्क किंवा सिंह या दोन राशींसच असतात.

होराकुंडली.




## नवमांशकुंडली.

नवांश म्हणजे राशीचा नववा भाग होय. राशीचे अंश ३० म्हणून ( ३०÷९=३ अं. २० क. ) प्रत्येक भाग ३ अंश २० कलांचा असतो. मेषादि बारा राशींचे नवांश मोजावयाचे असतां अनुक्रमेंकरून मेष, मकर, तुळ आणि कर्क या राशींपासून पुनःपुनः मोजण्याची प्रवृत्ति आहे. म्हणजे मेषास मेषापासून,

वृषभास मकरापासून, मिथुनराशीस तुळेपासून व कर्कास कर्कापासून मोजि-तात. तसेंच, पुन सिंहराशीस मेषापासून, कन्याराशीस मकरापासून इत्यादि. याचें कारण असें आहे कीं, मेषराशीचे ९ भाग पूर्ण झाल्यानंतर १० वा भाग म्हणजे दहावी राशि मकर हा दुसऱ्या म्हणजे वृषभराशीचा पहिला नवांश होतो. म्हणून वृषभास मकरापासून मोजितात. तसेंच, ही बारा राशींची पहिली आवृत्ति पुरी झाली व पहिल्या राशीपासून मोजण्यास पुन आरंभ केला म्हणजे मिथुनराशीचा पहिला नवांश तुळेचा व कर्कराशीस कर्काचा येतो. या रीतीनें पुन सिंहराशीस मेषराशीचा, कन्याराशीस मकराचा, इत्यादि बारा राशींचे प्रथम नवांश पुन पुन अनुक्रमानें मेष, मकर, तूळ आणि कर्क असतात. खालीं नवमांश साधन कोष्टक दिलें आहे त्यावरून हें स्पष्ट ध्यानात येईल.

## नवमांशसाधन कोष्टक.

| राशि | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ३ अं २० क | ६ अं ४० क | १० अं | १३ अं २० क | १६ अं ४० क | २० अं | २३ अं २० क | २६ अं ४० क | ३० अं |
| मेष | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ मं | ९ गु |
| वृष | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु |
| मिथु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु |
| कर्क | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु |
| सिंह | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु |
| कन्या | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु |
| तूळ | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु |
| वृश्चि | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु |
| धन | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु |
| मक | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु |
| कुंभ | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु |
| मीन | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु |

वरील कोष्टकात पहिल्या आडव्या ओळीस १ पासून ९ पर्यंत जे अनुक्रमांक आहेत ते राशीचा पहिला नवांश, दुसरा नवांश, तिसरा नवांश इत्यादि दर्शविणारे आहेत. कोणत्याही राशीचा पहिला नवांश ३ अंश २० कलापर्यंत असतो, दुसरा नवांश ६ अं ४० कलापर्यंत असतो, तिसरा नवांश १० अंशापर्यंत असतो, इत्यादि दर्शविणारें दुसरें कोष्टक आहे. मेषराशीसमोर आडव्या ओळीस पहिल्या सदरात १ म असें लिहिलें आहे त्याचा अर्थ मेषराशीचा पहिला नवांश १ राशीचा म्हणजे मेषराशीचा असून त्याचा स्वामी मंगळ, दुसऱ्या आडव्या ओळीस

२ शु आहे त्याचा अर्थ मेषराशीचा दुसरा नवांश २ म्ह० वृषभराशीचा असून त्याचा स्वामी शुक्र आहे असें जाणावें यांप्रमाणें सर्व कोष्टक पहावें आतां नवमांशकुंडलींत लग्न व ग्रह कसे मांडावे हें सांगतों आपलें इष्टकाळचें लग्न मिथुन असून तें पांचव्या अंशांत आहे म्ह० दुसऱ्या नवांशांत आहे मिथुन राशीसमोर दुसरा नवमांश वृश्चिकराशीचा आहे म्हणून येथें नवमांशकुंडलीचें लग्न वृश्चिक होय असें समजावें याच रीतीनें सर्व नवांशकुंडली मांडितात जसें, रवि १ राशि भोगून दुसऱ्या राशींत १ अं ५० कला आहे म्हणजे वृषभ राशीच्या पहिल्या अंशांत आहे (मागील स्पष्टग्रहांचें कोष्टक पहा) राशीचा पहिला नवांश ३ अं २० क० पर्यंत असतो म्हणून रवि वृषभराशीच्या पहिल्याच नवांशांत आहे असें झालें वरील नवमांश कोष्टकांत वृषभराशीचा पहिला नवांश मकर राशीचा आहे म्हणून रवि मकरराशीस मांडिला चंद्र सिंहराशीच्या पहिल्याच अंशांत आहे म्हणून तो पहिल्या नवमांशांत आहे सिंहराशीचा पहिला नवांश मेषराशीचा आहे मेषराशीचा दर्शक अंक १ आहे म्हणून नवमांश कुंडलींत तेथ चंद्र मांडिला मंगळ मिथुनराशीच्या १६ व्या अंशांत आहे म्हणजे चवथ्या नवमांशापुढें पांचव्या नवमांशाचे आंत आहे मिथुन राशीचा पांचवा नवमांश कुंभ आहे म्हणून कुंभराशीस मंगळ मांडिला बुध वृषभराशीच्या १७ व्या अंशांत म्हणजे ६ व्या नवमांशांत आहे वृषभराशीचा ६ वा नवमांश मिथुन आहे म्हणून मिथुनराशीचा दर्शक अंक जो ३ तेथ बुध मांडिला गुरु कन्याराशीच्या १६ अंशांत म्हणजे पांचव्या नवमांशांत आहे कन्या राशीचा पांचवा नवांश वृषभ आहे म्हणून वृषभराशीचा दर्शक अंक जो २ तेथ गुरु मांडिला शुक्र मीनराशीच्या १८ व्या अंशांत म्हणजे ६ व्या नवांशांत आहे मीनराशीचा ६ वा नवांश धन आहे म्हणून तेथ शुक्र मांडिला शनि मेषराशीच्या ६।३० अंशांत आहे दुसरा नवांश ३।२० पासून ६।४० अंशा पर्यंत असतो म्हणून मेषराशीच्या दुसऱ्या नवांशांत शनि आहे असें झालें मेषराशीचा दुसरा नवांश वृषभ आहे म्हणून तेथ शनि लिहिला राहु वृषभराशीच्या दुसऱ्या नवांशांत आहे वृषभराशीचा दुसरा नवांश कुंभ आहे म्हणून तेथ राहु लिहिला राहूपासून सप्तमस्थानांत नेहमीं केतु असतो, म्हणून राहूच्या सप्तमस्थानीं केतु मांडिला यांप्रमाणें नवमांशकुंडलींत ग्रह मांडावे

नवमांशकुंडली




## द्वादशांश साधन कोष्टक.

द्वादशांश म्हणजे राशीचा बारावा भाग होय एका राशीचे अंश ३० म्हणून

२ अंश ३० कलांचा म्हणजे अडीच अंशांचा २॥×१२=३० एक द्वादशांश होतो त्याचें द्वादशांश कोष्टक दिलें आहे त्यावरून हें ध्यानीं येईल ह्या को-

| अंश | मेष | वृष | मिथु | कर्क | सिंह | कन्या | तुळ | वृश्चि | धन | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २॥ | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ मं | ९ गु | १० श | ११ श | १२ गु |
| ५ | २ शु | ३ बु | ४ च | र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म |
| ७॥ | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु |
| १० | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु |
| १२॥ | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च |
| १५ | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र |
| १७॥ | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु |
| २० | ८ म | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु |
| २२॥ | ९ गु | १० श | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म |
| २५ | १० श | ११ श | १२ गु | १ मं | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु |
| २७॥ | ११ श | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श |
| ३० | १२ गु | १ म | २ शु | ३ बु | ४ च | ५ र | ६ बु | ७ शु | ८ म | ९ गु | १० श | ११ श |

ष्टकात प्रत्येक राशीसमोर उभ्या ओळीस १।२।३ असे अंक आहेत ते राशींचे दर्शक अंक आहेत प्रत्येक राशीचा पहिला द्वादशांश अमुक राशीचा व त्याचा स्वामी अमुक हे ह्यावरून कळेल उदाहरणार्थ, इष्टकाळीं मेषलग्न असून त्याचे १७ अंश भुक्त झाले आहेत अशी कल्पना करा त्या वेळीं कोणत्या राशीचा किंवा ग्रहाचा द्वादशांश आहे हें पहावयाचें असेल तर वरील कोष्टकात १५ अंशापासून १७॥ अंशांपर्यंत ७ ह्या म्हणजे तुळराशीचा स्वामी शुक्र त्याचा द्वादशांश आहे असें लिहिलें आहे म्हणून इष्टकाळीं शुक्राचा द्वादशांश आहे असें समजावें आतां द्वादशांशकुंडली कशी मांडावी हें सांगतो आपलें इष्टकाळचें लग्न मिथुन असून त्याचे अंश ४।१२ आहेत म्हणून २॥ अंशांपुढे व ५ अंशांच्या आंत आहे म्हणजे मिथुनराशीच्या दुसऱ्या द्वादशांशांत आहे वरील कोष्टकात मिथुनराशीचा दुसरा द्वादशांश ४ म्हणजे कर्क आहे, म्हणून द्वादशांश कुंडलीचें लग्न कर्क होय रवि वृषभराशींत २॥ अंशाचे आंत आहे म्हणजे वृषभराशीच्या पहिल्या द्वादशांशात आहे वृषभराशीचा पहिला द्वादशांश वृषभराशीचाच आहे म्हणून २ राशीस रवि मांडिला याच पद्धतीनें द्वादशांश कुंडलींत सर्व ग्रह मांडावे

द्वादशांश कुंडली



# त्रिंशांशसाधन.

त्रिंशांश म्हणजे राशीचा तिसावा भाग होय  म्हणजे १ अंशाचा १ त्रिंशांश होतो  त्रिंशांश दोन प्रकारचे आहेत  समत्रिंशांश आणि विषमत्रिंशांश  सहा समराशीचे त्रिंशांश ते समत्रिंशांश आणि सहा विषमराशीचे त्रिंशांश ते विषम त्रिंशांश होत. अंश ३० आणि प्रत्येक भागात राशी म्हणून प्रत्येक राशीचा पाचपाच अंशाचा त्रिंशांश असावा असे वाटणे साहजिक आहे, परंतु तसें नाहीं. विषमराशींतील त्रिंशांशाचा क्रम असा आहे की, पहिले ५ अंश मंगळाचे, त्याच्या पुढील ५ अंश शनीचे, त्याच्या पुढील ८ गुरूचे, त्याच्या पुढील ७ बुधाचे व शेवटचे ५ अंश शुक्राचे जाणावे  विषमराशि म्हणजे मेष, मिथुन, सिंह, तूळ, धन व कुंभ ह्या होत  समराशींचा क्रम ह्याच्या उलट आहे. म्हणजे पहिले ५ अंश शुक्राचे, त्याच्या पुढील ७ अंश बुधाचे, त्याच्यापुढील ८ अंश गुरूचे, त्याच्या पुढील ५ अंश शनीचे व शेवटचे ५ मंगळाचे असतात. वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर व मीन ह्या समराशी होत  याजूच्या कोष्टकावरून विषमत्रिंशांश व समत्रिंशांश यांचे स्वामी व राशि स्पष्ट कळतील

विषमत्रिंशांश कोष्टक

| अंश | मेष | मिथु | सिंह | तूळ | धन | कुंभ |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ ० | १ मं | १ मं | १ मं | १ मं | १ मं | १ मं |
| १० ० | ११ श | ११ श | ११ श | ११ श | ११ श | ११ श |
| १८ ० | ९ गु | ९ गु | ९ गु | ९ गु | ९ गु | ९ गु |
| २५ ० | ३ बु | ३ बु | ३ बु | ३ बु | ३ बु | ३ बु |
| ३० ० | ७ शु | ७ शु | ७ शु | ७ शु | ७ शु | ७ शु |

समत्रिंशांश कोष्टक

| अंश | वृष | कर्क | कन्या | वृश्चि | मकर | मीन |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ ० | २ शु | २ शु | २ शु | २ शु | २ शु | २ शु |
| १२ ० | ६ बु | ६ बु | ६ बु | ६ बु | ६ बु | ६ बु |
| २० ० | १२ गु | १२ गु | १२ गु | १२ गु | १२ गु | १२ गु |
| २५ ० | १० श | १० श | १० श | १० श | १० श | १० श |
| ३० ० | ८ मं | ८ मं | ८ मं | ८ मं | ८ मं | ८ मं |

त्रिंशांश कुंडली मांडण्याची पद्धति नवांश किंवा द्वादशांशकुंडलीप्रमाणेंच आहे  उदाहरणार्थ, दृक्कालीं मिथुन लग्न ४।३२ आहे म्हणजे ५ अंशाचे आंत आहे  मिथुन ही विषमराशि आहे म्हणून विषमत्रिंशांश कोष्टकांत पहा  मिथुन राशीच्या सदरात ५ अंशांसमोर मेषराशि आहे म्हणून त्रिंशांश कुंडलीचे मेषलग्न होय  तसेच रवि वृषभ राशीच्या ५ अंशांत आहे  समत्रिंशांशकोष्टकात वृषभराशीच्या सदरात ५ अंशासमोर वृषभ आहे, म्हणून रवि वृषभराशीस मांडिला. याप्रमाणेंच बाकीचे ग्रह मांडावे

त्रिंशांश कुंडली.



## षड्वर्गबलाचें उदाहरण.

इष्टकाळीं मकरलग्न १४ अं० ३ क० ११ विकला आहे अशी कल्पना करा आणि त्या वेळचे षड्वर्ग काढा. १ मकरलग्नाचा स्वामी शनि आहे म्हणून गृहेश शनि होय २ समराशीं १५ अंशाचे आंत चंद्राचा होरा असतो, म्हणून इष्टकाळीं चंद्राचा होरा येतो ३ मकरलग्न १० अंशापुढें आणि २० अंशाचे आंत आहे म्हणून दुसरा द्रेष्काण शुक्राचा येतो ४ नवमांशसाधनकोष्टकात १३।२० पुढें व १६।४० पर्यंत मकरलग्नासमोर ५ ह्या सदरांत वृषभराशीचा नवांश आहे वृषभराशीचा स्वामी शुक्र आहे म्हणून इष्टकाळीं शुक्राचा नवांश आहे. त्याच-प्रमाणे ५ बुधाचा द्वादशांश आणि ६ गुरूचा त्रिंशांश येतो. यांत गृहेश म्हणजे लग्नस्वामी शनि खेरीजकरून इतर ५ वर्ग शुभ आहेत असें जाणावें लग्नास षड्वर्गांतून शुभग्रहाचे ४ वर्ग असावे, निदान ३ तरी असावे म्हणजे तें लग्न बलिष्ठ असून ग्राह्य होय तथापि तीन शुभवर्ग असणें हा अगदींच कनिष्ठ पक्ष होय.

## लग्नमांजींस उत्कांश.

मेषे षड्घटी वृषे त्रिदिगिना द्वंद्वेद्रिगोकाग्नयः ।
कीटेऽप्यंगनवाद्रयोर्कभवनेंगाभ्धांग्नियां ऽर्कषट् ॥
जूकेर्थाद्रिखगा अली गचगषट् चापे त्रिषड्गोऽग्नयो ।
नक्रेशाक्ष्यरुणा घटे ह्यपवृषौ मीनेद्रिगोषट्शुभाः ॥ ६ ॥

अमुक दिवशीं उपनयन किंवा विवाहमुहूर्त आहे हें पंचांगात सांगितलेलें असतें परंतु अमुकच वेळीं तीं कृत्यें करावीं हें सर्वच पंचांगातून दिलेलें नसतें याकरितां तत्संबंधीं थोडीशी माहिती येथें सांगतों लग्नमुहूर्त साधारणपणें दि-वसा मध्याह्नकाळापर्यंत म्हणजे सूर्योदयापासून अठरा घटकापर्यंत, गोरज किंवा रात्रीं प्रथम प्रहरापर्यंत असावा असें मताधिक्य आहे व व्यवहारदृष्ट्याही तेंच सोईचें आहे मुंजीचा मुहूर्त पूर्वाह्णकाळीं म्हणजे सूर्योदयापासून सात घटिका पर्यंत शुभ व पुढें मध्याह्नकालापर्यंत मध्यम मानिलेला आहे हे शुभाशुभ मुहूर्त मेषादिलग्नीं जसे शुभाशुभ षड्वर्ग असतील त्यावरून ठरवितात, म्हणजे ज्या लग्नीं षड्वर्गांपैकीं अधिक शुभवर्ग असतील तो मुहूर्त उत्तम असें मानिलेलें आहे म्हणून तो लग्नांश ज्या घटिकेला असेल ती घटिका विवाहादि शुभकृत्यास घ्यावी. मेषादि द्वादश लग्नाला अमुक अमुक राशीचे नवमांश असतील त्या वेळीं शुभकृत्य केलें म्हणजे षड्वर्गांतून निदान चार शुभवर्गांचें बल येतें. ते राशीचे उत्कांश येणेंप्रमाणें

| लग्न | उत्कांश | लग्न | उत्कांश | लग्न | उत्कांश |
|---|---|---|---|---|---|
| मेष | कन्या, तूळ | सिंह | तूळ, कन्या | धन | मिथु० कन्या, तूळ, धन |
| वृष० | वृष० मिथु० मीन | कन्या | मिथु० तूळ, मीन | मक० | मिथु० मीन |
| मिथु | मि० तूळ, धन, मीन | तूळ | तूळ, धन, मीन | कुंभ | वृश्चि० मीन |
| कर्क | कर्क, कन्या, तूळ, धन | वृश्चि० | धन, तूळ, कन्या | मीन | कन्या, तूळ, धन |

## विवाहादिमुहूर्तास स्पष्टसूर्य.

विवाहादिमुहूर्तसाधनास स्पष्टसूर्य स्थूलमानानें तयार करावा त्याची रीति अशी ज्या घटिकेचा स्पष्टसूर्य करावयाचा असेल त्या वेळेपर्यंत, चालू संक्रांतीच्या आरंभापासून जितके दिवस, घटिका व पळें होतील त्याला त्या राशीच्या गतीच्या अंकानीं गुणावे व ६० नीं भागावे (मेष व सिंहराशीचे गतीचे अंक ५८ पळें, वृषभ, मिथुन व कर्क ५७, कन्या ५९, तूळ व कुंभ ६०, वृश्चिक, धन व मकर, ६१ व मीन ५१ ) भागाकार अंश कलात्मक येईल त्याच्या मागें चालू संक्रांतीच्या मागील राश्यंक मांडावे, म्हणजे स्पष्टसूर्य झाला उदाहरण -वैशाख शुक्ल १० बुधवारीं सूर्योदयापासून ७ घटिकाचे वेळेचा स्पष्टसूर्य करावयाचा आहे वृषभसंक्रांत त्याच पक्षांत शुक्लपष्ठीस ९ घ० १४ पळांनीं शनिवारीं झाली आहे अहोरात्राच्या घटी ६० यांतून उणे ९ घ० १४ प०=५० घ० ४६ प० ह्या शनिवारच्या घटिका राहिल्या, आता रविवारापासून बुधवारपर्यंत मधले दिवस ३ व बुधवारच्या इष्टघटिका ७ व संक्रांत झाली त्या दिवसाच्या घ० ५० प० ४६ मिळून ३ दिवस ५७ घ० प० ४६ इतका येथ गतकाळ झाला याला वृषभाची स्पष्टगति ५७ ह्यांनीं गुणून गुणाकार २२९ कला ५० वि० २८ प्रति वि० आला. येथ प्रतिविकला सोडा आणि २२५ क० ९वि० याला ६० नीं भागा भागाकार ३ अं० ४५ क० इतका आला इष्टकाळीं वृषभराशीला सूर्य आहे म्हणून त्याच्या पूर्वीची राशि जी मेष तिचा दर्शक अंक १ हा अंशाचे मागें मांडिला, म्हणजे १ रा० ३ अं० ४५ क० इतका उद्दिष्ट समयींचा स्पष्टसूर्य झाला

## नवांशावरून लग्न व इष्टघटी यांचें साधन.

तनोरिष्टाशकात्पूर्वनवांशा दशसंगुणा. ।
रामाप्ता लब्धमंशाद्यं तनोर्वर्गादि साधनम् ॥ ७ ॥

उपनयनास किंवा विवाहास जो अंश घ्यावयाचा असेल त्या अंशाच्या पूर्वीचे जितके अंश गत असतील त्या अंकास दहानीं गुणून तिहींनीं भागावे उत्तर येईल ते अंशादि लग्न होय उदाहरणार्थ, मेषलग्नीं कन्याराशीच्या नवांशावर मुहूर्त घ्यावयाचा आहे अशी कल्पना करा मेषास मेषापासून मोजण्याची प्रवृत्ति असल्यामुळे इष्टांश जो कन्यांश तो मेषापासून सहावा आहे म्हणून त्यापू

एखादें जन्मनक्षत्र असेल त्याला आरंभीं रवीची दशा आहे असें समजावें आणि मघा, पूर्वा किंवा उत्तरा या तीन नक्षत्रांतून एखादें नक्षत्र असता चंद्राची दशा आहे असें जाणावें जे सौम्य ग्रह आहेत त्यांना तीनच नक्षत्रें आहेत व क्रूर ग्रह आहेत त्यांना चार आहेत रवि, भौम, शनि आणि राहु हे क्रूर व अशुभ फल उत्पन्न करणारे ग्रह आहेत आणि चंद्र, बुध, गुरु व शुक्र हे सौम्य ग्रह असून शुभफल देणारे आहेत . आता जन्मनक्षत्रावरून दशेचा भोग्यकाल व भुक्तकाल कसा काढावा हें सांगतों ज्या नक्षत्रांवर जन्म झाला असेल तें नक्षत्र कोणत्या ग्रहाचें आहे तें पुढील कोष्टकांत पाहून त्याच कोष्टकांत एका

## अष्टोत्तरी महादशा व अंतर्दशा.

सूर्यमहादशावर्षे ६ मध्यें अन्तर्दशा
आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा

| सू | च | म | बु | श | गु | रा | शु | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | ० | ० | ० | ० | १ | ० | १ | वर्ष |
| ४ | १० | ५ | ११ | ६ | ० | ८ | २ | मास |
| ० | ० | १० | १० | २० | २० | ० | ० | दिवस |
| ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | घ० |

स्थूलमानानें आर्द्रादि सर्व नक्षत्रांस एका घटकेस दिवस ९ व एका नक्षत्रास वर्षे [illegible] एकदर वर्षे ६

चंद्रमहादशावर्षे १५ मध्यें अन्तर्दशा
मघा, पूर्वा फा०, उत्तरा फा०

| च | म | बु | श | गु | रा | शु | सू | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | १ | २ | १ | २ | १ | २ | ० | व | ० |
| १ | १ | ४ | ४ | ७ | ८ | ११ | १० | मा | ० |
| ० | १० | १० | २० | २० | ० | ० | ० | दि | ० |
| ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | घ | ० |

स्थूलमानानें मघादि ३ नक्षत्रांस एका घटिकेस दिवस ३० व एका नक्षत्रास वर्षे ५ एकदर वर्षे १५

भौममहादशावर्षे ८ मध्य अन्तर्दशा
हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा

| म | बु | श | गु | रा | शु | सू | च | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | १ | ० | १ | ० | १ | ० | १ | व | ८ |
| ७ | ३ | ८ | ४ | १० | ६ | ५ | १ | मा | ० |
| ३ | ३ | २६ | २६ | २० | २० | १० | १० | दि | ० |
| २० | २० | ४० | ४० | ० | ० | ० | ० | घ | ० |

स्थूलमानानें हस्तादि सर्व नक्षत्रांस एका घटिकेस १२ दिवस व एका नक्षत्रास वर्षे २ एकदर वर्षे ८

बुधमहादशावर्षे १७ मध्यें अन्तर्दशा
अनुराधा, ज्येष्ठा, मूल

| बु | श | गु | रा | शु | सू | च | म | बो | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | १ | २ | १ | ३ | ० | २ | १ | व | ० |
| ८ | ६ | ११ | १० | ३ | ११ | ४ | ३ | मा | ० |
| ३ | २६ | २६ | २० | २० | १० | १० | ३ | दि | ० |
| २० | ४० | ४० | ० | ० | ० | ० | २० | घ | ० |

स्थूलमानानें सर्व नक्षत्रांस एका घटिकेस ३१ दिवस व एका नक्षत्रास ५ वर्षे ८ मास एकदर वर्षे १७

शनिमहाद्दशावर्षे १० मध्यें अन्तर्दशा
पूर्वांषाढा, उत्तराषाढा, अभिजित्, श्रवण.

| श. | गु. | रा. | शु. | सू. | चं. | मं. | बु. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ० | १ | १ | १ | ० | १ | ० | १ | व ० |
| ११ | ९ | १ | ११ | ६ | ४ | ८ | ६ | मा ० |
| ३ | ३ | १० | १० | २० | २० | २६ | २६ | दि ० |
| २० | २० | ० | ० | ० | ० | ४० | ४० | [illegible] ० |

पू०षाढा एका घटिकेस दि० १५, उ०षा० १ घ० दि० २०, अभि० १ घ० दि० ४७ घ० २२, श्रव० १ घ० दि० १९ घ० ४ एका नक्षत्रास वर्षे २ एकंदर वर्षे १०.

गुरुमहाद्दशावर्षे १९ मध्यें अन्तर्दशा
धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा.

| गु. | रा. | शु. | सू. | चं. | मं. | बु. | श. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | २ | ३ | १ | २ | १ | २ | १ | व ० |
| ४ | १ | ८ | ० | ७ | ४ | ११ | ९ | मा ० |
| ३ | १० | १० | २० | २० | २६ | २६ | ३ | दि ० |
| २० | ० | ० | ० | ० | ४० | ४० | २० | घ ० |

स्थूलमानानें सर्व नक्षत्रांस १ घटिकेस दि० ३८ एका नक्षत्रास वर्षे ६ म० ४ एकंदर वर्षे १९.

राहुमहाद्दशावर्षे १२ मध्यें अन्तर्दशा
उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी.

| रा. | शु. | सू. | चं. | मं. | बु. | श. | गु. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ० | १ | ० | १ | १ | २ | व ० |
| ४ | ४ | ८ | ८ | १० | १० | १ | १ | मा ० |
| | ० | ० | ० | २० | २० | १० | १० | दि ० |
| ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | घ ० |

स्थूलमानानें सर्व नक्षत्रांस एका घटिकेस दि० १० एका नक्षत्रास वर्षे ३ एकंदर वर्षे १२.

शुक्रमहाद्दशावर्षे २१ मध्यें अन्तर्दशा
कृत्तिका, रोहिणी मृगशीर्ष.

| शु. | सू. | चं. | मं. | बु. | श. | गु. | रा. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | १ | २ | १ | ३ | १ | ३ | २ | व ० |
| १ | २ | ११ | ६ | ३ | ११ | ८ | ४ | मा ० |
| ० | ० | ० | २० | २० | १० | १० | ० | दि ० |
| ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | घ ० |

स्थूलमानानें कृत्तिकादि तीन नक्षत्रांस एका घ० ४२ दिवस, एका नक्षत्रास वर्षे ७ एकंदर वर्षे २१.

नक्षत्राची वर्षसंख्या पहावी. जी वर्षसंख्या असेल तिला नक्षत्राचे आरंभापासून जन्मकाळापर्यंत ज्या घटिका गत असतील त्यांला गुणावें. आणि त्याच नक्षत्राच्या एकंदर घटिकांनीं भागावें. जो भागाकार येईल तो त्या नक्षत्राचे वर्षसंख्येंतून वजा करावा. जी वजाबाकी येईल तितकी त्या नक्षत्राची दशा भोगावयाची राहिली असें समजावें. नंतर जन्मनक्षत्राच्या पुढील नक्षत्रें जितकीं कोष्टकांत शेष असतील त्यांला त्या ग्रहाच्या वर्षसंख्येनें गुणावें, व जीं वर्षे येतील तीं मागील वजाबाकींत मिळवावीं म्हणजे ती त्या ग्रहाची भोग्यदशा होय. हीं भोग्यवर्षे एकंदर वर्षसंख्येतून वजा केलीं म्हणजे त्या ग्रहाच्या दशेचीं भुक्तवर्षे निघतात. उदाहरण—एकाचा जन्म पुनर्वसु नक्षत्रावर त्या नक्षत्राच्या आरंभापासून २० घटिकांनी झाला आहे तर त्याची भुक्तभोग्यदशा काढा.

पुनर्वसु नक्षत्र आरंभापासून समाप्तिपर्यंत एकंदर ५८ घटिका आहे वरील दशाकोष्टकात पुनर्वसु नक्षत्र सूर्याच्या दशेच्या कोष्टकात आहे त्याच्याच खाली एका नक्षत्रास १॥ वर्ष म्हणून लिहिलें आहे म्हणून रीतीप्रमाणें पुनर्वसु नक्षत्राच्या आरंभापासून जन्मकालापर्यंत गतघटि २०×१॥–३०–५८, येथें तिसाला ५८ या अंकानीं भाग जात नाहीं म्हणून तिसांस बारानीं गुणून महिने करून नतर भागिलें आहे जसें, ३०×१२=३६०–५८=६ मास १२ दिवस ही भुक्तदशा होय हे अंक एका नक्षत्रांची दशा वर्ष १॥ त्यांतून वजा करा जसें, १॥ वर्ष–१८ महिने यातून उणे ६ म० १२ दि०=११ म० १८ दि हा पुनर्वसु नक्षत्राचा भोग्यकाल होय एका नक्षत्रास एकदर भोग्यकाल वर्ष १॥ म्हणून कोष्टकातील पुनर्वसु नक्षत्राच्या पुढील नक्षत्रें २×१॥–३ वर्षे+पुनर्वसूचा भोग्यकाल ११ म० १८ दि०=३ वर्ष ११ म० १८ दि० इतकी सूर्याची दशा जन्मणारास भोगावयाची आहे म्हणजे जन्मकालापासून तितकें वय होईपर्यंत ती दशा राहील हीं वर्षे सूर्याच्या एकदर वर्षसंख्येतून वजा करा सूर्यमहादशा एकदर वर्षे ६ यातून वजा भोग्यदशा ३ व० ११ म० १८ दि० घ०=२ व ० म १२ दि ० घ० इतकी सूर्याची एकदर दशा भुक्त झाली त्याप्रमाणें नक्षत्रावरून सर्व ग्रहाच्या भुक्तभोग्य दशा काढाव्या जन्मकालीं जी दशा असेल ती संपल्यानंतर त्याच्या पुढील ग्रहाची दशा मागील कोष्टकात दाखविल्या प्रमाण सुरू होते असो ही स्थूलमानाची रीति आहे परंतु सुलभ आहे म्हणून तीच येथ दिली आहे स्पष्टचद्र करून म्ह० त्याच्या कला करून, एका नक्षत्राला म्ह० ८०० कलांना जर अमुक वर्षे तर स्पष्टचद्राच्या जितक्या कला होतील तितक्या कलाला किती ? इत्यादि त्रैराशिक पद्धतीनें भुक्तभोग्यदशा काढणें अधिक सूक्ष्म आहे विंशोत्तरीच्या देखील भुक्तदशा वरील रीतीनेच काढाव्या

## ग्रहांच्या अंतर्दशा.

ज्या एखाद्या ग्रहाच्या महादशेंतील ज्या दुसऱ्या ग्रहाची अंतर्दशा काढाव याची असेल त्या दोहोंच्याही महादशेच्या वर्षसंख्येचा गुणाकार करावा, व त्यास १०८ नीं भागावें जे उत्तर येईल तितकी वर्षमासादि अंतर्दशा जाणावी उदाहरण रवीच्या अंतर्दशेंत चद्राची अंतर्दशा काढावयाची आहे म्हणून रवीची महादशा वर्षे ६×चद्रमहादशा वर्षे १५=९०–१०८= (९०×१२=१०८०) १० महिने ही रवीच्या महादशेंतील चद्राची अंतर्दशा झाली चद्राच्या महादशेंत रवीची अंतर्दशा इतकीच असणार हें उघड आहे

## विंशोत्तरी दशा.

कोणत्या जन्मनक्षत्राला कोणत्या ग्रहाची दशा असते व ती किती वर्षें असते हें पुढील कोष्टकावरून ध्यानीं येईल. त्या कोष्टकांत सुरुवातीकडून प्रत्येक ग्रहाच्या महादशेंतील प्रत्येक ग्रहाचा अंतर्दशाकाल दाखविला आहे. ह्या अंतर्दशा काढण्याची रीति अष्टोत्तरीप्रमाणेंच आहे. परंतु तेथें लिहिल्याप्रमाणें येथें १०८ नीं न भागितां १२० नीं भागावें.

## विंशोत्तरी महादशेंतील अंतर्दशेचें कोष्टक.

| सूर्यमहादशा वर्षें ६ कृति. उत्तराफा. उत्तराषा. | | | | चंद्रमहादशा वर्षें १० रोहिणी, हस्त, श्रवण. | | | | भौममहादशा वर्षें ७ मृग, चित्रा, धनिष्ठा. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | अंतर्दशा. | | | | अंतर्दशा. | | | |
| | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० |
| र. | ० | ३ | १८ | चं. | ० | १० | ० | मं. | ० | ४ | २७ |
| चं. | ० | ६ | ० | मं. | ० | ७ | ० | रा. | १ | ० | १८ |
| मं. | ० | ४ | ६ | रा. | १ | ६ | ० | गु. | ० | ११ | ६ |
| रा. | ० | १० | २४ | गु. | १ | ४ | ० | श. | १ | १ | ९ |
| गु. | ० | ९ | १८ | श. | १ | ७ | ० | बु. | ० | ११ | २७ |
| श. | ० | ११ | १२ | बु. | १ | ५ | ० | के. | ० | ४ | २७ |
| बु. | ० | १० | ६ | के. | ० | ७ | ० | शु. | १ | २ | ० |
| के. | ० | ४ | ६ | शु. | १ | ८ | ० | र. | ० | ४ | ६ |
| शु. | १ | ० | ० | र. | ० | ६ | ० | चं. | ० | ७ | ० |

| राहूची महाद० वर्षें १८ आर्द्रा, स्वाती, शतता० | | | | गुरुमहादशा वर्षें १६ पुनर्व०, विशा०, पू० भा० | | | | शनिमहादशा वर्षें १९ पुष्य, अनु०, उ० भा०. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | अंतर्दशा. | | | | अंतर्दशा. | | | |
| | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० |
| रा. | २ | ८ | १२ | गु. | २ | १ | १८ | श. | ३ | [illegible] | ३ |
| गु. | २ | ४ | २४ | श. | २ | ६ | १२ | बु. | २ | ८ | ९ |
| श. | २ | १० | ६ | बु. | २ | ३ | ६ | के. | १ | १ | ९ |
| बु. | २ | ६ | १८ | के. | ० | ११ | ६ | शु. | ३ | २ | ० |
| के. | १ | ० | १८ | शु. | २ | ८ | ० | र. | ० | ११ | १२ |
| शु. | ३ | ० | ० | र. | ० | ९ | १८ | चं. | १ | ७ | ० |
| र. | [illegible] | १० | २४ | चं. | १ | ४ | ० | मं. | १ | १ | ९ |
| चं. | १ | ६ | ० | मं. | ० | ११ | ६ | रा. | २ | १० | ६ |
| मं. | १ | ० | १८ | रा. | २ | ४ | २४ | गु. | २ | ६ | १२ |

| बुधमहादशा वर्षे १७ आश्ले०, ज्येष्ठा, रेव० | | | | केतुमहादशा वर्षे ७ मघा, मूळ, अश्वि० | | | | शुक्रमहादशा वर्षे २० पू०फा०, पू०षा०, भ० | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | | अंतर्दशा | | | | अंतर्दशा | | | |
| | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० | | व० | मा० | दि० |
| बु | २ | ४ | २७ | के | ० | ४ | २७ | शु | ३ | ४ | ० |
| के | ० | ११ | २७ | शु | १ | २ | ० | र. | १ | ० | ० |
| शु | २ | १० | ० | र | ० | ४ | ६ | च | १ | ८ | ० |
| र | ० | १० | ६ | च | ० | ७ | ० | म | १ | २ | ० |
| च | १ | ५ | ० | म. | ० | ४ | २७ | रा | ३ | ० | ० |
| म | ० | ११ | २७ | रा | १ | ० | १८ | गु | २ | ८ | ० |
| रा | २ | ६ | १८ | गु | ० | ११ | ६ | श | ३ | २ | ० |
| गु | २ | ३ | ६ | श | १ | १ | ९ | बु | २ | १० | ० |
| श | २ | ८ | ९ | बु | ० | ११ | २७ | के | १ | २ | ० |

## योगिनीदशा.

योगिनी ८ आहेत त्यांचीं नावें मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा व संकटा अशीं आहेत. त्यांच्या दशा काढण्याची रीति अशी आहे की, जें जन्मनक्षत्र असेल त्यांत तीन अंक मिळवावे आणि त्या बेरजेस आठांनीं भागावें, बाकी १ अंक उरला तर मंगलेची दशा जाणावी. २ उरले तर पिंगलेची, ३ उरले तर धन्या, ४ उरले तर भ्रामरी, ५ उरले तर भद्रिका, ६ उरले तर उल्का, ७ उरले तर सिद्धा, व ८ उरले तर संकटा, याप्रमाणें योगिनीदशा जाणाव्या. ज्या योगिनीचा जो अनुक्रमांक असेल तितकीं वर्षें त्या योगिनीची दशा जाणावी. जसें, मंगलेचें १ वर्ष, पिंगलेचीं २ वर्षें, धन्येचीं ३ वर्षें इत्यादि. ह्या योगिनीदशेचीं एका फेऱ्याचीं ३६ वर्षें होतात व पुन: पुन: अनुक्रमानें त्याच दशा येतात. उदाहरण, एकाचें जन्मनक्षत्र विशाखा म्हणजे १६ आहे. यांत ३ मिळवून बेरीज १९ झाली. त्याला आठांनीं भागिलें, बाकी ३ राहिले; तिसरी योगिनी धन्या आहे म्हणून धन्यायोगिनीची दशा जन्मकाळीं आहे असें जाणावें. पूर्वी अष्टोत्तरी दशेंत सांगितल्याप्रमाणेंच योगिनीदशेचीं जन्मकाळचीं भुक्तभोग्य वर्षें काढावीं. अंतर्दशाही त्याच रीतीनें काढाव्या. उदाहरण, पिंगलेच्या महादशेंत भ्रामरीची अंतर्दशा किती तें सांगा. पिंगलेची वर्षसंख्या २, धन्या दशेची वर्षसंख्या ३ व एकंदर योगिनीदशाची वर्षसंख्या ३६, आतां त्रैराशिक रीतीनें उदाहरण मांडा. ३६ ला जर २ वर्षें, तर ३ वर्षांला किती दिवस येतील? २×३=६ वर्षें ÷३६=$\frac{६}{३६}$ वर्षें. याचे महिने करा. ६×१२=७२ ÷३६=२ महिने. हा पिंगलामहादशेंतील धन्याअंतर्दशेचा काल झाला. पुढें मंगलादि ८ योगिनींच्या अंतर्दशांचें कोष्टक दिलें आहे त्यावरून स्पष्ट कळेल.

# योगिनींच्या अंतर्दशा.

| | मंगलांतर्दशा वर्ष १ | | | | | | | | पिंगलांतर्दशा वर्ष २ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मं. | पि. | ध. | भ्रा | भ. | उ. | सि. | सं. | पि. | ध. | भ्रा. | भ. | उ. | सि. | सं. | मं. |
| व. | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| म. | ० | ० | १ | १ | १ | २ | २ | २ | १ | २ | २ | ३ | ४ | ४ | ५ | ० |
| दि. | १० | २० | ० | १० | २० | ० | १० | २० | १० | ० | २० | १० | ० | २० | १० | २० |

| | धन्यांतर्दशा वर्ष ३ | | | | | | | | भ्रामरी अंतर्दशा वर्ष ४ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ध. | भ्रा | भ. | उ. | सि. | सं. | मं | पिं. | भ्रा. | भ. | उ. | सि. | मं. | मं. | पि. | ध. |
| व. | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| म. | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | १ | २ | ५ | ६ | ८ | ९ | १० | १ | २ | ४ |
| दि. | ० | ० | ० | | ० | ० | ० | ० | १० | २० | ० | १० | २० | १० | २० | ० |

| | भद्रिकांतर्दशा वर्ष ५ | | | | | | | | उल्कांतर्दशा वर्ष ६ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | भ. | उ. | सि | मं | मं. | पि. | ध. | भ्रा. | उ. | सि | मं. | म | पि. | ध. | भ्रा | भ. |
| व. | ० | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | १ | १ | ० | ० | ० | ० | ० |
| म. | ८ | १० | ११ | १ | १ | ३ | ५ | ६ | ० | २ | ४ | २ | ४ | ६ | ८ | १० |
| दि | १० | ० | २० | १० | २० | १० | ० | २० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

| | सिद्धांतर्दशा वर्ष ७ | | | | | | | | संकटांतर्दशा वर्ष ८ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सि | मं. | मं. | पि. | ध. | भ्रा. | भ. | उ. | सं | मं | पि | ध | भ्रा. | भ. | उ. | सि. |
| व | १ | १ | ० | ० | ० | ० | ० | १ | १ | ० | ० | ० | ० | १ | १ | १ |
| म. | ४ | ६ | २ | ४ | ७ | ९ | ११ | २ | ९ | २ | ५ | ८ | १० | १ | ४ | ६ |
| दि. | १० | २० | १० | २० | ० | १० | २० | ० | १० | २० | १० | ० | २० | १० | ० | २० |

वरील कोष्टकांपैकीं डाव्या हाताकडील उभ्या कोष्टकांतील दशा म्हणजे मंगल्या, भद्रिका व सिद्धा ह्या शुभफलदायक आहेत व बाकीच्या म्हणजे पिं भ्रामरी, उल्का व संकटा ह्या अशुभ फलदायक आहेत असें जाणावें.

## कुंडलीविचार.

कुंडली पाहून ग्रहांचीं फलें सांगणें ही गोष्ट फलज्योतिषशास्त्रांत विशेष स्थानीं आहे. व हल्लीं बऱ्याच लोकांचें इकडे लक्ष लागलें आहे म्हणून त्याविषयीं संक्षेपानें येथें लिहितों. कुंडली पाहणारास ज्या कांहीं गोष्टी ७ विषयक माहिती पाहिजेत त्या यथानुक्रम खालीं लिहिल्या आहेत. गत पण त्यांनांत ठेवण्यास सोईचीं असल्यामुळें कुंडली पाहणारांनीं कांहीं मह यथाक्रमानें दिलेले सुगम श्लोक तोंडपाठ करावे म्हणजे त्यामुळें कुंडली त्यास पुष्कळ मदत होईल. कुंडली पाहून फलें सांगणें ही गोष्ट केवळ

भवाची असल्यामुळें त्याविषयीं येथे सविस्तर लिहिणें शक्य नाहीं. म्हणून मी येथें फक्त मूलतत्वेंच लिहिणार आहें. जसजशा अधिक कुंडल्या दृष्टीखालून जातील तसतशीं बरोबर फलें सांगण्याची अधिक पात्रता अंगीं येत जाईल. असो. कुंडली म्हणजे जन्मकाळीं आकाशांतील ग्रहांची स्थिति दाखविणारा एक नकाशा आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. कुंडलींत बारा स्थानें असतात, त्यांचीं निरनिराळीं नावें आहेत व प्रत्येक स्थानावर किंवा घरावर निरनिराळ्या गोष्टींचा विचार करितात. हीं स्थानें, जन्मलग्न हें प्रथमस्थान धरून, तेथून मोजितात. जन्मकाळीं जी राशि क्षितिजांत उदय पावत असेल तें जन्मलग्न होय. इष्टकाळची आकाशांतील ग्रहस्थिति समजण्याकरितां लग्नकुंडली जमिनीवर यांनिवृत्ताच्या पातळींत लंबरूप धरावी, म्हणजे पूर्वेदिशेकडे लग्नाचें स्थान व पश्चिमदिशेकडे सप्तमस्थान होईल, कुंडलीचें दशमस्थान हा आकाशांतील डोकीवरचा मध्यबिंदु व चतुर्थस्थान, हा पायाखालील पातालांतील मध्यबिंदु होय. कुंडली आपल्यासमोर धरिली म्हणजे उजव्या बाजूचें कुंडलीचें अर्धें हें दिवसाची आकाशस्थ ग्रहांची उदित स्थिति दाखवील व डावीकडील अर्धें हें रात्रीची अस्तस्थिति दाखवील. बाजूची कुंडली पहा.



## लग्नकुंडलीचीं द्वादशस्थानें (गीति).

तनुधनसहजसुहृत्सुतरिपुजायामृत्युधर्मकर्मायाः।
व्यय इति भावा द्वादश तेषां वर्णनं प्रसव्यतो लग्नात् ॥ ८ ॥

वरील गीतीमध्यें जन्मलग्नापासून म्हणजे प्रथमस्थानापासून द्वादशभावाच्या संज्ञा अनुक्रमानें सांगितल्या आहेत. जसें प्रथमभावाला तनुस्थान म्हणतात. दुसरें धनस्थान, तिसरें सहज किंवा पराक्रमस्थान, चवथें सुहृत्स्थान किंवा मातृस्थान, पांचवें सुतस्थान आणि विद्यास्थान, सहावें रिपुस्थान, सातवें जायास्थान, आठवें मृत्युस्थान, नववें धर्मस्थान किंवा भाग्यस्थान, दहावें कर्मस्थान, पितृस्थान किंवा राज्यपदस्थान, अकरावें आयस्थान किंवा लाभस्थान, आणि बारावें व्ययस्थान. याप्रमाणें द्वादशभावांचीं निरनिराळीं नावें आहेत. तीं लग्नस्थानापासून अप्रदक्षिण म्हणजे डावीकडून उजवीकडे मोजावीं. हीं बारा स्थानांचीं बारा नावें कोणत्या तत्वावर ठेवण्यांत आलीं आहेत याविषयीं हल्लीं उपलब्ध असलेल्या ज्योतिषग्रंथांत कोठें कांहीं लिहिलेलें निदान माझ्या तरी पाहण्यांत नाहीं. तिसऱ्याच स्थानाला पराक्रमस्थान कां म्हणावें किंवा एकादश

स्थानालाच लाभ स्थान ही संज्ञा कां असावी, याची सयुक्तिक उपपत्ति लागल्यास या शास्त्राचें महत्व अधिक वाढेल. तथापि, कुंडलीचा वेदांत आणि व्यवहार अशा उभय दृष्टीनें विचार केला तर यासंबंधीं एक विशेष गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते ती अशी कीं, कुंडलींतल्या कोणत्याही स्थानापासून सप्तमस्थान, हें जेथून मोजावें त्या स्थानाचें परिणामदर्शक किंवा कारणदर्शक असतें. मग ती कार्यकारणस्थिति ज्या त्या कल्पनेप्रमाणें श्रेयस्कर किंवा अश्रेयस्कर भासूं शकेल. उदाहरणार्थ, पहिलें तनुस्थान, त्यापासून जें सप्तमस्थान त्याला जायास्थान असें नांव दिलेलें आहे. सूक्ष्मदृष्टीनें विचार केला तर जाया ही तनूच्या तेजोबलाला क्षयकारक नाहीं किंवा संसारांत जाया ही गृहस्थाश्रमाला भूषण नाहीं असें कोण म्हणेल? तसेंच, द्वितीयस्थानाला धनस्थान म्हणतात. धनस्थानापासून सप्तमस्थान हें मृत्युस्थान. धनापासून तनूचा नाश झालेलीं उदाहरणें वारंवार घडतात, हें अनेक प्रसंगीं जगांत दृष्टीस पडतें. आतां याचें कारण तेथें अशुभग्रहाची दृष्टि असेल किंवा तें अशुभग्रहाचें स्थान असेल इत्यादि कांहीं असो. अथवा पारमार्थिक दृष्ट्या जरी विचार केला तरीही धन हें घातकच आहे; आणि याचसाठीं मुमुक्षुजन त्याचा तिरस्कार करितात. तृतीयस्थान हें पराक्रमस्थान आहे. तेथपासून सप्तमस्थान हें भाग्यस्थान. पराक्रम जशी असेल तरच मनुष्य भाग्य काढील, किंवा इष्ट वस्तु साध्य करून घेईल हें निश्चित आहे. चतुर्थस्थानाला मातृस्थान म्हणतात. हें पितृस्थानाचें म्हणजे दशमस्थानाचें जायास्थान झालें. जायास्थानाचे परिणाम वर लिहिलेच आहेत किंवा दशमस्थान हें राज्यपदस्थान धरून चतुर्थस्थानाचा म्हणजे सुखाचा विचार केला तर राज्यामागें म्हणजे मोठेपणामागें एकन्या सुखाची हानि झालीच असें समजावें. तसेंच, पंचमस्थानापासून म्हणजे विद्यास्थानापासून सातव्या स्थानाला लाभस्थान म्हणतात. विद्या म्हणजे ज्ञान, तें असेल तरच इष्ट वस्तूचा लाभ होईल हें उघड आहे. रिपुस्थानाचें जें सप्तमस्थान तें व्ययस्थान. शत्रूपासून तनु, मन व धन यांला कसा क्षय लागतो हें, कोर्टांत ज्यांचे भाऊबंदकीचे तंटे चालले असतील त्यांना विचारावें म्हणजे समजेल. किंवा रिपु म्हणजे षड्रिपु धरिले तरी त्यापासूनही सर्वप्रकारें व्यय म्हणजे क्षयच होणार हें उघड आहे. याप्रमाणें प्रत्येक स्थानाचा त्याच्या सातव्या स्थानाशीं कांहीं तरी परिणामसंबंध किंवा कारणसंबंध आहे असें दिसतें. अशाच प्रकारच्या कांहीं तत्वावर ही द्वादशस्थानरचना पडली असावी असें वाटतें. असो. आतां या बारा स्थानांवर काय काय विचार करावा हें सांगतें

तील याचा विचार; सदाचरणी किंवा दुराचरणी याचा विचार व आयुर्दा- याचा विचार इत्यादि गोष्टी पहाव्या. याचा अधिकार शिरावर असतो. **धनस्थानावर** सुवर्णरत्नादिकांची प्राप्ति, द्रव्यसंग्रही किंवा खर्चिक, कुटुंबसौख्य, वाणींत दोष आहे की काय म्हणजे तोतरें वगैरे बोलणें याचा विचार, वडिलो- पार्जित द्रव्यलाभ इत्यादिकांचा विचार करितात. याचा अधिकार वाणी व नेत्र यांच्यावर असतो. **तृतीयस्थानावर** भाऊ किती आहेत, बहिणी किती आहेत. त्यांपासून सुखदुःख, स्वतःचा पराक्रम, साहसपणा, चाकरांचें सौख्य, प्रवासयोग इत्यादि गोष्टींचा विचार करितात. या स्थानाचा अधिकार कान व गळा यांचेवर असतो **चतुर्थस्थानावर** मातृसंबंधीं सुखाचा विचार, चतुष्पदांपासून सुखदुःख, घर बांधणें होईल किंवा नाहीं, मित्रसुख, भूमिलाभ, वडिलार्जित द्रव्यलाभ इत्यादि गोष्टी पहाव्या याचें हृदयावर स्वामित्व आहे. **पंचमभवनावर** बुद्धि, विद्याप्राप्ति, शास्त्रज्ञान, ग्रंथकर्तृत्व, मंत्रतंत्र जाणणें, स्त्रीचेठाईं गर्भधारणसंबंधी वि- चार, पुत्रकन्या यांची संख्या व त्यापासून सुखदुःख इत्यादिकांविषयीं विचार करावा. याचें स्वामित्व उदर व कुक्षि यांचेवर आहे. **षष्ठभवनावर** शत्रु उत्पन्न होतील कीं काय, त्यांची वृद्धि किंवा नाश, रोगोत्पत्ति, व्रणादिकांचा उद्भव, मातुलपक्षाचें सुखदुःख इत्यादि गोष्टींचा विचार करावा. याचा अंमल कटिभागावर आहे. **सप्तमस्थानावर** विवाहयोग, भार्या सुंदर किंवा कुरूप, निजपासून सुखदुःख, तिची शरीरप्रकृति व स्वभाव, महापातकादि योग इत्यादि गोष्टी पहाव्या. याचा अंमल ओटीपोटावर आहे. **अष्टमभवनावर** आयुर्दायविचार, मनोव्यथा, अपमृत्यु, आत्महत्यादि अनिष्टमरण, ज्वरादि रोगोद्भव इत्यादि गोष्टी पहाव्या. याचें गुह्ये- द्रियावर स्वामित्व आहे. **नवमभवनावर** यात्रादिकांचा विचार, स्वधर्मावर निष्ठा, सत्कर्मे म्हणजे लोकोपयोगी कृत्यें, योग्यस्थानीं दानधर्म, भाग्योदयाचा काळ व तो कोणत्या प्रकारचा आहे इत्यादि पहावें. याचा अधिकार मांडीवर आहे. **दशमस्थानावर** राजाश्रय, राजापासून विशेष अधिकारप्राप्ति, व्यापारांत यश किंवा अपयश, पुण्यवृद्धि, पितृसंबंधीं सुखदुःख, पित्याचा मृत्यु इत्यादि गोष्टी पहाव्या. याचा अधिकार गुडघ्यावर आहे. **एकादशस्थानीं** धनधान्य, पशु आदिकरून सर्व वस्तूंच्या लाभाविषयीं व कुटुंबसुखाविषयीं विचार करावा. याचा अंमल पोटऱ्यांवर आहे. **द्वादशस्थानीं** आयुष्यांत होणाऱ्या खर्चाविषयीं म्हणजे फार खर्च होऊन पैशाची उणीव भासेल कीं काय, सद्व्यय किंवा अपव्यय म्हणजे आवश्यक गोष्टींत किंवा व्यसनांत द्रव्य खर्च होईल इत्यादि गोष्टी पहाव्या. याचें स्वामित्व पावलावर असते.

## द्वादशराशींचा विचार

मेषो वृषोऽथ मिथुनं कर्कः सिंहोऽथ कन्यका ।
तुलाथ वृश्चिको धन्वी मकरः कुंभमीनकौ ।
राशयस्तु क्रमादेते पुंस्त्रियौ क्रूरसौम्यकौ ॥ ९ ॥

मेषवृषभादिकरून राशी बारा आहेत हें पूर्वी सांगितलेंच आहे. वरील श्लोकांत प्रत्येक राशीच्या नांवावर अंक घातले आहेत ते राशींचे अनुक्रमांक आहेत. हे कुंडली पाहणारास पाठ पाहिजेत. कारण कुंडलींत राशींचीं नांवें न लिहितां राशींचे अनुक्रमांक लिहितात. जन्मकुंडलीच्या मध्यगृहांत २ हा अंक असतां वृषभलग्नावर जन्म आहे, ७ असतां तूळलग्नावर आहे, ९ असतां धनलग्नावर आहे इत्यादि एकदम ध्यानांत आलें पाहिजे.

राशींचे देह-मेष, वृषभ व कुंभ ह्या ऱ्हस्वदेही राशी; मिथुन, कर्क, धन, मकर व मीन ह्या मध्यमदेही राशी आणि सिंह, कन्या, तूळ व वृश्चिक ह्या दीर्घदेही राशी होत.

राशींचे स्वभाव-विषमराशी क्रूर आणि समराशी सौम्य होत. मेष, मिथुन, सिंह, तूळ, धन व कुंभ ह्या विषमराशी होत. आणि बाकीच्या म्हणजे वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर व मीन ह्या समराशी जाणाव्या.

राशींच्या जाति-विषमराशी ह्या पुरुषजाति व समराशी ह्या स्त्रीजाति होत.

राशींचीं तत्त्वें-मेष, सिंह, धन ह्या अग्निराशी होत. वृषभ, कन्या, मकर ह्या भूमिराशी होत. मिथुन, तूळ, कुंभ ह्या वायुराशी आणि कर्क, वृश्चिक व मीन ह्या जलराशी होत.

## द्वादश जन्मलग्नांचीं लक्षणें.

जन्मकाळीं ज्या राशींत सूर्य असतो तें जन्मणाऱ्याचें जन्मलग्न व चंद्र असतो ती जन्मरास होय. अमक्या लग्नीं जन्म असतां अमुक लक्षण असतें हें आतां सांगतों. १ मेषलग्न-रक्तवर्ण, बांधा मध्यम, परंतु हाडापेरांनीं मजबूत, स्पष्ट बोलणें, तापट स्वभाव, चंचलवृत्ति, पित्तवातप्रकृति, अल्पस्त्रीसंग करणारा, अल्पसंतति वगैरे. २ वृषभलग्न-शुभ्रवर्ण, ठाणा, गर्विष्ठ, अविचारी, पराक्रमहीन, स्पर्धा राखणारा परंतु मित्र, शरीरानें मजबूत, मान व ओंठ जाड, मध्यम श्रीमंत, मध्यम संतति, वातप्रकृति, रुंद नाक तोंड, दादाड वगैरे. ३ मिथुनलग्न-बांधा उंच, सरळ वृत्ति, हिरवट वर्ण, शरीरानें मजबूत, साधारण मांसल

शरीर, उष्णप्रकृति, मध्यम स्त्रीसंग व मध्यम संतति, विद्याभ्यासमग्न, नाक तोंड लांबट व अरुंद व धारणाशक्ति उत्तम, जर स्त्री असेल तर नेत्र उत्तम, बोलणें चालणें डौलदार, जबरदस्त धोरणी, सुबुद्ध वगैरे ४ कर्कलग्न–वर्ण फिकट गोरा, बांधा कृश, दिसण्यात अशक्त व कफप्रकृति, दातांची कवळी जरा पुढें, गुप्तकार स्थानीं, विद्येची अभिरुचि परंतु अपुरें विद्यार्जन, भित्रा वगैरे. ५ सिंहलग्न–वातपित्तप्रकृति, भव्य शरीर, धट्टाकट्टा, छाती दृढ वगैरे मजबूत, शूर व मानी स्वभाव, वर्ण तांबूस, उग्र चेहरा, मोकळ्या मनाचा व निधड्या छातीचा, गर्विष्ठ, बोलण्यांत दुसऱ्यावर छाप बसविणारा वगैरे कन्यालग्न–शीतप्रकृति, बांधा साधारण उंच व नीटनेटका, काळे केस, वर्ण निमगोरा, स्वभाव लाघवी व मायावी, चालणें हंसी प्रमाण मंद व डुलत, पुढेंपुढें करण्याचा हौंस परंतु पराक्रम बेताचा, बुद्धि चांगली, हळू अडखळत बोलणारा, क्षणिक चित्ताचा, विद्याभिलाषी इत्यादि तूळलग्न–उष्णप्रकृति, सत्यप्रिय, न्यायी, बांधा नीटनेटका उंच, लांबट तोंड, वर्ण साधारण गोरा परंतु वृद्धापकाळीं तांबूस दिसणारा, डोळे काळसर व सुंदर, आपलें खरें करणारा, अल्पसंतति वगैरे वृश्चिकलग्न–कफप्रकृति, मध्यम बांधा, शरीरानें मजबूत, नाक फुगीर, हट्टी स्वभावाचा, रागीट, बडबड करणारा, स्वत विषयीं फाजील गर्व, फाजील बोलणारा, वर्ण तांबूस, फेंगडे पाय, बहुसंतति इत्यादि वृश्चिक व मकर लग्नावर जन्मलेले बहुतेक मनुष्यें लोकप्रिय नसतात धनलग्न–उंच व शरीरानें दांडगा गौरवर्ण, छाती रुंद, लांबट चेहेरा, उत्तरवयांत टक्कल पडणें, उष्णपित्त प्रकृति, अतिस्त्रीसंग, शिकार, घोडे यांची हौस, आहार मोठा वगैरे मकरलग्न–वातप्रकृति, पिंगटवर्ण, उंच शरीर, चेहेरा, मान व हनुवटी हीं लांबट व ओबडधोबड, स्वभावानें आपमतलबी, स्वल्पस्त्रीसंग, स्वल्पसंतति वगैरे कुंभलग्न–शरीरानें उंच, मजबूत, देखणा, उष्णप्रकृति, निरोगी, लांबट तोंडवळा, शहाणा परंतु वक्तृत्व बेताचें, समय पाहून तापट, स्वकार्यसाधक, कुटुंबसौख्य अल्प, शहाणा, गुणवान्, आपमतलबी, परोपकारी वगैरे मीनलग्न–ठेंगणा बांधा, हातपाय आखूड, फिकट, मांसल व वाटोळा चेहेरा, वर्ण गोरा, पाय फेंगडे, अति स्त्रीसंग, अतिसंतति, सौम्यस्वभाव, स्त्रियांस मान देऊन चालणारा, मधाहीं पदार्थांची आवड वगैरे यांप्रमाण द्वादश लग्नांचें हें स्थूल वर्णन आहे परंतु तें तसें तंतोतंत मिळेलच असें मात्र समजूं नये कारण इतर ग्रहयोग जसे असतील त्याप्रमाणें फलयोगही बदलतात उदाहरणार्थ, तनुस्थानीं सिंहलग्न आहे परंतु त्यावर शनि, मंगळ, राहु इत्यादि पापग्रहांची दृष्टि असेल किंवा त्याचा स्वामी अनिष्ट स्थानीं किंवा पापग्रहयुक्त असेल तर वर दिल्याप्रमाणें फळ असणार नाहीं तात्पर्य, तीं स्थानें ज्याप्रमाणें शुभाशुभ ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असतील त्याप्रमाण फळें समजावीं

## लग्नकुंडलीच्या केंद्रादिसंज्ञा. ( स्रग्धरा )

आद्यं तुर्यं कलत्रं दशममिह बुधैः केंद्रमुक्तं, त्रिकोणं ।
पुत्रं धर्मं।व्ययमुक्तं, पणफरमुदितं मृत्युलाभात्मजाख्यं ॥
धर्मं चापोक्लिमाख्यं व्ययरिपुसहजं कंटकाख्यं हि केंद्रं ।
चेतद्यातुर्यं स्यात्रिकमिह गदितं वैरि रिःफांतकाख्यं ॥ १० ॥

लग्नकुंडलींतील १।४।७।१० या चार स्थानांला केंद्रस्थानें म्हणतात. २।५।८।११ ह्यांला पणफर स्थानें म्हणतात. ३।६।९।१२ ह्यांला आपोक्लिमस्थानें म्हणतात. हीं केंद्रादिस्थानें ध्यानांत ठेवण्याची सोपी युक्ति अशी आहे कीं, प्रथमापासून शेवटपर्यंत केंद्र, पणफर, आपोक्लिम, ह्या अनुक्रमानें पुनः पुनः तीं मोजावीं. प्रत्येक केंद्रस्थानापासून दुसरें स्थान तें पणफर व तिसरें स्थान तें आपोक्लिम होय. केंद्रस्थानांला कंटकस्थानें असेंही म्हणतात. प्रथमस्थानापासून ९ आणि ५ या स्थानांला त्रिकोण असें म्हणतात. ६।८।१२ यांला त्रिकस्थानें म्हणतात. ३।६।१०।११ या स्थानांला उपचयस्थानें म्हणतात. २।७ ह्या स्थानांला मारकस्थानें म्हणतात. यांतून केंद्र व त्रिकोण हीं स्थानें विशेष शुभ आणि त्रिकस्थानें अशुभ जाणावीं.

## द्वादशस्थानांच्या पर्याय संज्ञा.

कुंडलींतील द्वादशस्थानांला तनु, धन, सहज इत्यादि संज्ञांशिवाय ज्या आणखी अधिक संज्ञा आहेत त्याही येथे सांगतों. प्रथमस्थानाला लग्न, मूर्ति, अंग, तनु, उदय, वपु, आद्य आणि कल्प अशीं ८ नांवें आहेत. द्वितीयस्थानाला स्व, कोश, अर्थ, कुटुंब आणि धन अशीं ५ नांवें आहेत. तृतीयस्थानाला सहज, भ्रातृ व दुश्चिक्य अशीं ३ नांवें आहेत. अंबा, पाताल, तुर्य, हिबुक, गृह, सुहृत्, वाहन, यान, बंधु, अंबु, नीर आणि जल हीं १२ नांवें चतुर्थस्थानाला आहेत. तनय, बुद्धि, विद्या, आत्मज, पंचम, वाक्स्थान व तनुज हीं ७ नांवें पंचमस्थानाचीं आहेत. रिपु, द्वेष, वैरी, क्षत व षष्ठ हीं ५ नांवें षष्ठस्थानाचीं आहेत. जामित्र, अस्त, स्मर, मदन, मद, द्यून व काम हीं ७ नांवें सप्तमस्थानाचीं आहेत. रंध्र, आयु, छिद्र, याम्य, निधन, लयपद, अष्टम आणि मृत्यु हीं ८ नांवें अष्टमस्थानाला आहेत. गुरु, धर्म, शुभ, नवम, तप व मार्ग हीं ६ नांवें भाग्यस्थानाचीं आहेत. दशमस्थानाला तात, आज्ञा, मान, कर्म, आस्पद, गगन, नभ, व्योम, मेषूरण, मध्य, व्यापार आणि दशम अशीं १० नांवें आहेत. आप, आय, आगम आणि प्राप्ति हीं ४ नांवें लाभस्थानाचीं आहेत. मोक्ष, अंतिम, द्वादश आणि रिःफ हीं ४ नांवें व्ययस्थानाला आहेत. नांवांप्रमाणें ते ते योग त्या त्या स्थानीं पहावे.

## मेषादिराशींच्या पर्याय संज्ञा.

मेष, वृषभ आदिकरून बारा राशींलाही दुसऱ्या संज्ञा आ करितां येथें सांगतों. १ मेष—अज, विश्व, तुंबर, आद्य, (क्रिय). २ वृषभ—वृष, उक्ष, गोकुळ, (तावुरी). ३ मिथुन—द्वंद्व, नृयुग्म, युग, तृतीय, (जितुम्र). ४ कर्क—कर्कट, कर्कटक, (कुळीर). ५ सिंह—कंठीरव, मृगेंद्र, हरि, (लेय). ६ कन्या—रमणी, योषिता (पाथोन). ७ तूळ—तौलि, वणिक्, (जूक). ८ वृश्चिक—अलि, कीट, (कौर्प्य). ९ धन—चाप, धन्वी, शर, कार्मुक, (तौक्षिक). १० मकर—मृग, नक्र, मृगास्य (आकोकेर). ११ कुंभ—घट, तोयधर, हृद्रोग. १२ मीन—मत्स्य, पृथुरोम, झष, अंत्यम, याप्रमाणें राशींच्या संज्ञा जाणाव्या. वर कंसांत जीं राशींचीं नांवें दिलीं आहेत तीं ग्रीक भाषेंतील आहेत.असें समजावें. उदाहरणार्थ—१ क्रिय, २ तावुरी इत्यादि. याशिवायही ज्योतिष ग्रंथांत कांहीं ग्रीक शब्द आलेले आहेत. उदाहरणार्थ—होरा, द्रेष्काण, सुनफा, अनफा, दुरुधर, केमद्रुम इत्यादि. हे शब्द आमच्या प्राचीन ज्योतिर्विदांनीं ग्रीक ग्रंथांतून घेतले आहेत. ह्यावरून असें दिसतें कीं, हे शब्द ज्या विशिष्ट योगांचे दर्शक आहेत त्या योगांचा त्यांस पूर्ण अनुभव आला असला पाहिजे आणि म्हणूनच ते योग त्यांनीं ग्रथित केले असावे.

## राशींचे स्वामी.

सिंहस्याधिपतिः सूर्यो कर्कटस्य तु चंद्रमाः ।
मेषवृश्चिकयोर्भौमः कन्यामिथुनयोर्बुधः ॥ ११ ॥
तुलावृषभयोः शुक्रः शनिर्मकरकुंभयोः ।
धनुर्मीनोभयोर्जीवश्चैते राशीश्वराः स्मृताः ॥ १२ ॥

कोणता ग्रह कोणत्या राशीचा स्वामी आहे हे पूर्वी पान ७३ मध्यें सांगितलेंच आहे परंतु वाचकांचे सोईसाठीं द्विरुक्ति दोष पत्करून पुनः येथें देतों.

| रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|
| सिंह | कर्क | मेष | मिथु० | धन | वृष० | मकर |
| | | वृश्चिक | कन्या | मीन | तूळ | कुंभ |

राहु हा कन्या राशीचा स्वामी आणि केतु हा मीनराशीचा स्वामी होय. जो ग्रह ज्या राशीचा स्वामी ते त्याचें स्वगृह किंवा स्वक्षेत्र होय. कांहीं ग्रहांला एक व कांहींना दोन क्षेत्रें आहेत. जसें, सिंह राशीचा स्वामी रवि, कर्कराशीचा चंद्र, मेष व वृश्चिक या दोन राशींचा मंगळ याप्रमाणें इतर राशींचे स्वामी जाणावे. यावरून वाचकांचे ध्यानांत हें सहज येईल कीं, सूर्याला व चंद्राला एक एक राशि असून इतर ग्रहांला मात्र दोन दोन राशिस्थानें आहेत. व तीं स्थानें सूर्यमालेंत

त्याप्रमाणे ग्रहाचा अनुक्रम दृश्यमान आहे त्याप्रमाणे वाटला गोष्टी आहेत उदाहरणार्थ, सर्व राशींत पराक्रमानें श्रेष्ठ अशी जी सिंह रास तिचें स्वामित्व देदी-




सूर्यमालेची दृश्यमान आकृति.

प्यमान व जगाचें उत्पत्ति स्थान असा मुख्य ग्रह जो सूर्य त्याच्याकडे आलें हें ठीकच आहे. सूर्याच्या खालोखाल चंद्राचें तेज असल्यामुळे सूर्याच्या दोनापैकीं स्थान जी कर्क रास तिचें आधिपत्य चंद्राकडे आलें. नंतर इतर ग्रहाचीं स्थानें अशा तऱ्हेवर ठरलीं आहेत कीं, चंद्राच्या राशीमागची अनुक्रमानें एक एक रास व सूर्याच्या राशीपुढची अनुक्रमानें एक एक अशा दोन दोन राशी इतर ग्रहाला त्याच्या (ग्रहाच्या) अनुक्रमस्थानाप्रमाण प्राप्त झाल्या आहेत. उदाहरणार्थ, बाजूच्या आकृतींत सूर्याजवळ बुध आहे म्हणून कर्क राशीच्या मागील एक रास म्हणजे मिथुन, व सिंहाच्या पुढील एक रास म्हणजे कन्या, अशा दोन राशी प्रथम बुधाच्या झाल्या. बुधाच्या नंतर शुक्र आहे म्हणून बुधाच्या ज्या दोन राशी मिथुन व कन्या त्याच्या मागील एक व पुढील एक म्हणजे वृषभ व तूळ अशा दोन राशींवर वरील न्यायानें शुक्राचें स्वामित्व ठरलें. शुक्राच्या नंतर मंगळ आहे म्हणून शुक्राच्या मागील पुढील एक एक रास म्हणजे मेष व वृश्चिक अशा दोन राशी मंगळाच्या झाल्या. मंगळानंतर गुरु आहे म्हणून मेषाच्या मागील एक व वृश्चिकाच्या पुढील एक म्हणजे मीन व धन अशा दोन राशी गुरूच्या झाल्या. शेवटीं शनि आहे म्हणून मीनाच्या मागील रास कुंभ व धन राशीच्या पुढील रास मकर अशा दोन राशींवर शनीचें स्वामित्व ठरलें. बरोबर ही रचना पाहून मनास अत्यानंद वाटतो. ज्योतिषांत अशा तऱ्हेचे सयुक्तिक व चमत्कारिक प्रकार अनेक असतील, किंबहुना प्रत्येक गोष्टीविषयीं असे मार्मिक कांहींना कांहीं तरी असेल. परंतु आपल्या अल्प बुद्धीस तें गम्य नाहीं इतकेंच. शिवाय आमच्या प्राचीन विद्वान् ज्योतिर्विदांनीं जरी अनेक शोध करून मूल्यवान् विचार ग्रथित करून ठेविले आहेत तरी ते असावे तितके सोपपत्तिक माहीत व हल्लींच्या काळांत तशा प्रकारचे

कोणी शोधक विद्वान् निपजत नाहींत, म्हणून इतर शास्त्रांप्रमाणें फलज्योतिष-शास्त्राची आज प्रगति नाहीं. असो. वर दिलेल्या सूर्यमालेच्या आकृतीवरून हें सहज समजण्यासारखें आहे कीं, सूर्य हा मध्यवर्ती असून त्याच्या सभोंवते बुध शुक्र फिरत आहेत. आपली पृथ्वी ज्या कक्षेतून परिभ्रमण करिते तिच्या अंतर्भागीं शुक्राची कक्षा आहे व तिच्या आंत बुधाची कक्षा आहे. पृथ्वीच्या बहिर्भागीं अनुक्रमानें मंगळ, गुरु आणि शनि यांच्या कक्षा आहेत. बुध, शुक्र हे भूकक्षेच्या अंतर्भागीं असलेल्या आपआपल्या कक्षांतून सूर्यासभोंवती फिरतात म्हणून त्यांना अंतर्वर्ती ग्रह म्हणतात. आणि पृथ्वीच्या कक्षेच्या बाहेर मंगळ, गुरु, शनि आणि हर्शल यांच्या कक्षा असल्यामुळें त्यांस बहिर्वर्ती ग्रह म्हणतात.

## ग्रहांचा विचार.

सूर्यः सोमो महीपुत्रः सोमपुत्रो बृहस्पतिः ।
शुक्रः शनैश्चरो राहुः केतुश्चेते ग्रहाः स्मृताः ॥ १३ ॥

ग्रह या धातूचा अर्थ 'घेणें' असा आहे. त्यामुळें सूर्यापासून प्रकाश घेणारे जे मुख्य तारे त्यांस ग्रह अशी संज्ञा प्राप्त झाली. हे ग्रह नऊ आहेत, त्यांचीं नांवें.—सूर्य, चंद्र, मंगळ, ( महीपुत्र ) बुध, ( सोमपुत्र ) गुरु, शुक्र, शनि, राहु आणि केतु राहु व केतु हे वस्तुतः ग्रह नाहींत. ज्या वर्तुल मार्गानें पृथ्वीसभोंवतीं चंद्र फिरतो तो मार्ग आणि ज्या मार्गानें पृथ्वीची प्रदक्षिणा सूर्यासभोंवती होते तो मार्ग, हे दोन्ही मार्ग परस्परांस आकाशांत ज्या दोन भिन्न स्थळीं मिळतात, त्यांपैकीं एका छेदनबिंदूस राहु व त्याच्या समोरील छेदनबिंदूस केतु असें म्हणतात. हे बिंदु समोरासमोर असल्यामुळें अर्थात् कुंडलींतही नेहमीं परस्परांच्या सप्तमस्थानींच म्हणजे समोरासमोर असतात. ह्याशिवाय हर्शल व नेपच्यून असे आणखी दोन ग्रह इंग्रजी ज्योतिष्यांनीं शोधून काढिले आहेत. त्यांस आमच्या अर्वाचीन ज्योतिर्विदांनीं अनुक्रमें प्रजापति आणि वरुण अशीं नांवें दिलीं आहेत. प्रजापति हा ग्रह हर्शलनामक ज्योतिष्यानें शोधून काढिल्यामुळें त्यास त्याचेंच नांव दिलें गेलें आहे. हर्शल हा सूर्यापासून फार दूर आहे. त्याला युरेनस असेंही म्हणतात. या हर्शलापासूनही नेपच्यून फार दूर म्हणजे सूर्यापासून सुमारें १७७ कोटी मैल आहे. हे दोन्ही ग्रह इंग्रजी ज्योतिष्यांनीं अलीकडेच ( इ० स० १७८१ मध्यें हर्शल व नंतर कांहीं वर्षांनीं नेपच्यून ) शोधून काढिले असल्यामुळें आमच्या ज्योतिषग्रंथांत त्याविषयीं कांहीं नसणारच, हें उघड आहे. नेपच्यूनसंबंधीं इंग्रजी ग्रंथांतही फारसें कांहीं नाहीं. कारण तो अतिदूर असल्यामुळें दुर्बिणीनेंही

दृश्य नाहीं. हर्शलाविषयीं मात्र लिहिलेलें आहे. हर्शल हा ग्रह ८४ वर्षांत १२ राशींतून एकदां फिरतो. म्हणजे एका राशींतून दुसऱ्या राशींत जाण्यास त्याला ७ वर्षें लागतात, इतका तो मंदगति आहे. तो प्रतिलोमगति म्हणजे आकाशांत मागें मागें चालतो आहे असें दिसतें. त्याचें फळ शनीप्रमाणेंच वाईट आहे असें लिहिलेलें आहे. जन्मलग्नीं ज्याच्या हर्शल असतो तो मनुष्य हेकेखोर, सन्देहात्मक, स्वच्छंदी, जुन्या गोष्टींला नवीन वळणाचें वळण देण्याविषयीं यत्न करणारा, सर्वांचे विरुद्ध चालणारा असा असतो. नेपच्यूनही अशुभ ग्रह असून एका राशींत १३॥। वर्षें असतो. असो. चंद्र, बुध, गुरु, शुक्र हे शुभग्रह आहेत व रवि, मंगळ, शनि, राहु व केतु हे पापग्रह आहेत. शुभ ग्रहांचीं शुभ फळें व अशुभ ग्रहांचीं अशुभ फळें समजावीं. शिवाय रवि मंगळ हे क्रूर ग्रह मानिलेले आहेत. हे अनिष्ट असतील तेव्हां मनुष्याची हानि करितात. बुध शुभग्रहांबरोबर असतां शुभ फळ देतो आणि अशुभ ग्रहांबरोबर असतां अशुभ फळ देतो. पापग्रह उच्चीचे किंवा स्वक्षेत्रीं असतां सौम्य होतात व शुभ फल देतात.

**ग्रहांच्या प्रकृति**—सूर्य, मंगळ, गुरु हे पुरुषप्रकृति ग्रह; शुक्र, चंद्र हे स्त्रीप्रकृति ग्रह आणि बुध शनि हे नपुंसक ग्रह होत.

**ग्रहांचे कालावयव**—रवि हा आत्मा, चंद्र मन, मंगळ सत्व, बुध वाचा, गुरु हा जीव, शुक्र काम आणि शनि हें दुःख याप्रमाणें बृहज्जातकांत सांगितलेलें आहे. वेदामध्येंही अशीच कल्पना केलेली आहे. ऋग्वेद सौरसूक्तांत 'सूर्य आत्मा जगतः' असें सूर्याविषयीं आणि पुरुषसूक्तांत 'चंद्रमा मनसो जातः' असें चंद्राविषयीं म्हटलेलें सुप्रख्यात माहीत आहेच.

**ग्रहांचे स्वभाव**—रवि, स्थिर; चंद्र, चंचल; मंगळ, उग्र; बुध, मिश्र; गुरु, क्षिप्र; शुक्र, मृदु; शनि, दारुण; याप्रमाणें ग्रहांचे स्वभाव आहेत. हे ग्रहांचे स्वभाव ग्र जे अवयवरूप ग्रह कल्पिले आहेत त्यांच्या स्थितीला अनुरूप आहेत.

**ग्रहांच्या जाती**—गुरु शुक्र ब्राह्मण, रवि मंगळ क्षत्रिय, चंद्र बुध वैश्य, शनि अंत्यज आणि राहु केतु मातंग याप्रमाणें ग्रहांच्या जाती आहेत.

**ग्रहांचीं तत्वें**—रविमंगळ अग्नितत्व, चंद्रशुक्र जलतत्व, बुध भूमितत्व, गुरु आकाशतत्व आणि शनि वायुतत्व याप्रमाणें ग्रहांचीं तत्वें ठरविलेलीं आहेत.

**ग्रहांचे वर्ण**—सूर्याचा आरक्त किंवा काळसर वर्ण, चंद्राचा गौरवर्ण, मंगळाचा तांबूस, बुधाचा सांवळा, गुरूचा गोरा, शुक्राचा शुभ्र किंवा सांवळा आणि शनीचा काळा याप्रमाणें ग्रहांचे रंग समजावे.

**ग्रहांचे गुण**—सूर्य, चंद्र, गुरु हे सत्वगुणी, बुध, शुक्र रजोगुणी, मंगळ, शनी तमोगुणी याप्रमाणें ग्रहांचे गुण जाणावे.

ग्रहांचीं लक्षणें—वाटोळा व मध्यम बांधा, अस्पष्ट वाचा, पित्तप्रकृति, पिंगट नेत्र व अल्पकेश हीं सूर्याचीं लक्षणें; ठेंगणा व देखणा बांधा, मधुर वाचा, समरस, सौम्यदृष्टि, वातकफप्रकृति, हीं चंद्राचीं लक्षणें, क्रूरदृष्टि, पित्तप्रकृति, उदार, गुप्त रीतीनें कार्य करणारा, चपळ, पराक्रमी व तामसी हीं मंगळाचीं लक्षणें, सदा हसतमुख, वातपित्तकफ हीं सारखीं, बुद्धिवान्, सांदभाषण हीं बुधाचीं लक्षणं, जड शरीर, पिंगट केश, घारे किंवा पिंगट डोळे, विद्वान्, मंत्रकर्ता व वाचण्याची हौस हीं गुरूचीं लक्षणें, सुखी, तेजस्वी, उत्तम नेत्र, कफप्रकृति, कुरळे व काळे केश, हीं शुक्राचीं लक्षणं, आळशी, घारे डोळे, कृश, उंच, राठ व लांब केश, मोठे दांत, वातप्रकृति, दार्घ अवयव हीं शनीचीं लक्षणें, याप्रमाणें हीं ग्रहांचीं लक्षणें आहेत हीं लक्षणं विशेषत ते ते ग्रह लग्नीं किंवा लग्नस्वामीनें युक्त किंवा नवांशीं असता अनुभवास येतात

## ग्रहांचीं उच्चनीचस्थानें.

मेषो वृषस्तथा नक्र कन्याकर्कझपास्तुला ।
सूर्यादीनां क्रमादेते कथिता उच्चराशय ॥ १४ ॥
सूर्यादीनां क्रमान्नीचं स्वोच्चभाच्चं च सप्तमम् ।
राहोस्तु कन्यका गेहं मिथुनं स्वोच्चभं स्मृतम् ॥ १५ ॥

मेषराशीस रवि असला म्हणजे तो उच्चीचा आहे असें म्हणतात तसेंच, वृषभराशीला चंद्र मकरेचा मंगळ, कन्येचा बुध, कर्कचा गुरु, मीनराशीचा शुक्र व तूळेचा शनि याप्रमाण ग्रहांचीं उच्चस्थानें जाणावीं कोणत्याही ग्रहाच्या उच्च राशीपासून सातवी रास ती त्या ग्रहाचें नीचस्थान होय उदाहरणार्थ, मेषराशीचा रवि असता तो उच्चीचा, असें वर लिहिलें आहे आणि मेषापासून सातवी रास तूळ आहे म्हणून तूळेचा रवि असता तो नीचीचा आहे असें समजावें याप्रमाणें, वृश्चिकेचा चंद्र, कर्कचा मंगळ, मीनेचा बुध, मकरेचा गुरु, कन्येचा शुक्र आणि मेषराशीचा शनि हीं ग्रहांचीं नीच स्थानें जाणावीं राहूचें स्वगृह कन्या, उच्चस्थान मिथुन व नीचस्थान धन आहे तसेंच, केतूचें स्वगृह मीन, उच्चस्थान धन व नीचस्थान मिथुन आहे रवि मेष राशीच्या १० अंशांत असला म्हणजे तो परम उच्च व तूळ राशीच्या १० अंशांत असतां परम नीच समजावा याप्रमाणे कोणता ग्रह कोणत्या राशीस किती अंशांत असतां परम उच्च व नीच समजावा हे खालील कोष्टकावरून ध्यानीं येईल उच्चीचे ग्रह शुभफलदायक व परमोच्च त्याहून अधिक शुभफल देणारे असतात, तथापि ते स्वगृहींच्या ग्रहाहून अधिक शुभ आहेत असें मात्र समजू नये नीच ग्रह असतां निर्बली व परम नीच असतां निष्फल जाणावे

| ग्रह | रवि | चंद्र | मगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उच्च | मेष | वृषभ | मकर | कन्या | कर्क | मीन | तूळ |
| परमोच्चांश | १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० |
| नीच | तूळ | वृश्चिक | कर्क | मी | मकर | कन्या | मेष |
| परमनीचांश | १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० |

हीं ग्रहांचीं उच्चनीच स्थानें (राशी) कोणत्या तत्वावर ठरलीं आहेत हें सम-
जत नाहीं. तथापि अनुमानानें असें वाटतें कीं, कोणताही ग्रह पृथ्वीजवळ आल्या-
मुळें किंवा सूर्याच्या दूरत्वामुळें त्याचें तेज पृथ्वीवर अधिक पडूं लागलें, आणि
पृथ्वीवरील मनुष्यादिकांशीं त्याचा अधिक संबंध पोंचूं लागला म्हणजे तो ग्रह
उच्चीचा, असें कल्पिलेलें असावें. आणि याच्या उलट स्थिति असली, म्हणजे
कोणत्याही कारणानें ग्रह तेजोहीन होऊन पृथ्वीवरील वस्तुमात्रावर त्याचा कमी
प्रभाव असला म्हणजे तो ग्रह नीचावस्थेचा अशी समजूत झाली असावी.

ग्रहांच्या अवस्था—कोणताही ग्रह उच्चीचा असतां त्यास दीप्त म्हणतात व
नीचीचा असतां दीन म्हणतात. ग्रह स्वक्षेत्रीं असतां स्वस्थ म्हणतात; मित्रक्षेत्रीं
असतां मुदित किंवा हर्षित म्हणतात; पूर्णउदित ग्रह असतां त्याला शक्त
म्हणतात आणि अस्तंगत असतां विकल म्हणतात. तसेंच, शुभग्रह पापग्रहानें
युक्त असतां खलग्रह आणि पापग्रहानें विद्ध असतां पीडित म्हणतात. शुभ-
ग्रहाचे षड्वर्गांत ग्रह असतां त्याला शांत म्हणतात. तसेंच, समराशीच्या
पहिल्या सहा अंशांत कोणताही ग्रह असतां त्याला बाल म्हणावें. ६ अंशां-
पासून १२ अंशांपर्यंत असतां कुमार, १२ अंशांपासून १८ अंशांपर्यंत युवा,
१८ अंशांपासून २४ अंशांपर्यंत वृद्ध, आणि २४ अंशांपासून ३० अंशांपर्यंत
असतां मृत म्हणावें. विषमराशींत याच्या उलट स्थिति असते. म्हणजे
पहिल्या ६ अंशांत मृत, ६ पासून १२ पर्यंत वृद्ध, १२ पासून १८ पर्यंत युवा,
१८ ते २४ कुमार आणि २४ अंशांपासून ३० अंशांपर्यंत बाल म्हणावें.

ग्रहांचें कर्तृत्व—ज्याप्रमाणें ग्रह इष्ट किंवा अनिष्ट असेल त्याप्रमाणें ग्रहांचीं
पुढील इष्टानिष्ट फलें अनुभवास येतील असें जाणावें. रवि—पितृसुखदुःख,
शरीरसुख, पुण्याई, मनाची रुचि, वैद्यशास्त्रज्ञान इत्यादि गोष्टी रवीच्या योगानें
प्राप्त होतात. चंद्र—मातृसुखदुःख, यशप्राप्ति, शरीरकांति, सौंदर्य, ज्योतिष
इत्यादि गोष्टी चंद्राच्या योगानें प्राप्त होतात. मंगळ—मित्रसुख, पराक्रम,
कीर्ति, साहसी स्वभाव, धनुर्विद्या, शस्त्रक्रिया इत्यादि गोष्टी मंगळापासून होतात.
बुध—पुत्रसुखदुःख, मातुलसुख, गणित, वेदांत, शिल्पशास्त्र, ग्रंथलेखन, वक्तृत्व
ही बुधापासून प्राप्त होतात गुरु—भ्रातृसुख, संपत्ति, बहुविध विद्वत्ता, कार-

स्थान, व्याकरण, ह्या गोष्टी गुरूपासून होतात. शुक्र—स्त्रीसुख, गायन, वक्तृत्व, कांति, कलाकौशल्य व विषयसुख हीं शुक्रापासून मिळतात. शनि—नीचविद्या, नोकर चाकरांचें सुखदु:ख, निर्दयी व घातक स्वभाव, दारिद्र्य, मृत्यु, कारागृहवास हीं शनीपासून प्राप्त होतात. राहूपासून गारुडी विद्या व केतूपासून गुप्त मंत्रतंत्र हीं प्राप्त होतात.

स्थानबली, दिग्बली व कर्तरी ग्रह—स्वक्षेत्रीं, उच्चराशींत, मित्रक्षेत्रीं, त्रिकोणांत ग्रह असतां तो स्थानबली म्हणावा. बुध गुरु पूर्वेस म्हणजे कुंडलींत प्रथमस्थानीं, सूर्यमंगळ दक्षिणेस म्हणजे दशमस्थानीं, शनि पश्चिमेस म्हणजे सप्तमस्थानीं व चंद्रशुक्र उत्तरेस म्हणजे कुंडलींत चतुर्थस्थानीं, याप्रमाणें ग्रह असतां ते दिग्बली ग्रह म्हणावे. कोणत्याही ग्रहाच्या मागील व पुढील स्थानीं ग्रह असतां मधला ग्रह हा मागील व पुढील अशा दोन ग्रहांच्या कर्तरींत आहे, असें म्हणतात.

## ग्रहांचें शत्रुत्व, मित्रत्व व समत्व.

रवेः सखायो गुरुभौमचंद्राः, शत्रू सितार्की, च बुधः समः स्यात् ।
विधोर्न शत्रुः, सुहृदौ रविज्ञौ, शनीज्यभौमोशनसः समाः स्युः ॥ १६ ॥
ज्ञोऽरिः, कुजस्यार्कहिमांशुजीवा मित्राणि, मंदोशनसौ समौ च ।
ज्ञस्यार्कशुक्रौ सुहृदौ, कुजेज्यमंदाः समाः स्युस्तु रिपुर्हिमांशुः ॥ १७ ॥
गुरोरिपू शुक्रबुधौ, सखायो रवींदुभौमास्तु, शनिः समः स्यात् ।
भृगोः सखायौ शनिचंद्रपुत्रौ, शत्रू रवींदू, च समौ कुजेज्यौ ॥ १८ ॥
मंदस्य शुक्रबुधसुतौ सखायौ, गुरुः समोर्केंदुकुजास्तु नेष्टाः ।
राहोः सखायो बुधमंदशुक्रा गुरुः समोर्केंदुकुजास्तु नेष्टाः ॥ १९ ॥

मागें दुसऱ्या प्रकरणांत ग्रहांचें शत्रुमित्रत्वाचें कोष्टक जरी दिलें आहे तरी सौकर्यास्तव तें पुनः येथें देतों. शिवाय राहूच्या शत्रुमित्रत्वासंबंधी तेथें कांहींच सांगितलें नाहीं तेंही येथें सांगतों. ह्यांतेरीज येथें आधारभूत घेतलेलीं पद्येंही भिन्न आहेत.

| | मित्र. | शत्रु. | सम. | | मित्र. | शत्रु. | सम. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि.. | गु.मं.चं | शनि, शुक्र. | बुध | गुरु... | र.च मं. | बुध, शुक्र, | शनि. |
| चंद्र... | सू.बु. | राहु. | मं.गु शु.श. | शुक्र... | श. बु | रवि, चंद्र. | म.गु. |
| मंगळ... | र च गु. | बुध. | शु. श. | शनि... | शु.बु. | रवि,चंद्र,मं. | गुरु. |
| बुध... | र. शु | चंद्र. | मं. गु श. | राहु... | श बु शु. | रवि.चं मं. | गुरु. |

केतूचे शत्रुमित्र राहुप्रमाणेंच समजावे.

शत्रुत्व किंवा मित्रत्व याचा व्यावहारिक अर्थ उघडच आहे तेव्हां त्याविषयीं लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं. समत्व याचा अर्थ औदासिन्य. अर्थात् शत्रु

त्रही नव्हे आणि मित्रत्वही नव्हे. अशी स्थिति असण्याचें कारण असें आहे कीं, चंद्र सूर्य खेरीज करून जे इतर ग्रह दोन दोन राशींचे स्वामी आहेत, ते एका राशीच्या स्वामित्वाचे वेळीं कधीं मित्र असतात आणि दुसऱ्या राशीच्या स्वामित्वाचे वेळीं तेच शत्रु असतात. परंतु अशा वेळीं पहिला ग्रह दुसऱ्याशीं शत्रुभाव किंवा मित्रभाव न दाखवितां केवळ उदासीन राहतो असें मानिलेलें आहे. यालाच समत्व म्हणतात. ग्रहांचें शत्रुमित्रत्व कसें पहावें याविषयीं अधिक स्पष्टीकरण मागें दिलेंच आहे.

## ग्रहांच्या दृष्टि.

पादेक्षदृष्टिर्दशमे तृतीये द्विपाददृष्टिर्नवपंचमे वा ।
त्रिपाददृष्टिश्चतुरष्टमे च संपूर्णदृष्टिः समसप्तमे च ।
त्रिं कॅमं, धींधर्मं, चतुर्गजेषु पश्यंति पूर्णं शनीजीवभौमाः ॥ २० ॥

शनीवांचून इतर कोणताही ग्रह स्वस्थानापासून तिसऱ्या व दहाव्या स्थानावर $\frac{1}{4}$ दृष्टीनें पाहतो. गुरूवांचून इतर कोणताही ग्रह स्वस्थानापासून पांचव्या व नवव्या स्थानावर $\frac{1}{2}$ दृष्टीनें पाहतो. मंगळावांचून इतर कोणताही ग्रह स्वस्थानापासून चवथ्या व आठव्या स्थानावर $\frac{3}{4}$ दृष्टीनें पाहतो. आणि सर्व ग्रह स्वस्थानापासून सातव्या स्थानावर संपूर्ण दृष्टीनें पाहतात. त्याशिवाय जे वहिर्वर्ती ग्रह आहेत त्यांचीं विशेष दृष्टिस्थानें आहेत. जसें, शनि स्वस्थानापासून तिसऱ्या व दहाव्या स्थानांवर, गुरु पांचव्या व नवव्या स्थानांवर आणि मंगळ चवथ्या व आठव्या स्थानांवर संपूर्ण दृष्टीनें पाहतात. म्हणून शनीला एकपाद $\frac{1}{4}$ दृष्टि नाहीं, गुरूला द्विपाद $\frac{1}{2}$ दृष्टि नाहीं आणि मंगळाला त्रिपाद $\frac{3}{4}$ दृष्टि नाहीं, असें जाणावें.

## ग्रहांचें राशींमध्यें वास्तव्य.

मासं शुक्रबुधादित्याः, सार्द्धमासं तु मंगलः ।
त्रयोदशान् गुरुश्चैव सपादद्विदिनं शशी ॥ २१ ॥
राहुरष्टादशान्मासान् त्रिंशन्मासान् शनैश्चरः ।
राहुवत्केतुरुक्तस्तु राशिभोगाः प्रकीर्तिताः ॥ २२ ॥

प्रत्येक राशींत रवि, बुध व शुक्र हे सुमारें एक महिनापर्यंत, चंद्र सवादोन दिवस, मंगळ दीडमासपर्यंत, गुरु तेरा महिने, शनि ३० महिने म्हणजे अडीच वर्षें आणि राहु व केतु अठरा महिनेपर्यंत राहतात. हर्शल ७ वर्षें व नेपच्यून सुमारें १३॥। वर्षें प्रत्येक राशीवर असतो.

## फलें पहाण्याचे स्थूल नियम.

कुंडलींतील ग्रहांचीं फलें सांगतांना पुढें सांगितलेले साधारण नियम ध्यानांत ठेवावे. कोणत्याही स्थानाचा स्वामी शुभग्रह असेल, किंवा स्वक्षेत्रीं, मित्रक्षेत्रीं, आपल्या

उच्चराशींत, केंद्रांत अथवा त्रिकोणांत असेल आणि पापग्रहाची त्यावर दृष्टि नसेल किंवा पापग्रहांनीं युक्त नसेल तर ज्या स्थानाचा तो स्वामी असेल त्या स्थानासंबंधीं तो शुभफल देईल असें समजावें. कोणत्याही स्थानाचे स्वामी परस्परांस पहात असतील किंवा परस्परांच्या स्थानीं असतील तर त्या भावासंबंधींही शुभफल मिळेल असें जाणावें. कोणताही पापग्रह जर स्वस्थानीं, मित्रगृहांत, आपल्या उच्चराशीस किंवा शुभग्रहाच्या राशीस असेल तर तो शुभफलदायक होतो. कोणत्याही स्थानाचा स्वामी जर स्वस्थानापासून १।४।७।१०।५।९ या स्थानीं असेल तरीही, ज्या स्थानाचा तो स्वामी असेल, त्या स्थानासंबंधीं शुभफल मिळेल. कोणत्याही स्थानाचा स्वामी पापग्रह असेल, पापग्रहानें युक्त असेल किंवा दृष्ट असेल, किंवा शुभग्रह असूनही नीचस्थानीं असेल, शत्रुक्षेत्रांत असेल, किंवा लग्नापासून अथवा स्वस्थानापासून ६।८।१२ या स्थानीं असेल तर त्या स्थानासंबंधीं अशुभफल मिळेल. तात्पर्य, ह्या रीतीनें सारासारविचार करून फलनिर्णय करावा. गुरु ज्या स्थानीं असतो त्या स्थानाची हानि करतो परंतु तोच स्वगृहींचा असेल तर मात्र नाश करीत नाहीं. ज्या स्थानावर गुरूची दृष्टि असेल त्या स्थानांची तो वृद्धि करितो. तसेंच, शनि ज्या स्थानीं असतो त्याची वृद्धि करितो आणि ज्या स्थानावर पहातो त्याचा नाश करितो; परंतु स्वगृहावर पहात असेल तर मात्र अशुभफल देत नाहीं. मंगळही याप्रमाणें शुभाशुभ जाणावा. पापग्रह उपचयस्थानीं असतां बलवान् जाणावे. तिसऱ्या किंवा अकराव्या स्थानीं असणारा कोणताही ग्रह बलिष्ठ समजावा. कोणताही ग्रह त्रिकस्थानीं निर्बल होय. बलवान् ग्रह आपल्या महादशेंत शुभफल देतात. सारांश, कोणत्याही भावाचें फल सांगतांना, त्या भावाच्या सप्तमांत कोणते ग्रह आहेत, त्या भावाचा स्वामी शत्रुक्षेत्रीं किंवा मित्रक्षेत्रीं आहे, उच्चीचा आहे कीं नीचीचा आहे, शुभग्रहांनीं किंवा पापग्रहांनीं युक्त आहे, किंवा दोन पापग्रहांच्या कर्तरींत आहे, किंवा अन्योन्य क्षेत्रसंबंध आहे कीं काय, म्हणजे मेषराशीचा स्वामी सिंहराशींत व सिंहराशीचा स्वामी मेषराशींत (हा योग शुभ आहे) इत्यादि गोष्टींचा विचार करून फलें सांगावीं. फलें सांगतां येणें ही गोष्ट केवळ अनुभवाची आहे हें मागें लिहिलेंच आहे. म्हणून सर्व योगांचीं फलें कोणत्याही मोठ्या ग्रंथांत सुद्धां लिहिलेलीं असतील असें समजूं नये. तीं केवळ आपल्या बुद्धिबलानेंच ठरविलीं पाहिजेत. तथापि विषयाची दिशा समजून तत्संबंधीं कांहीं विचार ठरवितां यावे म्हणून तन्वादि द्वादशभावांचीं आतां सामान्य फलें सांगतों.

## द्वादशभावांचीं फलें.

१ तनुस्थान—लग्नस्वामी शुभग्रह असून केंद्रीं, मित्र क्षेत्रीं, उच्चीचा, शुभ-

ग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल व त्यावर पापग्रहाची दृष्टि नसेल किंवा तो पापग्रहाचे राशीस नसेल तर मनुष्य सत्वगुणी, सुरूप, विद्वान्, धनी व निरोगी होईल. लग्नस्वामी कुंडलींत कोठेही नीचीचा, पापग्रहयुक्त किंवा शत्रुक्षेत्रीं असतां अंतर्गळादि गुह्यविकार उद्भवतात. लग्नीं चंद्र असतां मनुष्य रोगट असतो. जन्मलग्नकुंडलीमध्यें कोणताही क्रूर किंवा पापग्रह आपल्या शत्रुगृहीं असेल तर व्रण उत्पन्न होतात. रवियुक्त मंगळ, पापग्रहयुक्त मंगळ किंवा समोरासमोर परस्पराच्या सप्तमांत रविमंगळ निर्बळ असतां तोंडावर देवीचे व्रण राहतात, व अनेक तीळ अंगावर असतात. लग्नस्वामीवर दोन किंवा तीन शुभग्रहांची दृष्टि असतां मनुष्य शत्रुहीन आणि दीर्घायु होतो. रविमंगळाच्या योगापासून किंवा लग्नीं राहु, चंद्रावर शनिमंगळाची दृष्टि यापासून रक्तदोष उद्भवतात. जन्मलग्नीं बुधचंद्रयोग असतां मनुष्य शास्त्रप्रवीण असतो. तसेंच, चंद्र शुभस्थानीं व शुभग्रहांनीं दृष्ट असतां मनुष्य शांतस्वभावाचा निपजतो. रविचंद्र एकत्र असतां किंवा शनिमंगळ समोरासमोर असतां पाण्यांत बुडण्याचा अपघात होतो. मिथुन, सिंह, धन आणि कुंभ या लग्नीं जन्म असून ३।६।८।१२ या स्थानीं शनि चंद्र असतां उदराचे विकार उद्भवतात. रविमंगळ समोरासमोर सप्तमांत असतां वातरोग उद्भवतात. जन्मलग्नावर गुरुशुक्राची पूर्ण दृष्टि असतां मनुष्य वाटोळ्या तोंडाचा, सुरूप, पुण्यशील व दुसऱ्यावर आपली छाप बसविणारा होतो. लग्नीं उच्चीचा बुधगुरु किंवा शुक्र असतां अतुल विद्या आणि धन हीं प्राप्त होतात. लग्नाचा स्वामी षष्ठ, अष्टम व द्वादशस्थानीं असेल तर मनुष्य अंतीं निर्धन होतो. लग्नावर मंगळाची दृष्टि असेल तर मनुष्य अत्यंत मत्सरी होतो. लग्नीं शनि राहु (उच्चीचे, मित्रक्षेत्रींचे व स्वगृहींचे खेरीज करून) असतां किंवा लग्नावर त्यांची दृष्टि असतां मनुष्य व्यंग असतो. लग्नाधिपति अथवा चंद्र ज्या स्थानीं असेल त्या स्थानचा स्वामी त्रिक म्हणजे ६।८।१२ या स्थानीं असतां मनुष्य पातुलदेही असतो. लग्नेश लग्नीं असतां मनुष्य निरोगी, स्वेच्छाचारी, व पराक्रमी होऊन त्याला द्विभार्यायोग घडतो. लग्नस्वामी द्वितीय भुवनीं असतां धनाची चिंता; तृतीय स्थानीं असतां अत्यंत पराक्रमी, सुसंपन्न, व अनेक स्त्रियांशीं रत असणारा, चतुर्थस्थानीं असतां मातृसुख व गुणरूपयुक्त, पंचमस्थानीं असतां मध्यमपुत्रसुख व प्रथम अपत्याला भय; षष्ठांत असतां रोगी; सप्तमांत असतां स्त्रीला क्लेश, विरक्त, प्रवासी व निर्धन; अष्टमांत असतां कुकर्मी; नवमस्थानीं असतां भाग्यवंत; दशमस्थानीं असतां पितृसुख व राजमान; एकादश स्थानीं असतां सुखी, मानी व धर्मशास्त्रवेत्ता आणि द्वादशस्थानीं असतां जुगारी [redacted] कुमार्गी होईल असें जाणावें. वृषभ, कर्क, किंवा मीन लग्नीं जन्म असून कुंडलींत शनि चंद्र पापग्रहयुक्त असतां तो मनुष्य कुबडा होतो. शनि व मंगळ या दोन ग्रहांनीं युक्त,

कुंडलीत कोठें निर्बली रवि असेल तर कुष्ट उत्पन्न होतें. लग्नेश, बुध, मंगळ किंवा चंद्र हे कोठेंही राहुकेतुयुक्त असतां श्वेतकुष्ठ होतें. लग्नाधिपति व सूर्य ६।८।१२ या स्थानीं असतां गंडरोग होतो. लग्नीं चंद्र असतां विलासी व उधळ्या होतो. सप्तमांत निर्बली शनि असतां मूर्ख निपजतो. लग्नीं बुध व सप्तमांत गुरु असतां सदा हंसत बोलणारा होतो. मेषेचा चंद्र लग्नीं असतां मुखरोगानें तोंडास दुर्गंधी येते. उच्चीचे ग्रह केंद्रीं म्हणजे १।४।७।१० या स्थानीं असतां दीप्तनामक योग होऊन मनुष्य अति श्रीमान् होतो. लग्नस्वामी चतुर्थस्थानीं असतां विद्वान् व षष्ठस्थानीं असतां हतवीर्य होतो. लग्नेश शुभग्रह असून त्याची पूर्णचंद्रावर दृष्टि असेल तर धन व कीर्ति हीं मिळतात. लग्नावर लग्नेश पूर्ण दृष्टीनें पाहील अथवा लग्नेश परमोच्चांशामध्यें असून सप्तमेशाची त्याजवर दृष्टि असेल किंवा सप्तमेशानें युक्त असेल किंवा सप्तमेश स्वगृहीं, उच्चीचा किंवा स्वगृहाला पाहत असेल किंवा केंद्रीं सर्व शुभग्रह असतील तर सौभाग्ययोग होतो. सर्व प्रकारें मनुष्याला सुखी ठेवितो. लग्नीं चंद्र असून पापग्रहांनीं दृष्ट असेल तर मनुष्य रोगी होतो. लग्नीं शनिराहु असतां मनुष्य भांग, गांजा इत्यादि व्यसनांनीं युक्त असतो. जुळ्या भावंडांच्या कुंडलींत धन, कन्या, मिथुन किंवा मीन लग्न असून लग्नीं बहुधा राहु असतो. तनुस्थानीं बुधगुरुशुक्र हे तीन ग्रह रवियुक्त असतां महान् भगवद्भक्त होतो. आतां तनुस्थानस्थित सूर्यादिग्रहांचीं फलें सांगतों हीं फलें ते ते ग्रह त्या स्थानीं किंवा त्या स्थानाचे स्वामी असतां प्रायः सारखींच अनुभवास येतात. तनुस्थानीं म्हणजे लग्नीं सूर्य असतां आळशी, रागीट, शरीरानें चिप्पाड, विषयी व निर्दय असतो. लग्नीं चंद्र असतां उन्मत्त, हृद्रोग, विलासी व रोगी असतो. मेष, वृषभ व कर्क लग्नीं जन्म असून लग्नीं चंद्र असतां सुंदर व गुणी असतो. लग्नीं मंगळ असतां शरीरावर व्रण, भ्रमिष्ट, भटकणारा व साहसी असतो. लग्नीं बुध असतां शांत, नम्र, उदार, सदाचरणी, विद्वान् व पुत्रवान् असतो. लग्नीं गुरु असतां बुद्धिमान्, लोकप्रिय, उपकारी व सुंदर असतो. लग्नीं शुक्र असतां कलाकुशल, सुंदर, लोकमान्य व विषयी असतो. लग्नीं स्वगृहींचा किंवा बलवान् शनि असतां तो पुरुष उंच, सदृढ व धार्मिक असून फार श्रीमंत असतो. ह्या व्यतिरिक्त शनि असतां मनुष्याला निर्धन, अमंगल व रोगी करितो. लग्नीं राहु असतां तो पुरुष दुष्टबुद्धि, लोकांला फसविणारा, मस्तकशूल असलेला व विषयी असतो. लग्नीं केतु असतां रोगी, मिश्र, उद्वेगी व स्त्रीचिंता असणारा असतो. वर जीं सूर्यादि ग्रहांचीं फलें सांगितलीं आहेत, तीं ते ते ग्रह उच्चीचे व बलवान् असतां मात्र पूर्ण अनुभवास येतात. स्वक्षेत्रीं व मित्रक्षेत्रीं असतां अर्धीं फलें व शत्रुक्षेत्रीं असतां चतुर्थांश फलें मिळतात. आणि ग्रह अस्तंगत असतां निष्फल होत असें जाणावें.

२ धनस्थान—जन्मकाळीं धनस्थानीं सूर्य, मंगळ, शनि किंवा क्षीणचंद्र हे ग्रह असतील तर तो मनुष्य धनहीन होतो. धनस्थानीं सूर्य असतां संपत्ति मिळते परंतु त्यावर शनीची दृष्टि नसावी. धनस्थानीं गुरु किंवा शुक्र असणें हा श्रीमंतीचा योग आहे. धनस्थानीं बुध किंवा चंद्र असतांही संपत्तिलाभ होतो परंतु चंद्राची दृष्टि बुधावर किंवा बुधाची दृष्टि चंद्रावर असतां संपत्तिनाश होतो. धनस्थानीं चंद्र मंगळ असून तेथें शनीची दृष्टि असेल तर त्या मनुष्याला नेत्रविकार होतो. चंद्रानें युक्त किंवा सूर्यानें युक्त शुक्र व लग्नेश किंवा चंद्रमंगळशनि हे ६।८।१२ या स्थानीं असतील तरीही नेत्रविकार होतो. धनस्थानीं शनि असून त्यावर बुधाची दृष्टि असणें हा योग धनदायक आहे. धनस्थानीं चंद्र किंवा शुक्र पापग्रहानें युक्त किंवा दृष्ट असतां तो पुरुष बहुत कामी व परस्त्रीरत होतो. मकर किंवा कुंभ लग्नीं मंगळबुध असून त्यावर सूर्याची दृष्टि असतां तो पुरुष विनोदी होतो व मोठमोठ्या लोकांस हंसवून तृप्त करितो. धनभुवनीं राहुयुक्त असतां मनुष्य द्रव्यसंग्रही होतो परंतु त्याच ठिकाणीं केतु कोणत्याही पापग्रहानें युक्त असतां दरिद्री होतो. धनस्थानीं रवि, बुध, गुरु किंवा शुक्र असतां वक्ता होतो, परंतु तेथेंच मंगळ, शनि राहु इत्यादि पापग्रह शत्रुक्षेत्रींचे किंवा नीचींचे असतां मनुष्य तोतरा होतो किंवा वाणीमध्यें दुसरा कांहीं दोष असतो. धनेश पापग्रह असून ६।८।१२ या स्थानीं असतां वाणीमध्यें मोठाच दोष असतो. द्वितीयस्थानाचा स्वामी शुभग्रह असून लग्नीं असतां धनवान्; द्वितीयस्थानीं असतां द्विभार्यायोग; तृतीयस्थानीं असतां स्वपराक्रमानें द्रव्यार्जन करणारा; चतुर्थस्थानीं असतां परस्त्रीरत, लोभी व नास्तिक; पंचमस्थानीं असतां विद्वान् व संततिवान्; षष्ठांत असतां गुह्यरोगी, शत्रूची पीडा; सप्तमांत असतां स्त्रीसुखाचा नाश; अष्टमस्थानीं असतां भूमिलाभ, व ज्येष्ठ सहोदरांचें व स्त्रीचें सुख अल्प; नवमांत असतां उद्योगी व श्रीमंत; दशमस्थानीं असतां पंडित, अभिमानी, कामी व अल्प संततिवान्; एकादशस्थानीं असतां श्रीमंत आणि द्वादशस्थानीं असतां निर्धन होईल असें जाणावें. राहु किंवा सूर्य यांनीं युक्त द्वितीयस्थानीं नीचींचा शुक्र असेल तर मनुष्यास कुटुंबापासून सुख मिळत नाहीं. धनस्थानाचा किंवा भाग्याचा अधिपति भाग्यांत, केंद्रांत किंवा त्रिकोणांत, किंवा लग्नेश शुभग्रह असून लाभस्थानीं व तसाच लाभेश भाग्यस्थानीं किंवा केंद्राधिपति भाग्यांत किंवा लाभांत असणें हे सर्व योग श्रीमंतीचे आहेत. धनस्थानीं रवि असतां मनुष्य निर्धन व बुद्धिहीन होतो. धनस्थानीं चंद्र असतां सुखी, नम्र व पुत्रवान् होतो. मंगळ असतां धनहीन, कुसंगतिप्रिय, व नास्तिक होतो. धनस्थानीं बुध असतां सुशील, चतुर, सुखी व कीर्तिमान् होतो. धनस्थानीं गुरु असतां सुंदर, विद्यागुणकीर्तियुक्त, वैर न करणारा, सुशील व संपत्तिमान् होतो. धनस्थानीं

शुक्र असतां अनेक विद्यापरिपूर्ण, वक्ता व निरंतर पशुवाहनादिकांचा उपभोग घेणारा होतो. शनि असतां परगृहीं वास करणारा, व्यसनयुक्त, देशांतर करणारा व राजमान्य होतो. राहु असतां गुप्तगोष्टींचा स्फोट करणारा व भटकणारा होतो. द्वितीयस्थानीं स्वगृहींचा, शुभग्रहाचे क्षेत्रीं किंवा बलवान् केतु असतां अत्यंत सौख्य मिळतें. तशी स्थिति नसतां केतूच्या योगानें कुटुंबविरोध, धननाश किंवा मुखरोग होतो.

३ सहजस्थान—तृतीयस्थानाला पराक्रमस्थान म्हणतात. तृतीयस्थानीं जितके अधिक शुभग्रह असतील तितका मनुष्य अधिक पराक्रमी, दैवशाली व परोपकारी होतो. तृतीयस्थानीं चंद्र असतां श्रीमंत व मंगळ असतां पराक्रमी, युक्ति प्रयुक्तीनें द्रव्य संपादन करणारा परंतु शीघ्रकोपी होतो. चंद्रमंगळाची जोडी ३।५।९।११ या स्थानीं असते तो पुरुष बहुगुणी असतो. तृतीयस्थानीं मंगळ, शनि आदिकरून पापग्रह असतील किंवा त्या स्थानाचा स्वामी पापग्रहानेंयुक्त किंवा दृष्ट असेल किंवा त्या स्थानापासून ६।८।१२ या स्थानीं असेल तर बंधुभगिनीचें सौख्य फारच अल्प असतें. परंतु तृतीयस्थानाचा स्वामी स्वगृहीं, मित्रक्षेत्रीं किंवा गुरुशुक्रानें दृष्ट किंवा युक्त किंवा उच्चीचा असतां बंधुसौख्य होईल. तृतीयाधिपति धनभवनीं आणि धनाधिपति तृतीयस्थानीं असा अन्योन्य क्षेत्रसंबंध किंवा तृतीय आणि दशमस्थान यांचा स्वामी एकच असून धनस्थानीं असेल तर तो मनुष्य स्वपराक्रमानें बहुत संपत्ति मिळवील. तृतीयस्थानीं उच्चीचा सौम्य ग्रह असेल तर तो मनुष्य युक्तीनें दुसऱ्या मनुष्यावर आपलें वर्चस्व ठेवील. व तोच उच्चीचा क्रूर ग्रह असेल तर करारी स्वभावानें वर्चस्व राखील व तोंडपूजेपणा करणें निंद्य मानील. तृतीयस्थानीं शनि, षष्ठस्थानीं राहु व दशमांत मंगळ किंवा तृतीयस्थानीं रविमंगळ किंवा शनि हे बलवान् असतील तर मरेन किंवा मारीन असा पुरुष निपजतो. तृतीयस्थानाधिपति शुभग्रह असेल किंवा शुभग्रहानें दृष्ट असेल तर त्या मनुष्याला उपजीविकेचें उत्तम साधन अनायासेंकरून मिळेल. तृतीयस्थानीं तीन पापग्रहांनीं युक्त चंद्र असेल व त्याला कोणताही पापग्रह पाहत नसेल तर भावंडांना अनिष्ट होय. नवमस्थानीं रवि स्वगृहींचा असतांही भावंडांना अनिष्ट होय. तृतीयस्थानाचा मालक स्त्रीग्रह असेल किंवा तृतीयस्थानीं शुक्र किंवा चंद्र हे स्त्रीग्रह असतील तर जन्मणाराला पाठीवर बहिणी अधिक व पुरुषग्रह विषमराशींत असतां भाऊ अधिक असतात. तृतीयस्थानीं जो राशि असेल तत्परिमित किंवा तृतीयेश ज्या राशींत असेल तत्परिमित, किंवा मंगळ ज्या राशींत असेल तत्परिमित भावंडांची संख्या सांगावी. तथापि हा अनुभव अपवादात्मक आहे. तृतीयाधिपति केंद्रीं, उच्चीचा गुरुयुक्त असेल किंवा तृतीयेशापासून पांचव्या किंवा नवव्या स्थानीं मंगळ असेल तर पुष्कळच

भावद होतील. तृतीयस्थानाचा स्वामी लग्नीं असता पराक्रमी, साहसी व स्वच्छंदी, दुसऱ्या स्थानीं असता क्लेशवान्, तिसऱ्या स्थानीं असता पराक्रमी व द्रव्यवान्, चवथ्या स्थानीं असता सुखी, पाचव्यांत असता सुबुद्ध, सहाव्यांत असता भावंडापासून त्रास व मातुलसुखाचा अभाव, सातव्यात असता दु:खी, आठव्यात असता कुकर्मी, नवव्यात असता स्त्रियांपासून द्रव्यलाभ, पिता कुकर्मी व दैन्य दारिद्र्यविणारा, दहाव्यात व अकराव्यात असता धनवान् व पराक्रमी आणि बाराव्यात असता निर्धन होईल असें जाणावें. ज्या पुरुषाच्या तृतीयस्थानीं रवि अथवा मंगळ असेल त्याच्याकडे वडीलपणाचा मान येतो व तो इतर भावंडांपासून विभक्त असतो. शिवाय त्याचीं भावंडे अल्पायुषी असतात. लग्नापासून तृतीयस्थानीं रवि असता तो मनुष्य प्रियभाषण करणारा, उत्तम मनाचा, संपत्तियुक्त, बंधुसौख्यरहित, कणरोगी व बलवान् असतो. तृतीयस्थानीं चंद्र असता मनुष्य गर्विष्ठ, कृपण, निर्भय व निर्दय होतो. तृतीयस्थानीं मंगळ असता पराक्रमी, उदार, धनवान् व बंधुसौख्यरहित असतो. तृतीयस्थानीं बुध असता चतुर, इच्छित कार्य तडीस नेणारा, साहसी, सुखरहित व कुत्सित मनाचा होतो. तृतीयस्थानीं गुरु असता कृपण, कृतघ्न, स्त्रीपुत्र यांची प्रीति असलेला व अग्निमांद्यानें दुर्बळ असतो. तृतीयस्थानीं शुक्र असता शरीरानें कृश, कृपण, अत्यंत विषयासक्त, पाषाणहृदयी व लोभ्या करणारा होतो. तृतीयस्थानीं शनि असता पराक्रमी, लोकप्रिय व त्याच्या कनिष्ठ भावंडाचा नाश होतो. राहु असता यशस्वी, सुखविलास भोगणारा, पराक्रमी, शत्रूपासून कार्यसाधक व बंधुबांधवांचा नाशक होतो. तृतीयस्थानीं केतु असता शत्रुनाश, कलह, धनुनाश, व बाहुपीडा होते. ३।९ ह्या स्थानीं समोरासमोर रविमंगळशनि असता कर्णरोग होतो.

४ सुहृत्स्थान—चतुर्थस्थानाचा स्वामी केंद्रांत, त्रिकोणांत, धनभुवनीं किंवा एकादशांत असता मनुष्य संपत्तिमान् होतो. चतुर्थस्थानेश लग्नस्वामीन किंवा गुरुशुक्रानें युक्त किंवा दृष्ट स्वगृहीं, मित्रक्षेत्रीं, उच्चीचा किंवा पराक्रमस्थानीं असेल किंवा भाग्येश व लग्नस्वामी शुभग्रह असून एकत्र असतील व ६।८।१२ या स्थानीं नसतील किंवा भाग्यभुवनावर म्हणजे नवमस्थानावर भाग्येश किंवा गुरु पूर्ण दृष्टीनें पाहत असेल तर तो मनुष्य स्वपराक्रमानें गृह संपादन करील. चतुर्थस्थानेश नवमाधिपतीनें युक्त असता किंवा चतुर्थस्थानाधिपति लग्नीं किंवा एकादशस्थानीं असून गुरूनें दृष्ट असता किंवा गुरूची चतुर्थस्थानावर पूर्ण दृष्टि असून चतुर्थ स्थानाच्या स्वामीचें व गुरूचें मित्रत्व असता अथवा चंद्र नवव्या स्थानीं व मंगळ एकादशस्थानीं असतां तो मनुष्य राजपूज्य होऊन त्याला जन्मभर इच्छित वाहनादिकांचें सौख्य मिळेल. मंगळ उच्चीचा शुभग्रहांनीं अवलोकित असता किंवा तो चतुर्थस्थानाचा मालक असता त्या मनुष्यास गृहमालकीचा योग होतो.

चतुर्थ स्थानीं चंद्र किंवा चतुर्थस्थानाधिपति गुरुशुक्रांनीं युक्त किंवा अवलोकित असेल तर गाड्याघोडे वगैरे प्राप्त होतात. चतुर्थस्थानाचा स्वामी पूर्णचंद्रानें युक्त असून नवमस्थानाचे स्वामीवर गुरूची दृष्टि असेल तर त्या मनुष्याचे हातून लोकोपयुक्त कृत्यें घडतात. चतुर्थस्थानीं कोणताही निर्बली पापग्रह असेल किंवा चतुर्थस्थानेश शनि, मंगळ किंवा राहु यांनीं युक्त असेल तर त्याच्या मातेला क्लेश होतील. चतुर्थस्थानीं शुभग्रह असेल अथवा चतुर्थस्थानेश शुभग्रहानें युक्त असेल तर त्याला पुष्कळ मातृसुख मिळेल. चतुर्थेश चतुर्थस्थानापासून ६।८।१२ या स्थानीं असतां पितृसुखापेक्षां मातृसुख कमी असतें. चतुर्थ किंवा अष्टमस्थानीं मंगळ असतां मनुष्याला शेतवाडी इत्यादिकांचें वतन असतें. चतुर्थस्थानीं शनि किंवा शनीची दृष्टि असतां प्रायः सापत्नमातेचा योग घडतो. चतुर्थस्थानचा स्वामी लग्नीं असतां फार विद्वान् होऊनही अंगीं सभाधीटपणा असतो. चतुर्थेश द्वितीयस्थानीं असतां कुटुंबी व संपत्तिमान्, तृतीयस्थानीं असतां अपयशी व चिंतातुर, चतुर्थस्थानीं असतां सुखी, पंचमांत असतां देवभक्त आणि सर्वांस प्रिय, सहाव्यांत असतां सापत्नमातेचा योग व कुकर्में करणारा, सातव्यांत असतां विद्वान् व दानशूर, आठव्यांत असतां दुःखी, पंढत्व आणि स्त्री दुःशील, नवव्यांत असतां स्वपराक्रमानें द्रव्यार्जन करून सुख भोगणारा, दहाव्यांत असतां राजपूज्य व अनेक सुखांचा भोक्ता, अकराव्यांत असतां रोगी आणि बाराव्यांत असतां क्लेश भोगणारा होईल. लग्नकुंडलींत चतुर्थस्थानीं पुष्कळ अधिक शुभग्रह असल्यास भाऊबंद सोयरेधायरे इत्यादि बहुत असतात. पण त्यांवर पापग्रहाची दृष्टि असल्यास त्यांच्याशीं पटत नाहीं. लग्नापासून चतुर्थस्थानीं रवि असता पोटदुखीचा विकार असून खास पथादिकांचें सुख मिळत नाहीं. चतुर्थस्थानीं चंद्र किंवा चतुर्थेश चंद्र असतां जलाशयापासून धन संपादन करणारा, शेतवाडी, भार्या व पुत्र यांनीं युक्त व श्रद्धावान् होतो. चतुर्थस्थानीं किंवा चतुर्थेश मंगळ असतां प्रवासी, आप्तजनांपासून त्रास पावणारा व बलहीन होतो. बुध असतां धनधान्यसंपन्न, नृत्यगायनाची आवड असणारा, सुविद्य व देशांतर करणारा होतो. चतुर्थस्थानीं गुरु असतां लोकमान्य, धनवाहनयुक्त व राजानुग्रहानें संपत्ति संपादणारा होतो. शुक्र असतां तो पुरुष सर्वांचा स्नेही, उत्तम घरदार असलेला, ईश्वरोपासक व नित्यानंदी असतो. चतुर्थस्थानीं शनि असतां आळशी, बलहीन, तर्कटी व मलीन असतो. राहु असतां सुखरहित, आप्तांपासून अपयश व नित्य भटकणारा असतो. चतुर्थस्थानीं केतु असतां आप्तइष्टांचें व मातेचें सुख नसून पित्तविकारानें जर्जर होतो.

५ सुत-विद्या-स्थान—जन्मकाळीं पंचमस्थानीं किंवा केंद्रीं सर्व ग्रह असतां

पताका नामक योग होऊन मनुष्य धनी, पुत्रवान् व धार्मिक होतो. पंचमस्थानावर शनिराहूची दृष्टि असतां कन्या पुष्कळ होऊन दत्तकाचा योग असतो. पंचमेश केंद्रीं किंवा त्रिकोणीं असून पापग्रहांनीं दृष्ट नसेल तर पुत्रसंतति अधिक होईल. पंचमस्थानीं त्रिकंडी ग्रह असून तेथें शनीची पूर्ण दृष्टि असतां पुत्रहीन होतो व मंगळाची दृष्टि किंवा मंगळ तेथ असतां पुत्रशोक होतो. पंचमस्थानीं गुरु असून तेथ पापग्रहांची दृष्टि नसेल तर तीस वर्षांपुढें पुत्र होईल, आणि पूर्व वयांत पुत्र झालाच तर निर्विद्य, रोगी, किंवा घरांत तंटे करणारा होईल. जर लग्नेश शनि, द्वितीय किंवा तृतीयस्थानीं असेल तर त्या पुरुषास प्रथमपुत्र होईल व जर लग्नेश किंवा पंचमेश चतुर्थस्थानीं असेल तर प्रथम कन्या होईल. लग्नीं किंवा धनस्थानीं चंद्र, मंगळ किंवा शुक्र यांतून कोणताही ग्रह असतां निश्चयेंकरून प्रथम पुत्र होईल. कित्येक ग्रंथकार असें म्हणतात कीं, पंचमस्थाना- वर जितक्या शुभग्रहांची दृष्टि असेल त्याच्या दुप्पट संतति होईल. तसेंच जितक्या अधिक पुरुषग्रहांची दृष्टि असेल तितकी पुत्रसंख्या अधिक व स्त्रीग्रहांची अधिक दृष्टि असतां कन्याधिक्य असेल. सुतस्थान हें पापग्रहाची एकादी राशी असेल व तेथ शुभग्रहाची दृष्टि असेल तर तो पुरुष संततिहीन अथवा अल्प संतानयुक्त होतो. सुतस्थानीं बुधशुक्राचा किंवा चंद्राचा नवांश असेल अथवा तेथ शुक्रचंद्राची दृष्टि असेल तर कन्या पुष्कळ होतील. पंचमस्थाना- पासून सातव्या म्हणजे एकादशस्थानीं पापग्रह असतां गर्भपात, उपजत मूल मरण, इत्यादि प्रकार घडतात. पंचमस्थानीं स्वगृहींचा शनि असेल तर पांच मुलगे हो- तील. मकरराशीचा मंगळ असतां कन्या अधिक होतात. स्वगृहींचा गुरु असून पापग्रहांनीं दृष्ट नसतां निदान पांच पुत्र होतात. संततिस्थानीं सिंह, कुंभ व मेष हे राशि असतां अल्पसंतति होते. शुक्रयोगकरून संततिस्थानावर पापग्रहाची दृष्टि नसेल तरच संततिसौख्य होतें. संतति अनुकूल होईल हें सांगणें वस्तुत कठिण आहे, तथापि सारासार विचारानें काहीं सांगतां येतें. विद्येचाही विचार पंचम- स्थानावर करितात. पंचमस्थानीं गुरु स्वक्षेत्रींचा असतां विद्वान् व प्रयत्नवान् होतो. पंचमस्थानीं लग्नेश शुभग्रह असेल किंवा स्वगृहींचा शुभग्रह असेल तर विद्वान् होतो. धनस्थानांत बुधगुरु असतां भाषाभिज्ञ आणि वक्ता होतो. मित्रक्षेत्रीं, स्वगृहीं किंवा उच्चीचा शुक्र असतां कवि, गायक किंवा वाद्यें वाज- विणारा होतो. शुक्राचा संबंध गारुडविद्या, मंत्रें व चित्रें यांच्याशीं आहे. पंचमेश चंद्रयुक्त किंवा पंचम अथवा नवमस्थानीं बुध व शनि असतां उत्तम गायक होतो. शनि केंद्रांत, उच्चीचा, स्वगृहींचा, मित्रक्षेत्रींचा किंवा एकादशस्थानीं बलिष्ठ असून पापग्रहांनीं युक्त नसून शुभग्रहांनीं दृष्ट असेल तर मनुष्य वकील व कायदेपंडित होतो. शनीचा संबंध कायद्याशीं असतो. मकरराशीचा शनि किंवा वृश्चिकेचा

शनि केंद्रीं व विशेषतः १।२।११।३।९ या स्थानीं स्वगृहींचा शनि किंवा भाग्यस्थानीं चंद्रगुरूंची जोडी बलवान् असतां तो मनुष्य वकील होतो. त्रिकोणांत, एकादशस्थानीं किंवा धनस्थानीं बुधशुक्र असतां मनुष्य वेदांती होतो. पंचमस्थानीं व लाभस्थानीं पुरुष ग्रह असतील तर मनुष्य कारस्थानी होतो. बुध व मंगळ समोरासमोर सप्तमांत असतां मनुष्य इंजीनिअर होतो. दुसऱ्या किंवा तिसऱ्या स्थानीं रवि, बुध किंवा चंद्र असतां मनुष्य गणिती होतो. सिंहलग्नावर जन्म असतां व चंद्र मंगळ समोरासमोर म्हणजे परस्परांच्या सप्तमांत विशेषतः ३ व ९ या स्थानीं असतां मनुष्य उत्तम गणिती होतो. कुंभराशींत किंवा मिथुनराशींत रविशनीच्या योगानें निरंतर शास्त्राचा व्यासंग घडतो. पंचमेश पापग्रहांनीं दृष्ट, निर्बळी, नीचीचा, शत्रुक्षेत्री असतां मनुष्य निर्विद्य होतो. मिथुनलग्नीं किंवा मिथुन राशींत शुभग्रह असतां मनुष्य शास्त्री व पंडित होतो. पंचमेश लग्नीं असतां कपटी व लोभी, दुसऱ्या स्थानीं असतां श्रीमंत, तृतीयस्थानीं असतां लोभी, चतुर्थस्थानीं असतां मातृसुख, पंचमांत असतां संततिसौख्य घेतात, सहाव्यांत असतां संततीचा नाश व दत्तक पुत्राचा योग, सातव्यांत असतां पराक्रमी व धनवान्, अष्टमांत असतां छातींत रोग, नवमांत असतां ग्रंथकर्ता, दशमांत असतां सुविद्य व सुविद्य संतति, अकराव्यांत असतां पंडित, ग्रंथकर्ता आणि पंचमेश बाराव्यांत असतां संततिनाश याप्रमाणे जाणावें. ज्यांच्या पंचमस्थानीं रवि किंवा पंचमेश रवि असेल तो मनुष्य अल्प संततिमान्, दांभिकपणाची आवड धरणारा, सदाचरणापासून पराङ्मुख व अस्थिर मनाचा असतो. तोच रवि सिंहराशीचा असेल तर मनुष्य बुद्धिमंत परंतु गर्विष्ठ होतो. पंचमस्थानीं चंद्र किंवा पंचमेश चंद्र असतां जितेंद्रिय, सत्यवक्ता, प्रसन्नचित्त, सुखी व सुशील असतो. मंगळ असतां कफरक्तदोषपीडित, स्त्रीपुत्रांचें सुख नसणारा व व्यवहारज्ञ असतो. पंचमस्थानीं किंवा पंचमेश बुध असतां पुत्र व मित्र यांपासून सुख पावणारा, सुशील, कुशल व मंत्री असतो. गुरु असतां सन्मित्र व सुसंगति असणारा, श्रीमंत, वक्ता व विद्वान् निपजतो. पंचमस्थानीं किंवा पंचमेश शुक्र असतां कवि, राजमान्य व संपत्तियुक्त असतो. पंचमस्थानीं शनि असतां दुर्बल, दीन व दुःशील असतो. राहु असतां मित्रसुख नसणारा, पोटशूळाच्या व्यथेनें पीडित व भ्रमिष्ट असतो. केतु असतां वंधु, संतति व स्त्रीसुखविरहित व वीर्ययुक्त असतो. गुरुशुक्र परस्पर नवपंचमांत असतां पूर्णज्ञानी होतो.

६ रिपुस्थान—षष्ठस्थानचा स्वामी पापग्रहांनीं युक्त असून लग्नीं अथवा अष्टमस्थानीं असेल तर शरीरावर व्रण किंवा फोड होतात. जर षष्ठाधिपति रवि असून तो लग्नीं किंवा अष्टमांत असेल तर मस्तकावर, चंद्र असतां मुखामध्यें, मंगळ असतां कंठाचे ठायीं, बुध असेल तर हृदयावर, गुरु असतां नाभीवर, शुक्र

असतां नेत्रावर, शनि असतां पायावर आणि राहुकेतु असतां ओष्टावर व्रणादिकांचा उद्भव होतो. मंगळाच्या किंवा बुधाच्या गृहांत लग्नाधिपति असून त्यावर बुधमंगळाची दृष्टि असेल तर तो मनुष्य नेत्ररोगी होईल. षष्ठेश लग्नीं अथवा तृतीयस्थानीं असतां तो मनुष्य शत्रूचा पाडाव करणारा होतो. षष्ठेश द्वितीयस्थानीं असतां कठोर हृदयी असून वक्ता असतो व त्याला शत्रूंपासून द्रव्याचें साहाय्य मिळतें. लग्नेश व अष्टमेश षष्ठस्थानीं असेल तर वामनेत्राला आणि एकटा शुक्र षष्ठांत किंवा अष्टमांत असेल तर दक्षिण नेत्राला पीडा होते. राहु केतु षष्ठांत असतां दंतरोगी व शनि मंगळ षष्ठांत असतां नानाप्रकारचे वातरोग होतात. षष्ठस्थानीं पापग्रहयुक्त चंद्र असतां मनुष्य रोगी होऊन त्याच्या हातून शत्रूचें निवारण होत नाहीं. लग्न वृश्चिकराशीचें असून षष्ठेश उच्चीचा, पापग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर गुह्यरोग होईल. सिंहराशीचा रवि षष्ठांत असतांही गुह्यरोग होतात. षष्ठेश सूर्यानें किंवा राहूनें युक्त द्वादशस्थानीं असतां नीचवृत्ति करणारा होईल. षष्ठस्थानावर मातुलसुखाचा विचार करितात, तो असा. आपला जो लग्नेश असेल त्यापासून किंवा चंद्रापासून किंवा बुधापासून जें षष्ठस्थान त्याचा स्वामी शुभग्रह असेल किंवा ते शुभग्रहयुक्त असेल तर मातुलसुख होतें. बुध व चंद्र हे मातृसुखाचे कारक ग्रह आहेत म्हणून त्यांचा मातुलसुख पाहतांना विचार करितात. लग्नापासून रवि षष्ठस्थानीं असतां किंवा षष्ठेश रवि असतां तो मनुष्य निरंतर सुखी, बलवान्, पूज्य, पराक्रमी व शत्रुहीन होतो. षष्ठस्थानीं किंवा षष्ठेश चंद्र असतां तो मनुष्य आळशी, रोगी, निर्दय व शत्रुयुक्त होतो. मंगळ असतां शत्रुनाश करणारा, सत्संगति धरणारा, व विषयी होतो. बुध असतां वक्तृत्वप्रिय, रोगी, निष्ठुर, शत्रुपीडायुक्त व आळशी असतो. षष्ठस्थानीं किंवा षष्ठेश गुरु असतां संगीतशास्त्रांत प्रवीण, कीर्तिप्रिय, आरंभशूर व शत्रुनाश करणारा होतो. शुक्र असतां निर्बळ, स्त्रियांला अप्रिय व क्षीणवीर्य होतो. षष्ठस्थानीं शनि असतां किंवा षष्ठेश शनि असतां तो पुरुष शत्रुनाश करणारा, सुखी, शूर, दुष्टांग व मत्सरी असतो. राहु असतां कटिशूलाची पीडा असलेला, म्लेच्छांशीं स्नेह ठेवणारा, शत्रुनाश करणारा, बलवान् व धनिक होतो. षष्ठस्थानीं केतु असतां मातुलसुख नसलेला, निरोगी व सदा द्रव्यलाभ असणारा असतो. षष्ठेश २।३।२।१० या स्थानीं असतां शुभ व अन्यत्र असतां मनाला त्रास, व संसारांत दुःख होतें. १।१२ या स्थानीं शनिसमोर रविमंगळ असतां अपस्मार होतो.

७ जायास्थान—सप्तमस्थानीं पुष्कळ शुभग्रह असणें हें सुदैवाचें लक्षण आहे. सप्तमेश मित्रगृहीं, उच्चीचा किंवा स्वगृहीं स्थानीं असतां मनुष्य पराक्रमी होतो. सप्तमेश उच्चीचा असतां पराक्रमी व संसारदक्ष भार्या मिळते परंतु सप्तमेश शनि चंद्र असतां ती भार्या आणि धरपड असेल व इतर शुभग्रह असतां

मनमिळाऊपणानें ससारात वागेल सप्तमात शुभग्रह असता मनुष्य वीर्यवान् होतो सप्तमेश रविमंगळानें युक्त, किंवा चद्र आणि शुक्र हे शनि, मगळ किंवा राहु यानीं युक्त असता नीच व विधवा स्त्रियाचा सग त्या पुरुषाला घडतो सप्तमस्थानीं चद्र, गुरु, शुक्र किंवा सप्तमस्थानावर त्याची पूर्ण दृष्टि असतां सुशील व पर्तीच्या अनुमतानें वागणारी भार्या मिळते सप्तमस्थानीं शुक्र, मगळ किंवा राहु असतां किंवा सप्तमेश शनि असता मनुष्याला परस्त्रीसग घडतो सप्तमस्थानीं शत्रुक्षेत्रींचे पापग्रह असता हीनस्त्रियांशीं आणि स्वगृहींचे असता उच्च किंवा स्वर्ण स्त्रीशीं स मागम घडतो सप्तमस्थानाचा स्वामी एकादशस्थानीं असता किंवा सप्तमात शनि चद्र असता किंवा त्यांची दृष्टि तेथ असतां मनुष्य परस्त्रीरत होतो चद्रानें दृष्ट असा लग्नेश सप्तमात व सप्तमेश लग्नीं असताही मनुष्याला परस्त्रीसग घडतो मिथुनराशीचा शुक्र असता मनुष्य अतिकामी होतो कोणत्याही बलिष्ठ पाप ग्रहानें युक्त असा शुक्र असतां मनुष्य व्यभिचारी होतो बुधशुक्राचाही योग तसाच आहे शुक्राच्या अथवा सप्तमस्थानाच्या दोन्ही बाजूस पापग्रह पडले तर नपुसकत्व प्राप्त होत जन्मकालीं विषमराशीला मगळ आणि समराशीला चद्र रवियुक्त असून परस्परास पाहत असतील किंवा समराशीला शनि आणि विषम राशीला बुध असून परस्पर दृष्ट असतील तर त्या मनुष्याला निश्चयेकरून पढत्व प्राप्त होतें रवि, चद्र, बुध, यांवर मगळाची दृष्टि असता नपुसकत्व प्राप्त होतें सप्तमस्थानीं पापग्रहयुक्त राहु, मगळ किंवा शनि असता किंवा त्या ग्रहाची तेथ दृष्टि असता मनुष्याला द्विभार्यायोग घडतो व स्त्रीचे वर्तन पतीच्या मताप्रमाणे नसत सप्तमेश नीच किंवा पापग्रहाच्या राशीस असता किंवा लग्नेश अष्टमात असताही द्विभार्यायोग होतो लग्नापासून षष्ठ किंवा द्वादशस्थानीं रवि किंवा चद्र असता त्या मनुष्याचा एकच विवाह होतो लग्नीं, सप्तम, किंवा द्वादश स्थानीं पापग्रह असता किंवा पचमांत चद्र असतां विवाहयोग उशिरां घडतो किंवा विवाहसमयीं अडचणी उत्पन्न होतात सप्तमस्थानाचा स्वामी लग्नीं असतां क्रूर व मेदरोगी, द्वितीयस्थानीं असता परस्त्रीसभोग, तृतीयस्थानीं सततीच सुख कमी, चतुर्थस्थानीं असतां सुशील भार्येचा लाभ, पचमांत असतां शात, मानी व धनी, षष्ठात असता भार्या रोगी, सप्तमेश सप्तमांतच असेल तर परदारलपट, अष्टमांत असतां स्त्रीसबधीं दु ख, नवमांत असता स्वस्त्रियेविषयीं आदर, दशमांत असता धार्मिक व सत्यवक्ता, अकराव्या स्थानीं असता सततीला अपाय व द्वादशस्थानीं असेल तर निर्धन व कृपण होईल सप्तमेश जेथ असेल तेथपासून १।४।७।८।१२ ह्या स्थानीं कोणताही पापग्रह, विशेषत मगळ असता बहुभार्यायोग घडतो सप्तमेश शत्रुक्षेत्रीं, नीचीचा अथवा अस्तगत असेल तरीही त्या पुरुषाचे अनेक विवाह होतात सप्तमेश पचमस्थानीं असता मनुष्य निपु

त्रिक व विधुर होतो. लग्नावर मंगळाची दृष्टि आणि सप्तमस्थानावर गुरूची दृष्टि असतां मनुष्य परस्त्रीविषयीं पराङ्मुख होतो. तसेंच सप्तमस्थानावर रवि, चंद्र बुध व गुरु यांची दृष्टि असेल किंवा हेच ग्रह सप्तमस्थानीं असतील तर मनुष्य अधिक कामी असूनही परस्त्रीविषयीं पराङ्मुख असतो. द्विस्वभावराशीस रवि चंद्र शुक्र असतां तो पत्नीचा त्याग करितो. सप्तमेश उच्चस्थानीं असून सप्तमस्थानावर पापग्रहाची दृष्टि नसेल तर अनायासें सुंदर स्त्रियांची प्राप्ति होते. सप्तमस्थानीं वृषभ किंवा तूळराशीस शुक्र चंद्राची युति असतां बहुत स्त्रियांचा समागम होतो. २।७ या स्थानांचे स्वामी किंवा लग्नेश आणि षष्ठेश, हे पापग्रहानें युक्त असतां मनुष्य कामी होतो. ६।७ या स्थानांचे स्वामी पापग्रहयुक्त असून ६।७ या स्थानापासून नवमांत असतां मनुष्य विषयी होतो. लग्नापासून सप्तमस्थानीं किंवा सप्तमेश रवि असतां तो पुरुष परद्रव्यापहारी, दुःशील व रोगी होतो. सप्तमस्थानीं किंवा सप्तमेश चंद्र असतां तो मनुष्य अभिमानी, कृशांग, कामी, व धनविनयरहित असतो. मंगळ असतां तो पुरुष सदा चिंतायुक्त, व शत्रुयुक्त असून त्याला स्त्री आणि गृह यांचे सौख्य कमी असतें. सप्तमस्थानीं किंवा सप्तमेश बुध असतां तो पुरुष मोठा श्रीमंत, सुशील, सत्यवादी व नित्य पर्यटन करणारा असतो. गुरु असतां शास्त्राभ्यासासक्त, नम्र, संततिसंपत्तियुक्त, मंत्री व कवि असतो. शुक्र असतां कलाकुशल, रतिकुशल, नित्य पर्यटन व स्त्रियांशीं स्नेह करणारा असतो. सप्तमस्थानीं किंवा सप्तमेश शनि असतां बलहीन, मेदोरोगी, अल्पवीर्य, नीचांशीं स्नेह ठेवणारा व आळशी असतो. राहु असतां त्या पुरुषाला चौर्ययोग, द्विभार्यायोग आणि कलहप्रिया स्त्रियेची प्राप्ति घडते. केतु असतां सदा प्रवासी, धनक्षय, व शत्रूपासून भय असा योग असतो. तोच केतु वृश्चिक राशीचा असतां निरंतर लाभदायक होतो; परंतु मनाला व भार्येला पीडा होते. सप्तमस्थानीं रविशनि किंवा द्वितीयस्थानीं राहु असतां स्त्रियांचा पगडा पतीवर असतो. हाच योग स्त्रीला असतां ती पतीला प्रिय असते.

८ मृत्युस्थान—अष्टमेश पापग्रह असून नीचीचा असेल व कोणत्याही शुभग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल किंवा स्वक्षेत्रींचा नसेल तर तो मनुष्य अल्पायु होतो. अष्टमेश शुभग्रह असून शुभग्रहांनीं युक्त व दृष्ट असतां मनुष्य दीर्घायु होतो. अष्टमाधिपति एकादशस्थानीं अथवा त्रिकोणांत असतां बाल्यावस्थेंत मनुष्य दुःखी होऊन नंतर सुख भोगितो. अष्टमेश अष्टमस्थानीं असतां किंवा तुळेचा शनि अष्टमस्थानीं असतां मनुष्य दीर्घायु होतो. अष्टमेश षष्ठ किंवा द्वादशस्थानीं पापग्रहयुक्त असेल किंवा लग्नेशानें युक्त असेल अथवा लग्नीं किंवा अष्टमांत क्षीण चंद्र असेल तर मनुष्य अल्पायु होतो. लग्नापासून ५।७।९ या स्थानीं पूर्ण अंशांत गुरु असतां, लग्नेशानें युक्त केंद्रीं किंवा त्रिकोणीं

शुक्र, बुध असता व इतर ग्रह ३।६।११ या स्थानीं असता मनुष्य दीर्घायु, गुणी व धनवान् होतो नवम पंचमस्थानीं शुभग्रह असून लग्नीं कर्केचा गुरु असणे हा योग मनुष्याला दीर्घायु करितो केंद्रीं गुरुशुक्र व एकादश स्थानीं चंद्र असता मनुष्य पुष्कळ वर्षे वाचतो लग्नाधिपति अष्टमस्थानीं असून लग्नावर पापग्रहाची दृष्टि असेल किंवा लग्नेश नीचीचा असेल तर मनुष्य मध्यमायु होतो अष्टमेश भौमयुक्त असता किंवा लग्नेशावर मंगळाची दृष्टि असतां किंवा राहु, सूर्य व चंद्र लग्नीं किंवा केंद्रीं असता किंवा अष्टमस्थानीं राहु, बुध व मंगळ असता किंवा पापग्रहानीं युक्त चंद्र ६।८ या स्थानीं असता, सप्तमस्थानीं शनि मंगळ असतां किंवा द्वादशस्थानीं गुरु राहु असता मनुष्य क्वचितच दीर्घायु होतो षष्ठेश व द्वादशेश हे स्वगृहीं, लग्नीं किंवा परस्पराच्या गृहीं असतां मनुष्य दीर्घायुषी होतो. लग्नाधिपति उच्चीचा, चंद्र एकादशस्थानीं व गुरु अष्टमात असता मनुष्य दीर्घायु होतो अष्टमस्थानचा स्वामी लग्नीं असतां व्रण होऊन मनुष्य व्याधियुक्त होतो अष्टमेश द्वितीयस्थानीं असतां निर्धन, तृतीयस्थानीं असता अशक्त, चतुर्थस्थानीं असता मातृपितृसुख अल्प, पंचमस्थानीं असता पुत्रसंतति अल्प व स्थिरवृत्ति, षष्ठस्थानीं असता पाणी व सर्प यापासून भीति, सप्तमात असतां द्विभार्यायोग, अष्टमात असता स्वत कुकर्मी व स्त्री इच्छेविरुद्ध वागणारी, नवमात असता पातकी, परस्त्रीरत व अल्प संतति, दशमांत असता दु खी व क्रूर, एकादशात असता सर्वकाल द्रव्याचा व्यय आणि द्वादशस्थानीं असतां रोगी, दु खी व अल्पायु होईल अष्टमस्थानीं पापग्रह असून त्यावर मंगळाची दृष्टि असतां अपमृत्यु घडतो ज्या बाळकाला रवियुक्त बुध किंवा चंद्र व्ययस्थानीं असेल तें मूल अल्पायु होत अष्टमेशाची लग्नस्वामीवर दृष्टि असता तें मूल अल्पायु होतें अष्टमेश व चंद्रराहु हे लग्नीं असतां अपघातानें मृत्यु येतो अष्टमस्थानीं रवि असता किंवा अष्टम स्थानाचा स्वामी रवि असता तो मनुष्य क्रोधी, बारीक नेत्राचा, शत्रु वाढविणारा व कृश शरीराचा असतो अष्टमेश किंवा अष्टम स्थानीं चंद्र असतां तो मनुष्य क्षीण, अति घाम येणारा, निर्धन, शत्रुपीडायुक्त व उद्विग्न असतो मंगळ असता नेत्रपीडा, रक्तदोष, नीच कर्मा, गुह्यरोगी व अत्यंत निंदक असतो बुध असता राजानुग्रहानें धन मिळविणारा, गर्विष्ठ व सर्वांशीं विरोध करणारा असतो अष्टमस्थानीं किंवा अष्टमेश गुरु असता अतिशय मलीन, विनयरहित, आळशी व स्थूल, परंतु शक्तिहीन असतो शुक्र असतां प्रसन्नचित्त, धूर्त, नि शंक, राजमान्य व स्त्रीपुत्रांची चिंता असणारा असतो शनि असतां रक्तदोषानें पीडित, निर्भय, असंतुष्ट व आळशी असतो राहु असतां गुप्तेंद्रियाला पीडा होते व अष्टमस्थानीं केतु असतां गुह्यस्थानीं पीडा असते आणि त्याला निरंतर द्रव्यलाभ होतो

९ भाग्यस्थान—भाग्येश भाग्यस्थानीं, केंद्रीं किंवा त्रिकोणांत असेल किंवा भाग्यस्थानावर भाग्येशाची दृष्टि असेल किंवा शुभग्रहानें युक्त किंवा दृष्ट असेल तर तो पुरुष फार भाग्यवान् होतो. लग्नीं, तृतीयस्थानीं व पंचमस्थानीं कोणताही ग्रह असून तो जर बलवान् असेल आणि भाग्यस्थानावर पहात असेल तर तो पुरुष मोठा भाग्यशाली, संपत्तिमान् व विलासी असा होतो. भाग्येश पापग्रह असून त्याची, विशेषतः मंगळाची, भाग्यस्थानावर दृष्टि असतां मनुष्य चौर्यकर्मानें, अन्यायानें अथवा लांच खाऊन पुष्कळ द्रव्य मिळवितो; परंतु उत्तरवयांत धार्मिक होतो. पूर्णचंद्रानें युक्त असा शनि किंवा मंगळ भाग्यस्थानीं बलवान् असेल तर तो पुरुष मंत्री होतो व सल्लामसलत देऊन पुष्कळ द्रव्यसंपादन करितो. एकादशस्थानाचा स्वामी भाग्यभुवनीं असतां मनुष्य विद्वान् होतो. परंतु तोच पापग्रहांनीं युक्त असतां मनुष्यास दुःखी करितो. नवमस्थानीं नीचीचा गुरु, राहुयुक्त असून त्यावर शनि व मंगळ यांची दृष्टि असतां मनुष्य दुष्कर्में करितो. नवमेश व धनेश एकत्र केंद्रीं असून त्यावर लग्नेशाची दृष्टि असतां मनुष्याला मोठा धनलाभ होतो. भाग्यस्थानीं पांच ग्रह एकत्र असतां थोर अधिकार आणि अपार संपत्ति प्राप्त होते. गुरु नवमांत असून त्यावर रवि शनीची दृष्टि असतां मनुष्य अत्यंत गुणी व संपत्तिमान् होतो. भाग्यस्थानीं चंद्र, मंगळ व बुध यांची दृष्टि असतां कीर्तिमान्, सुखी व श्रीमंत होतो. शुक्राची दृष्टि असतां विद्वान् होतो. नवमस्थानीं चंद्र असून त्यावर शनि, बुध व मंगळ यांची दृष्टि असतां संपत्तिवान् व कर्तृत्ववान् होतो. नवमांत शुक्रचंद्र असतां प्रतापी परंतु अनीतीचीं कर्में करणारा होतो, व शनिचंद्र असतां अभक्ष्याभक्ष्य करणारा होतो. नवमांत शुक्रमंगळ असतां द्विभार्यायोगही घडतो. नवमांत चंद्र, बुध व शुक्र असतां सापत्नमातेचा योग असतो. नवमांत अनेक पापग्रह असतां पापकर्मी होतो. नवमांत शनि असतां दीर्घायु व भांडखोर होतो. नवमांत गुरूनें युक्त पूर्णचंद्र असतां किंवा नवमेश दशमांत असतां किंवा राहु नवमांत असून नवमेश स्वनवांशीं असतां मनुष्य तीर्थयात्रादि पुण्यकर्में करितो. नवमेश नवमांत असतां यज्ञादि कृत्यें घडतात. नवव्या स्थानापासून दुसऱ्या किंवा चवथ्या स्थानांत मंगळ असून नवमेश नीचीचा किंवा पापग्रहानें युक्त असतां जन्मणाराचा पिता निर्धन असतो. नवमेश उच्चीचा, केंद्रीं शुक्र, व नवमांत गुरु असतां पिता दीर्घायुषी व श्रीमंत असतो. नवमेश दशमांत व दशमेश नवमांत असा अन्योन्य क्षेत्र संबंध असतां पिता कीर्तिमान् असतो. अष्टमेश नवमांत, द्वादशेश लग्नांत, षष्ठेश पंचमांत व १।८।१२ या स्थानीं सूर्य असतां जन्मापूर्वी किंवा बालपणीं पिता मृत्यु पावतो. नवमेश लग्नीं असतां गुणी व पराक्रमी, दुसऱ्या स्थानीं असतां भाग्योदयाची चिंता, तृतीयस्थानीं असतां धनी, गुणी, कामी व लोकप्रिय,

चतुर्थस्थानीं असतां वक्ता व संतोषी, पंचमांत असतां गुरुभक्ति करणारा व बुद्धिमान्, सहाव्यांत असतां भाग्यहीन, सप्तमांत असतां अपयशी, अष्टमांत असतां भाग्यहीन, नवमांत असता धनी, गुणी व कांतिमान्, दशमांत असतां मंत्री, यशस्वी, व पुण्यकर्मे आचरणारा, एकादशांत असतां सुदैवी व लोकप्रिय आणि बाराव्यांत असता भाग्यहीन याप्रमाणे जाणावें. नवमस्थानीं एकटा रवि असतां किंवा नवमेश रवि असतां तो मनुष्य धार्मिक, सन्मतियुक्त, पुत्रमित्रांचें सुख असणारा व मातुल पक्षाशीं विरोध करणारा असतो. नवमस्थानीं किंवा नवमेश चंद्र असतां धन व कुटुंब यांच्या सुखानें युक्त, कथा पुराणें आवडणारा सदाचरणी व तीर्थयात्रा करणारा होतो. मंगळ असतां मांडलोर, पापकर्मांची पर्वा न करणारा, राजमान्य आणि अन्यायानें द्रव्य मिळविणारा असतो. बुध असतां उपकारी, विद्याभिलाषी, धनपुत्रयुक्त, नित्य प्रवासी व दाता असतो. नवमस्थानीं गुरु किंवा नवमेश गुरु असतां तो पुरुष राजमंत्री, सत्कार्य कर्ता, ईश्वरभक्त व थोरांचा आदर करणारा होतो. शुक्र असतां ईश्वराविषयीं भाव, गुरु व अतिथि यांचा आदर करणारा, तीर्थयात्रा करणारा व रूपीप्रमाणें शांत स्वभावाचा होतो. शनि असता शरीरानें सुदृढ, धार्मिक, मत्सरी, व दुसऱ्यावर अंमल गाजविणारा असतो राहु असतां धर्म व द्रव्य यांचा नाश, बंधुसौख्य, अल्प भ्रमण व शरीरपीडा होते केतु असतां क्लेशनाश, म्लेंच्छांपासून भाग्यवृद्धि होते. ९।१०।२।५ या स्थानीं रविशनिराहुमंगळ असतां लाचखाऊ होतो.

१० दशमभाव—दशमेश निर्बल असतां मनुष्य वाईट आचरणाचा व चंचल बुद्धीचा होतो. दशमांत रवि किंवा राहु असतां किंवा दशमेश शुक्रयुक्त केंद्रीं असतां महायात्रा घडते. दशमांत पापग्रह निर्बली असतां मनुष्य साहसी व जुगाराचे व्यापार करितो. लग्नेश व दशमेश हे एकच असतील किंवा एकत्र असतील तर स्वकष्टानें द्रव्य संपादन करून मनुष्य पुण्यकर्मे करितो. बुध शुक्र हे ज्या राशीस असतील त्या राशींचे स्वामी बलहीन असतां मनुष्य आसुरी कृत्यें करितो. दशमेश चंद्रयुक्त नवमांत असतां त्या मनुष्याचे हातून जीर्णोद्धार घडतात. दशमेश भाग्यस्थानीं, किंवा उच्चीचा, किंवा शुभ ग्रहानीं युक्त केंद्रीं किंवा त्रिकोणीं असेल तर त्या मनुष्याला व्यापारांत यश येऊन तो सत्कर्मे करितो. दशमाधिपति ६।८।१२ या स्थानीं असतां सत्कृत्यांविषयीं नेहमीं पराङ्मुख होतो आणि ५।९।१० या स्थानाचे स्वामी व लग्नेश हे शुभग्रह असून बलवान् असतील तर तो मनुष्य ज्ञानी व वेदांती होतो. बुधानें दृष्ट किंवा दशमाधिपतीनें युक्त असा शनि दशमांत असतां किंवा शनीची दृष्टि असलेले बुध व चंद्र दशमांत असतां हरिपद प्राप्तीसाठीं मनुष्य संन्यास घेतो. चंद्रापासून दशमस्थानीं बुध गुरु शुक्र हे ग्रह असतांही संन्यास योग घडतो. ५।९।१० किंवा १२ ह्या स्थानीं

सूर्य, मंगळ, गुरु व शनि असे चार ग्रह असता मनुष्य परब्रह्माचेठायीं निमग्न होतो. तीन ग्रहापेक्षा अधिक शुभग्रह कर्की, त्रिकोणी, स्वक्षेत्रीं, मित्रक्षेत्रीं, किंवा दशमांत एकत्र असता प्रव्रज्या योग होऊन तो मनुष्य यति किंवा यतिस्वभावाचा होतो. दशमेश द्वितीय अथवा सप्तम स्थानीं असेल किंवा त्याच्या स्वामीनें युक्त असेल तर मनुष्य विषयी होतो. दशमेश किंवा दशमस्थानीं बुध असता दुकानदार होतो. दशमेश रवी किंवा रवीस्थान युक्त असता कवि होऊन उत्तर वयात सुखी होतो. दशमेश धनस्थानीं असता वक्ता, तृतीयस्थानीं असता स्वच्छंदी, चतुर्थस्थानीं असता सुखी, पंचमांत असता पुत्रवान्, षष्ठस्थानांत असता दु:खी व शत्रुतापानें पीडित, सप्तमांत असता स्वच्छंदी, अष्टमांत असता दु:खी, नवमांत असता भाग्यवान्, दशमांत असता सत्यवक्ता व ईश्वरभक्त, एकादश स्थानीं असता संतोषी व धनवान् आणि द्वादशस्थानीं असता दु:खी व अपयशी होईल. दशमस्थानीं मंगळ असता त्या मनुष्यास वडिलार्जित भूमीची चिंता असते. नवम, पंचम व सप्तमस्थानीं गुरु असता पुत्रसंबंधी चिंता असते. दशमेश निर्बळी असेल किंवा ६।८।१२ या स्थानीं असेल तर आयुष्यास सुख होत नाहीं. दशमस्थानीं रवि किंवा दशमेश रवि असता तो पुरुष बुद्धिमान्, पुत्रवान्, श्रीमान्, राजाश्रय असलेला, उपकारी असतो. दशमस्थानीं चंद्र किंवा दशमेश चंद्र असता राजमान्य, कीर्तिवान्, बलवान्, सतोगी व सुशील असतो. मंगळ असतां अत्यंत संतोषी, साहसी व धनसंचयी होतो. बुध असता ज्ञानी, पराक्रमाचीं कामें करणारा, संपत्तियुक्त व मधुरभाषण असतो. ज्याचे दशमस्थानीं गुरु किंवा दशमेश गुरु असेल तो पुरुष राजमान्य, मित्र, पुत्र, धन व स्त्रीसुख यांनीं संपन्न व यशस्वी असतो. शुक्र असता सन्मान पावणारा, स्नानध्यान करणारा, धनसंचय व कुटुंबावर प्रीति करणारा असतो. शनि असता राजप्रधान, धैर्ययोग, व कारस्थानी असतो. दशमस्थानीं किंवा दशमेश राहु किंवा केतु असता त्याला पित्यापासून सुख होत नाहीं व वातपीडा होते.

११ लाभस्थान—लाभेश लाभस्थानीं असता पुष्कर नामक योग होऊन मनुष्य असत सुखी व सुशील होतो. लाभस्थान शुभग्रहांनीं युक्त असेल किंवा सौम्यग्रहाची त्यावर दृष्टि असेल तर मनुष्य ज्ञानी, काव्यकलाभिज्ञ असून साहसाचे व युक्तीचे उद्योग करून द्रव्यार्जन करितो. लाभस्थानीं गुरु अथवा गुरुची दृष्टि असता तो पुरुष विद्वान्, सज्जनसंगति करणारा, अंत:करणाचा दयाळु व संपत्तिमान् होतो. लाभस्थानीं शुक्र असता देशांतर घडून स्त्रियापासून द्रव्यप्राप्ति होते. एकादशस्थानीं, केंद्रांत किंवा त्रिकोणांत लग्नेश, अष्टमेश व लाभेश असतील तर तो मनुष्य दीर्घायु होतो. २।३।४।५।११ या स्थानीं पापग्रह असता मध्यायु असतो. ६।८।१२ या स्थानीं निर्बली किंवा शत्रुक्षेत्रींचे

पापग्रह असतां वारंवार शरीराला क्लेश होतात चतुर्थेश षष्ठस्थानी शनियुक्त असता गाडीघोडा इत्यादिकांवरून पडून अपघात होतो लाभस्थानीं शुभग्रह असता किंवा लाभेश शुभग्रहयुक्त असता मनुष्य सत्कर्मानें द्रव्य संपादन करितो तेच पापग्रह असता असत्कर्मानें व शुभपापग्रहांचा संयोग असेल तर मिश्रमार्गानें द्रव्य मिळेल लाभेश रविचंद्र असता राजाश्रयानें, मंगळ असता वरिष्ठाच्या साहाय्यानें, व शेतकीच्या योगानें, बुध, गुरु व शुक्र असता विद्या व स्वपराक्रम यापासून व शनि असता कुमार्गानें द्रव्य मिळेल लाभेश केंद्रीं किंवा त्रिकोणीं असता मनुष्य श्रीमंत होतो एकादशस्थानचा स्वामी लग्नीं असता वक्ता, आनंदी व सात्विक, द्वितीयस्थानीं असता सुखी, तृतीयांत असता बुद्धिमान् व पराक्रमी, चतुर्थस्थानीं असता सुख भोगणारा, पंचमांत असता पुत्रवान्, षष्ठस्थानीं असता प्रवासी व रोगी, सप्तमांत असता स्त्रीला अनिष्ट, अष्टमांत असता अविद्वान्, नवम व दशमस्थानीं असता भाग्यवान् व राजपूज्य, एकादशांत असता वक्ता व कवि आणि द्वादशांत असता धर्मभ्रष्ट होईल ज्याच्या एकादशस्थानीं रवि किंवा एकादशस्थानाधिपति रवि असेल तो मनुष्य राज्याचा लोभी, सत्कर्मी, धनवान् आणि कीर्तिमान् होतो चंद्र असता प्रसन्न चित्ताचा, सद्गुणी व विलासी होतो मंगळ असता सुवर्ण, रौप्य, प्रवाळ इत्यादि वस्तूंचा संग्रह करणारा, अधिकारी, व राजमान्य होतो बुध असता विद्याभ्यासंगी, भोगासक्त, सुशील व बलवान् असतो लाभस्थानीं किंवा लाभेश गुरु असता तो मनुष्य सामर्थ्यवान्, सपत्नियुक्त विद्वान् व अधिकारी असतो शुक्र असता संगीत व नृत्य आवडणारा, व धर्मश्रद्धावान् होतो शनि असता काळ्या रंगाच्या वस्तु, घोडे व वाहन यांची आवड व कायद्याचे ज्ञान असतें राहु असता चतुष्पदांचा लाभ व विजय हीं प्राप्त होतात केतु असता नेत्रपीडा व गुह्यरोग होतात व तो मनुष्य उधळ्या असतो

१२ व्ययभाव—व्ययस्थानीं शुभग्रह असेल, शुभग्रहाच्या राशीस असेल किंवा शुभग्रहानें दृष्ट असेल अथवा व्ययस्थानाचा स्वामी शत्रुक्षेत्री, निर्बली किंवा नीचीचा असेल तर तो मनुष्य फार सात्त्विक असतो व्ययेश शुभ नवांशीं असता योग्य खर्च करणारा व अशुभ नवांशीं असता अयोग्य खर्च करणारा होतो व्ययेश व्ययांत बलवान् असता धननाश होतो षष्ठेश किंवा अष्टमेश क्रूर ग्रह असून व्ययस्थानीं असता किंवा व्ययस्थानीं राहु असता भूमि व धन यांचा नाश होतो व्ययेश बुध, गुरु किंवा शुक्र असून व्ययस्थानींच असेल किंवा त्यांची व्ययस्थानावर दृष्टि असेल तर शय्यादि सुखें मिळतात व्ययस्थानावर भाग्येश पाहील तर मनुष्यास रत्नमंडित मंचकाचें सुख मिळेल द्वादशस्थानचा स्वामी लग्नीं असता मधुर भाषण करणारा, सुंदर परंतु निर्धन असतो

द्वितीयस्थानीं असता सत्यवक्ता व गुणी, तृतीयस्थानीं असता आपल्योत्कर्ष, चतुर्थांत असतां निर्धन, पंचमांत असता मंत्री, षष्ठस्थानीं असता क्रोधी, पापी व मातृपासून दु ख, सप्तमांत असता स्त्रीचें अल्प सुख, अष्टमांत व नवमांत असता धार्मिक व तीर्थयात्रा करणारा, दशमांत असता माऊन मिळून सुखी, एकादशांत असतां अल्प पुत्रसुख आणि द्वादशांत असतां पराक्रीरत होईल द्वादशस्थानीं शिवा द्वादशेश रवि असता त्या पुरुषाचे नेत्र निस्तेज असून तो पितृविरोधी असतो चंद्र असतां कुस्थानि करणारा व नेत्ररोगी होतो मंगळ असता मित्रद्रोही, धैर्यशील, व शरीर असतो बुध असता मलीन, ज्ञानहीन परंतु स्वकार्यदक्ष व धूर्त असतो व्ययस्थानीं गुरु असतां चिंतायुक्त, पापमार्गाकडे प्रवृत्ति व क्रोधयुक्त असतो शुक्र असतां विषयासक्त, निष्ठुर, विरोधी व सत्य पराङ्मुख असतो शनि असता निर्दय, निर्धन, नित्य आळशी व सौख्यरहित असतो. राहु असता नेत्ररोगी, पापाला निरत व मध्यम प्रतीची नोकरी करणारा असतो केतु असता उधळ्या, गुह्यरोगी व ज्ञानरहित असतो

## मेषादिलग्नीं शुभाशुभ ग्रह.

असरया लग्नीं अमुक ग्रह शुभ व अमुक अशुभ असे परी पुढें लिहिलें आहे, ही ग्रहांची स्थिति पाहून शुभाशुभ फल सांगावें मेषलग्नीं जन्म असता लग्नीं ध, शुक्र व शनि हे अनिष्ट असतात, कारण बुध हा षष्ठेश, शुक्र मारकेश व शनि भेश असतो रवि व गुरु हे त्रिकोणाधिपति असल्य शुभ होत परंतु व्ययेशही रु आहे म्हणून गुरूचें स्थान पाहून शुभाशुभ फल ठरवावें मेष लग्नीं जन्मस्थ वि, चतुर्थस्थानीं गुरु, सप्तमांत शनि व दशमस्थानीं मंगळ असता राजयोग होतो, ारण हे चार ग्रह फक्त असून उच्चीचे असतात वृषभ लग्नीं जन्म असतां ्र, गुरु व शुक्र हे अशुभ होत कारण चंद्र हा तृतीयेश म्हणून क्षीणपरा मी, गुरु अष्टमेश व तोच लाभेश, आणि शुक्र हा षष्ठेश असतो भाग्येश तोच ाभेश शनि असल्यामुळें राजयोग करणारा आहे मिथुनलग्नीं रवि, मंगळ । गुरु हे अनिष्ट होत कारण रवि हा तृतीयेश, मंगळ षष्ठेश व गुरु हा मार- ेश होय येथें शनि गुरु यांचा योग मारक होय कारण शनि अष्टमेश व ुरु मारकेश आहे शुक्र पंचमेश असल्यामुळें शुभ होय येथ बुधगुरु ्कत्र असतां राजयोग होतो कारण बुध हा केंद्राधिपति व शुक्र त्रिकोणा ्धिपति आहे कर्कलग्नीं जन्म असता बुध, शुक्र व शनि अशुभ जाणावे ारण बुध हा तृतीयेश व तोच व्ययेश असतो शुक्र हा चतुर्थेश व शिवाय ष्टमेश म्हणजे लाभेश तोच असतो शनि हा मारकेश व अष्टमाधिप आहे ापग्रह केंद्रस्थ असता शुभ होत, म्हणून मंगळ शुभ जाणावा शिवाय मंगळ

हा त्रिकोणाचा व दशमाचा स्वामी असल्यामुळें राजयोगाचें फल देणारा आहे. कर्कलग्नीं जन्मस्थ गुरु, चवथा शनि, सातवा मंगळ व दशमांत रवि हा राजयोग होतो. सिंहलग्नीं जन्म असतां बुध, शुक्र हे अनिष्ट फलें देतात. कारण बुध हा मारकेश असून तोच लाभेश आहे. शुक्र हा तृतीयेश असून तृतीयस्थानाचें जें मृत्युस्थान म्हणजे दशमस्थान त्याचाही तोच स्वामी आहे. मंगळ हा फार शुभ आहे. कारण तो केंद्राचा व भाग्याचा अधिपति आहे. कन्यालग्नीं मंगळ व गुरु हे अनिष्ट होत. कारण मंगळ हा तृतीयेश असून तृतीयस्थानाचें जें रिपुस्थान म्हणजे जन्मलग्नाचें मृत्युस्थान त्याचाही तोच स्वामी आहे. गुरु मारकेश आहे. चंद्रही लाभेश असल्यामुळें अनिष्ट होय. बुधशुक्र यांचा योग राजयोग करणारा आहे. कारण बुध दशमेश व शुक्र भाग्याधीश आहे. तूळलग्नीं जन्म असतां रवि, मंगळ व गुरु हे अशुभ होत. कारण रवि हा लाभेश, मंगळ मारकेश, व गुरु हा तृतीयेश असून तोच षष्ठस्थानचा स्वामी आहे. शनि बुध हे त्रिकोणाधिपति असल्यामुळें शुभ होत. बुधचंद्रांचा योग राजयोग करणारा आहे. कारण बुध नवमेश व चंद्र दशमेश आहे. तूळलग्नीं जन्मस्थ शनि, चवथा मंगळ, सातवा रवि आणि दहावा गुरु हा राजयोग होतो. वृश्चिक लग्नीं जन्म असतां मंगळ, व बुध हे अशुभ होत. कारण मंगळ त्रिकस्थानचा अधिपति असून लग्नेशही तोच आहे. बुध हा लाभेश आहे परंतु तोच मृत्युस्थानचा स्वामी आहे. शनि मध्यम आहे. गुरु व चंद्र हे त्रिकोणाधिपति असल्यामुळें शुभ होत. रविचंद्रयोग हा येथें राजयोग होतो. गुरु शुक्र हे मारकेश आहेत. म्हणून त्यांच्या स्थितिप्रमाणें ते इष्टानिष्ट जाणावे. धनलग्नीं शुक्र अनिष्ट होय. कारण तो लाभेश आहे परंतु त्रिकस्थानाचा स्वामीही तोच आहे. रवि बुध हे शुभ होत. कारण रवि हा भाग्येश व बुध हा सप्तम व दशम या स्थानांचा स्वामी आहे. येथें रविबुधांचा योग हा राजयोग होतो. मकर लग्नीं चंद्र व गुरु हे अशुभ फल देणारे आहेत. कारण गुरु व्ययेश व चंद्र हा मारकेश आहे. शुक्र हा दशमाचा व त्रिकोणाचा व बुध त्रिकोणाचा अधिपति आहे म्हणून बुध व शुक्र शुभ होत. मकरलग्नीं जन्म असतां जन्मस्थ मंगळ, चवथा रवि, सप्तमांत गुरु व दशमस्थानीं शनि, अशी स्थिति असतां उत्तम राजयोग होतो; कारण हे चारी ग्रह केंद्रीं येऊन उच्चीचे असतात. कुंभलग्नीं गुरु चंद्र हे पापफलें देणारे आहेत. कारण चंद्र हा षष्ठेश व गुरु हा मारकेश आहे. शुक्र त्रिकोणाचा व केंद्राचा स्वामी असल्यामुळें शुभ होय. शुक्र मंगळांचा येथें राजयोग जाणावा. मीनलग्नीं जन्म असतां रवि, शुक्र व शनि हे अनिष्ट फलें देतात. कारण रवि षष्ठेश, शुक्र अष्टमेश व शनि व्ययेश आहे. मंगळ नवमेश व गुरु दशमेश असल्यामुळें गुरुमंगळांचा संयोग राजयोग

उत्पन्न करणारा आहे. तसेंच चंद्रमंगळ त्रिकोणाधिपति असल्यामुळें शुभ होत. याप्रमाणें द्वादशलग्नीं शुभाशुभ ग्रह जाणावे. सामान्यतः कर्क, सिंह, कन्या व तूळ ह्या राशीं जन्मणारे पुरुष पराक्रमी असतात. लग्नीं, त्रिकोणांत किंवा दशमांत चंद्र, मंगळ किंवा गुरु असणें हा योग मोठा अधिकार व मोठा पगार प्राप्त करून देणारा आहे. पराक्रमी पुरुषाचे कुंडलींत प्रायः तिसऱ्या किंवा सहाव्या स्थानीं मंगळ असतो. पंचमस्थानीं किंवा लाभस्थानीं अनेक ग्रह असतां मनुष्य मुत्सद्दी असतो. कुंडलींतल्या कोणत्याही एकास्थानापासून, विशेषतः धनस्थानापासून, पुढील प्रत्येक स्थानीं कोणीतरी ग्रह असणें हा योग मनुष्यास गजांतलक्ष्मी देणारा आहे. ३।६।११ या स्थानांचे स्वामी शुभग्रह असले तरी अशुभ फळें देतात.

## द्विग्रहयोग.

जन्मलग्नकुंडलींत दोन ग्रह एकत्र असतां काय काय फळें उत्पन्न करितात हें आतां सांगतो. रविचंद्र–कार्यकुशल, कपटी व यंत्रादिकांविषयीं आवड. रविमंगळ पुरुषार्थी, बलाढ्य, साहसी व शीघ्रकोपी. रविबुध–प्रियवक्ता, दास्यवृत्ति करणारा, शास्त्रज्ञ व संपत्तिमान्. रविगुरु–मंत्री, सभ्य, चतुर व परोपकारी. रविशुक्र–गायनवादनपटु व शास्त्राभ्यासी. रविशनि–व्यापाराविषयीं प्रेम, गुणज्ञ, श्रद्धावान् व धनसंपन्न चंद्रमंगळ–बुद्धिमान्, पराक्रमी, भांडखोर व मातृपितृविरोध करणारा, चंद्रबुध–वक्ता, सुंदर, दयाळु व नम्र चंद्रगुरु–अन्यत्र कारस्थानी, विद्वान्, निरंतर कार्यांत निमग्न व लोकोपकारी चंद्रशुक्र–व्यापारांत चतुर, व्यसनी, अत्तराचा शोकी चंद्रशनि–अनेक स्त्रियांशीं संभोग करणारा, दुर्व्यसनी, चोरटी व आळशी मंगळबुध–व्यापारी, वैद्यकी करणारा, अनेक स्त्रियांची इच्छा करणारा मंगळगुरु–मंत्रशास्त्रार्थज्ञ, कुशल, व गांवांत श्रेष्ठ मंगळशुक्र–स्त्रियांचा शोकी, लोढणी व जुगार यांची आवड, गर्विष्ठ व सर्वांशीं विरोध करणारा. मंगळशनि भांडखोर, अन्यायानें द्रव्य मिळविणारा व सुखरहित. बुधगुरु–संगीतज्ञ, नीतिमान्, प्रसन्नचित्त, व उदार. बुधशुक्र विवेकी, गुणी, कुटुंबपालक व बोलका बुधशनि–चपल वृत्ति, भांडखोर व दयाळु गुरुशुक्र–विद्वान् व सर्वप्रकारें सुखी. गुरुशनि–शूर, संपत्तियुक्त, यशस्वी व गांवांत श्रेष्ठ. शुक्रशनि—कलाकुशल व मल्ल

## स्त्रीजातक.

स्थलसंकोचामुळे येथें समग्र स्त्रीजातकाविषयीं लिहितां येत नाहीं; म्हणून स्त्रियांना विशेष इष्टानिष्ट योग कोणते इतकेंच मात्र येथें सांगतो. ज्या स्त्रीच्या सप्तमस्थानीं एकाहून अधिक शुभग्रह किंवा शुभग्रहांची दृष्टि असेल तिचा पति श्रीमंत होईल. एकच शुभग्रह किंवा शुभग्रहांची येथें दृष्टि असतां ती स्त्री पतीवर

प्रेम करणारी होईल दोन किंवा दोहोंहून अधिक पापग्रह किंवा त्यांची दृष्टि असतां ती स्त्री पतीला क्लेशदायक होते सप्तमस्थानीं शनि, मंगळ, राहु किंवा नीचीचा एखादा पापग्रह असणे हा योग स्त्रियाला अनिष्टकारक आहे सप्तमस्थानीं किंवा सिंहराशीस शनियुक्त मंगळ असणे हाही योग तसाच अनिष्ट आहे तिच्या षष्ठ किंवा अष्टमस्थानीं चंद्र किंवा चंद्राची दृष्टि असते तिचा विवाहयोग जमतांना फार प्रयास पडतात ज्या स्त्रीच्या सप्तमांत उच्चीचा किंवा बलवान् बुध, गुरु किंवा शुक्र असेल ती पतिप्रिय होऊन पतीचे वैभव वृद्धिंगत करील जन्मलग्नापासून किंवा चंद्रापासून २।७।१२ ह्या स्थानीं पापग्रह असणे हा योग स्त्रियाला निंद्य आहे अष्टमस्थानीं गुरु शुक्र असता ती मृतप्रजा व पापग्रह असता पतिसुखहीन होईल जन्मकाळीं अष्टम किंवा द्वादशस्थानीं पापग्रहयुक्त मंगळ व त्याशीं राहु, केतु किंवा सप्तमेश अष्टमस्थानीं व अष्टमेश सप्तमस्थानीं असता ती कन्या जन्मभर दुःखी होईल ज्याच्या सप्तमस्थानीं उच्चीचा मंगळ, बुध किंवा गुरु असेल ती अत्यंत लावण्यवती दिसेल मंगळ व गुरु हे उच्चीचे किंवा पूर्णबलयुक्त स्वगृहींचे असतील किंवा चतुर्थस्थानीं शुक्र किंवा शनियुक्त शुक्र असेल तर ती स्त्री अत्यंत सधन अशा वराला वरील त्याशीं चंद्र, बुध किंवा शुक्र असतां ते कन्येला सुखसौभाग्य देणारे आहेत तात्पर्य, एवढीं, सप्तम व अष्टमस्थानीं स्त्रियांना पापग्रह नसावे किंवा तेथ पापग्रहाची दृष्टि नसावी तसेंच, पंचमस्थान शुभग्रहांनीयुक्त किंवा दृष्ट असावे आतां विषकन्यायोग सांगतों रविवारीं किंवा शनिवारीं द्वितीया तिथि व आश्लेषा नक्षत्र असतां, शनिवारीं सप्तमी तिथि व कृत्तिका नक्षत्र असता, मंगळवारीं सप्तमी किंवा द्वादशी तिथि व शततारका नक्षत्र असता अथवा रविवारीं विशाखा नक्षत्र द्वादशीयुक्त असता अशा योगावर, ज्या कन्येचा जन्म होईल तिला विषकन्या म्हणावी तसेंच लग्नीं शनि, पंचमस्थानीं रवि व नवमस्थानीं मंगळ असे ग्रह असतां किंवा लग्नीं एक पापग्रह व तेथच दोन शत्रुक्षेत्रींचे शुभग्रह असा योग असतां ती विषकन्या जाणावी विषकन्या योग असतां ती स्त्री शोकमग्न, मृतसंतति व भाग्यहीन होते असें मानिलेलें आहे परंतु याला एक अपवाद आहे तो असा कीं, जन्मलग्नापासून किंवा जेथ चंद्र असेल त्या स्थानापासून सप्तम स्थानाचा स्वामी शुभग्रह असेल, सप्तमांत असेल किंवा स्वक्षेत्रींच असेल तर विषकन्या दोष, अनपत्यत्व किंवा वैधव्य दोष या सर्वांचा तो परिहार करितो जिचें जन्मलग्न समराशी असून तेथ बलिष्ठ चंद्र, बुध, गुरु व शुक्र हे ग्रह असतील ती स्त्री अत्यंत श्रद्धावान् व गुणवान् होईल हेच ग्रह कर्कलग्नीं असतील तर ती स्त्री विख्यात व सुप्रतिष्ठित होईल तिच्या सप्तमस्थानीं शुक्र असेल किंवा कर्कराशीचा मंगळ असेल किंवा शुक्र मंगळ हे परस्पराच्या अंशांत असतील किंवा एकस्वामी राशि किंवा मंगळ

असेल किंवा लग्न अथवा चंद्र पापग्रहांच्या कर्तरींत असेल किंवा लग्नेश व सप्तमेश हे पापवर्गीचे असतील तर ती स्त्री अवश्य कुमार्गगामी होईल. ज्या स्त्रीला चतुर्थस्थानीं रवि किंवा शनि असतो तिला दूध कमी असतें व चंद्र किंवा बुध असतो तिचे पीनस्तन असतात.

## ग्रहांच्या दशांचीं फलें.

सूर्याच्या दशेमध्यें प्रवास, बंधुयोग, उद्विग्नता, रोगभय व संचित धनाचा नाश होतो. चंद्राच्या दशेंत ऐश्वर्यलाभ, सत्कीर्ति मान, वस्त्रांची वृद्धि आणि विविधभोगसौख्य प्राप्त होतें. मंगळाच्या दशेंत ज्वरभय, चिंता, कष्ट, अग्नि-पासून पीडा, द्रव्यव्यय इत्यादि प्रकार घडतात. राहूच्या दशेंत दैन्य चिंता, कष्ट व बंधन हीं प्राप्त होतात. गुरूच्या दशेंत स्थिरचित्तवृत्ति, धर्मश्रद्धा, सुसंगति, शास्त्राध्ययन, आरोग्य व धनधान्यसमृद्धि होते. शनीच्या दशेंत मिथ्यापवाद, आप्तइष्टांशीं कलह, व धननाश होतो. बुधाच्या दशेंत सुंदरस्त्री-सौख्य, विलासभोग, धनप्राप्ति व ईश्वरध्यान घडतें. केतूच्या दशेंत स्त्रीवियोग द्रव्यहानि, प्रवास व शरीरकष्ट होतात. शुक्राच्या दशेंत अधिकाराची प्राप्ति, धनसमृद्धि, पुत्रपौत्र व शरीरसौख्य हीं मिळतात. महादशा व अंतर्दशा यांचीं फलें सारखींच शुभाशुभ जाणावीं

## लग्नकुंडलीवरून जन्मकाल सांगणें.

कुंडली पाहिल्याबरोबर गणिताच्या सहाय्यानें जन्मकालाचें अनुमान करितां येतें. ही गोष्ट फारशी कठीण आहे असें नाहीं. पुष्कळ लोक हें सहज सांगूं शकतात. परंतु ज्यांस तें सांगतां येत नाहीं त्यांच्यासाठीं पुढील माहिती देतों. जन्मकाल दिवसा आहे कीं रात्रीं आहे हें प्रथम ठरवावें. ही गोष्ट रवीवरून ठरवितां येते. कुंडलीच्या दशमस्थानांत मध्यान्हीं सूर्य असतो व चतुर्थस्थानांत मध्यरात्रीं पाताळांत असतो. हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्या मानानें कुंडलीच्या प्रथमस्थानीं उजाडतां रवि असेल व सप्तमस्थानीं सूर्यास्तसमयीं असेल हें उघड आहे. ह्यावरून प्रथमस्थानी सूर्य असतां सूर्योदयाचे सुमारास, द्वादशस्थानीं असतां सकाळीं आठाचे सुमारास, एकादशस्थानीं असतां दहाचे सुमारास, दशमस्थानीं असतां मध्यान्हीं, नवमस्थानीं असतां दुपारीं दोन वाजतां, अष्टम-स्थानीं असतां चार वाजतां, सप्तमस्थानीं असतां सूर्यास्ताचे सुमारास, षष्ठस्थानीं असतां रात्रीं आठ वाजतां, पंचमस्थानीं असतां रात्रीं दहा वाजतां, चतुर्थस्थानीं असतां मध्यरात्रीं, तृतीयस्थानीं असतां पहांटे दोन वाजतां व द्वितीयस्थानीं रवि असतां पहांटे चार वाजतां जन्म सांगावा. परंतु हें स्थूलमान आहे एवढें मात्र ध्यानांत ठेवावें. आतां जन्मतिथि कशी काढावी हे सांगतो. अमावास्येस चंद्र-

सूर्य एकत्र असतात व सूर्यापुढे चंद्र जात असतो हे पूर्वी सांगितलेंच आहे तसेंच, एका राशीस चंद्र २। दिवस म्हणजे सुमार २। तिथि असतो हेंही मागें सांगितलेंच आहे म्हणून सूर्य व चंद्र यांच्यात जितकीं स्थानें अंतर असेल त्याच्या सुमारें २। पट तिथि जन्मकाळीं होऊन गेल्या असल्या पाहिजेत हें स्पष्ट आहे याप्रमाणे जन्मतिथि काढावी सूर्यापासून पुढें सहा राशी म्हणजे सातव्या राशीवर पौर्णिमेस चंद्र असतो म्हणून कुंडलींत सूर्यापासून सातव्या स्थानाच्या आत चंद्र असता शुक्लपक्षांत व त्याच्यापुढे असता कृष्णपक्षांत जन्म सांगावा ह्याप्रमाणे एखादा पौर्णिमा ठरली म्हणजे महिना काढता येतो कारण चित्रा नक्षत्री चैत्र पूर्णिमा, विशाखावर वैशाख पूर्णिमा होते इत्यादि भाग सांगितलेच आहे व नक्षत्रावरून चंद्राची रास समजते जसें, चैत्री पूर्णिमा कन्याराशीवर, वैशाख पूर्णिमा तूळराशीवर, ज्येष्ठ पूर्णिमा वृश्चिक राशीवर, आषाढपूर्णिमा धनुराशीवर, श्रावण पूर्णिमा मकर राशीवर, भाद्रपद पूर्णिमा कुंभराशीवर, आश्विन पूर्णिमा मीन किंवा मेषराशीवर, कार्तिकी पूर्णिमा मेष किंवा वृषभराशीवर, मार्गशीर्ष पूर्णिमा वृषभ अथवा मिथुन राशीवर, पौष पूर्णिमा मिथुन किंवा कर्कराशीवर, माघ पूर्णिमा कर्कराशीवर, व फाल्गुन पूर्णिमा सिंह राशीवर होते ह्याप्रमाणे कुंडलीत सूर्याचे स्थानापासून सातव्या स्थानीं जी राशि असेल तिचा वरील नियमाप्रमाणे विचार करून महिना काढावा गुरु, शनि व राहु ह्यावरून जन्मशक ठरवावा गुरूला एका राशींतून दुसऱ्या राशीत जाण्यास सुमार एक वर्ष, शनीला अडीच वर्षे व राहूला दीड वर्ष लागतें ह्याप्रमाणें तीन ग्रहांच्या प्रदक्षिणा काल विचारांत घेऊन व चालू सवंत्सराच्या पंचांगात ते ते ग्रह कोणत्या राशीस आहेत हे पाहून जन्मशक सांगावा एकाच ग्रहावरून मात्र जन्मशक ठरवू नये कारण तसें केल्यानें एखाद्या प्रसंगीं केलेलें अनुमान समूळ चुकण्याचा संभव आहे, म्हणून जन्मशक सांगतांना विशेष धोरण ठेवावे लागतें ह्याप्रमाणे सतव्या कुंडलीवरून आपली जन्म वेळा प्रथम ठरवावी, म्हणजे वरील रीति चांगली ध्यानांत राहून दुसऱ्याचा जन्मकाळ बिनचूक सांगता येईल

## गोचरीचे (चाल) ग्रह.

गौरादित्यस्तस्य चारश्चंद्रादेरुपलक्षणात् ।
तत्फलं गोचरफलं ग्रहा यच्छति जन्मभात् ॥ २३ ॥

गो म्हणजे सूर्य, आणि चर म्हणजे संचार म्हणून सूर्यादि नवग्रहांच्या संचारानें म्हणजे परिभ्रमणानें जें फल मिळतें त्यास गोचरफल म्हणतात गोचर या शब्दांत चंद्रादि ग्रहांच्याही उपलक्षणाचा अंतर्भाव होतो गोचरीचे म्हणजे चालू ग्रह पाहण्याची पद्धति अशी आहे कीं, आपली जी राशी असेल त्या राशीपा

अनुक्रमांक हे प्रथमस्थान धरून चालू पंचांगातील चालू पत्रवड्याच्या कुंडली-वरून ग्रह मोजावे. ह्या ग्रहांचीं फळें पंचांगांत शेवटीं दिलेलीं असतात त्यांत पहिला रवि असतां स्थाननाश म्हणजे गमन, दुसरा रवि असतां भय, इत्यादि लिहिलेलें असतें. स्थलसंकोचास्तव तीं सर्व फलें येथें दिलीं नाहींत. परंतु कोणता ग्रह कोणत्या स्थानीं शुभफलदायक असतो हे सामान्यतः पुढें लिहिल्याप्रमाणें जाणावें.

## गोचरीचे शुभाशुभग्रह.

सूर्यः षट् त्रिदशस्थितस्त्रिदशषट् सप्ताद्यगश्चंद्रमाः
जीवः सप्तनवद्विपंचमगतो वक्रार्कजौ षट्त्रिगौ ॥ २३ ॥
सौम्यः षड्द्विचतुर्दशाष्टमगतः सर्वेप्युपांते शुभाः
शुक्रः सप्तमषड्दशार्क्षसहितः शार्दूलवत् त्रासकृत् ॥ २४ ॥

जन्मराशीपासून ६।३।१० ह्या स्थानीं सूर्य असतां, ३।१०।६।७।११ ह्या स्थानीं चंद्र असतां, ७।९।२।५ ह्या स्थानीं गुरु, ६।३ ह्या स्थानीं मंगळ व शनि असतां व ६।२।४।१०।८ ह्या स्थानीं बुध असतां शुभफलदायक होय. कोणताही ग्रह जन्म-राशीपासून अकराव्या स्थानीं असतां विशेष शुभ जाणावा. शुक्र ७।६।१० ह्या स्थानीं असतां सिंहाप्रमाणें भयजनक होतो म्हणून तो अशुभ समजावा. त्यावाचून अन्यत्र असतां शुभफलप्रद होतो. ह्याप्रमाणें जरी ग्रहांचीं शुभस्थानें येथें सांगितलीं आहेत तरी तीं तीं स्थानें पुढें लिहिल्याप्रमाणें दुसऱ्या ग्रहाच्या वेधानें विद्ध नसतील तरच शुभ फल देतात असें समजावें. पितापुत्राचा मात्र परस्परास वेध नसतो. जसें सूर्याचा पुत्र शनि आणि चंद्राचा पुत्र बुध होय म्हणून सूर्य-शनीचा किंवा चंद्रबुधाचा परस्परास वेध नाहीं. इतर सर्वांचा वेध परस्परास होतो.

| | शुभस्थान. | वेधस्थान. |
|---|---|---|
| रवि | ६ | १२ |
| | १० | ४ |
| | ३ | ९ |
| | ११ | ५ |
| चंद्र | १० | ४ |
| | ३ | ९ |
| | ११ | ८ |
| | १ | ५ |
| | ६ | १२ |
| | ७ | २ |
| बुध | ८ | १ |
| | १० | ८ |
| | ११ | १२ |

| | शुभस्थान | वेधस्थान |
|---|---|---|
| बुध | २ | ५ |
| | ४ | ३ |
| | ६ | ९ |
| मंगळ शनि राहु केतु | ६ | ९ |
| | ११ | ५ |
| | ३ | १२ |
| गुरु | ५ | ४ |
| | २ | १२ |
| | ९ | १० |
| | ७ | ३ |
| | ११ | ३ |

| | शुभस्थान | वेधस्थान |
|---|---|---|
| शुक्र | १ | ८ |
| | २ | ७ |
| | ३ | १ |
| | ४ | १० |
| | ५ | ९ |
| | ८ | ५ |
| | ९ | ११ |
| | १२ | ६ |
| | ११ | ३ |

स्पष्टीकरण-६ वा रवि शुभस्थानाखालीं लिहून त्याच्या समोर त्याचें वेध स्थान १२ असें लिहिलें आहे. याचा अर्थ असा कीं, जन्मराशीपासून सहावा रवि जरी शुभ आहे तरी बाराव्या स्थानीं कोणताही ग्रह ( अर्थात शनीवांचून ) नसेल तरच तो रवि शुभ फल देतो. शनीचा आणि रवीचा पितापुत्र संबंध असल्यामुळें रवीला शनि कधींही वेधकारक होत नाहीं, म्हणून येथें 'अर्थात शनीवांचून' असें म्हटलें आहे. तसेंच, वेधस्थानीं एखादा ग्रह असून शुभस्थानीं वेधकारक कोणी ग्रह असतां वेधस्थानीं अशुभ ग्रह असला तरीही तो शुभ फल देतो. याला वामवेध असें म्हणतात. उदाहरणार्थ, बारावा रवि अशुभ आहे तरी षष्ठस्थानीं वेधकारक ग्रह असतां तो वामवेधामुळें शुभफल देतो. याचप्रमाणें इतर सर्व ग्रहांविषयीं जाणावें. शुक्लपक्षात २।५।९ या स्थानीं चंद्र असता शुभ होय. त्याला वेधस्थानें नाहींत.

## ग्रहांचा फलदायक काल.

सूर्यः पंचदिनं शशी त्रिघटिकां भौमोष्ट वै वासरं ।
सप्ताहं त्युशना बुधश्च त्रिदिनं मासद्वयं वै गुरुः ॥ २५ ॥
षण्मासान् रविजस्तथैव सततं स्वर्भानु मासद्वयं ।
केतोश्चैव तथाफलं परिमितं ज्ञेयं ग्रहाणां फलम् ॥ २६ ॥

रवि कोणत्याही राशींत गेल्यावर पहिल्या ५ दिवसांत फल देतो. चंद्र शेवटच्या ३ घटिका फल देतो. मंगळ पहिल्या ८ दिवसांत, बुध सर्वकाल, गुरु मध्यभागीं दोन महिने, शुक्र मध्यभागीं ७ दिवस, शनि शेवटचे ६ महिने व राहु केतु अंतींचे २ महिने शुभ किंवा अशुभ फळें देतात.

## ग्रह कोणत्या पायीं आहे हें पाहणें.

जन्मे रसे चंद्रसुवर्णपादो द्विपंचनंदा रजतः शुभः स्यात् ।
त्रिःसप्तदिक् वेदादि ताम्रपादश्चतुर्थमष्टांत्यम लोहपादः ॥ २७ ॥
सौरी लोहः शुभः प्रोक्तो हेमपादश्च वै गुरुः ॥
रजते चंद्रशुक्रौ च बुधश्चान्यश्च ताम्रके ॥ २८ ॥

ज्या दिवशीं एका राशींतून कोणताही ग्रह दुसऱ्या राशींत जात असेल त्या दिवशीं चंद्र ज्या राशीस असेल त्या चंद्राच्या राशीपर्यंत आपल्या राशीपासून मोजावें आणि जी संख्या येईल त्यावरून पालटणारा ग्रह आपल्याला कोणत्या पायीं आहे हें पहावें. जसें-आपल्या राशीपासून पहिला, सहावा किंवा अकरावा चंद्र असतां एखादा ग्रह बदलला तर पालटणारा ग्रह आपल्याला सोन्याच्या पायीं आहे असें जाणावें. दुसरा, नववा व पांचवा चंद्र असतां रुप्याचे पायीं, तिसरा, सातवा व दहावा चंद्र असतां तांब्याचे पायीं आणि

आपल्या राशीपासून चवथा, आठवा व बारावा चंद्र असतां ग्रह बदलेल तर लोखंडाचे पायानें ग्रह आला असें जाणावें. सामान्यतः रौप्य आणि ताम्र पादानें आलेला ग्रह शुभ, स्वर्णपायीं मध्यम व लोहपदीं आलेला ग्रह कष्टदायक होय. परंतु शनि लोखंडाचे पायीं, गुरु सोन्याचे पायीं, चंद्र, शुक्र, व बुध हे रुप्याचे पायीं आणि रवि, मंगळ व राहुकेतु हे तांब्याचे पायीं आहे असतां शुभफलदायक होतात. हा ग्रह पाहण्याचा प्रकार कोणत्याही प्राचीन ज्योतिष ग्रंथांत असेल असें वाटत नाहीं. कारण, वरील पद्यरचनेचा विचार केला तर ती एखाद्या सामान्य मनुष्यानें रचलेली असावी असें दिसतें. परंतु अशा रीतीनें ग्रह पाहण्याचा कित्येक लोकांचा संप्रदाय आहे. आणि तो सर्वथैव निराधार आहे असेंही म्हणतां येत नाहीं. कारण चंद्रबलाच्या आश्रयानें सर्व ग्रह असतात, ह्या प्राचीन मतानुसार वरील कल्पना अगदीं बरोबर आहे. ह्या संबंधीं वसिष्ठोक्ति अशी आहे कीं,

(गीति) हिमकरवीर्याद्वीर्यं संश्रित्यैव ग्रहाश्च साधुफलं ।
दधतींद्रियाणि मनसा सहितानि यथा स्वकार्यदक्षाणि ॥ २९ ॥

अर्थ-जशीं सर्व इंद्रियें मनाच्या आश्रयानें आपापलीं कार्यें करण्यांत प्रवृत्त असतात त्याप्रमाणें संपूर्ण ग्रह चंद्रबलाश्रयानें शुभफल देतात. ह्या कल्पनेस अनुसरून वरील श्लोक असतील असें वाटतें.

## शनीची साडेसाती.

ज्या राशीला शनि असतो त्या राशीला अर्थात तो पीडा देतो, त्याचप्रमाणें त्या राशीच्या मागची एक रास व पुढची एक रास अशा दोन राशींवर त्याची दृष्टि असते; म्हणजे तो एकया राशींत असून एकया वेळीं तीन राशींला पीडा देतो. शनि प्रत्येक राशींत अडीच वर्षें असतो हें आम्ही एकदा सांगितलेंच आहे, अर्थात् प्रत्येक राशीला शनीची पीडा साडेसात वर्षें असते, म्हणून शनीच्या ह्या फेऱ्याला साडेसाती म्हणतात. उदाहरणार्थ, एकाची मेष रास आहे असें समजा. जेव्हां मीनराशीला शनि असेल तेव्हां मेषराशीच्या साडेसातीला आरंभ होतो, आणि मीन, मेष आणि वृषभ अशा तीन राशींतून मिथुन राशींत शनि जाईपर्यंत मेषराशीला साडेसाती असते. म्हणजे कोणत्याही राशीपासून बारावा, पहिला व दुसरा शनि असतां त्या राशीला साडेसाती आहे असें समजावें. एकदां साडेसाती येऊन गेली म्हणजे तीस वर्षांनीं त्याच राशीला पुनः येते. शनि हा ग्रह सर्व ग्रहांमध्यें तेजानें व गतीनें अत्यंत मंद आहे आणि म्हणूनच शनिवाराला मंदवार अशी संज्ञा आहे. तेव्हां पायांचा जड, तेजानें मंद व रंगानें काळा असा हा शनिराया ज्याच्या राशीस येतो त्याची सर्वस्वी हानि करतो हें त्याच्या

स्वभावाला अनुरूपच आहे. साडेसातीमध्यें कोणाचा धननाश, कोणाचा स्त्रीनाश किंवा कोणाचा पुत्रनाश असें कांहींना कांहीं तरी विशेष दुःखजनक घडल्यावांचून रहात नाहीं, असा पुष्कळ अनुभव आहे. परंतु जन्मकुंडलींत शनि शुभस्थानीं असतां त्या मनुष्याला साडेसातीची पीडा सौम्य होते. साडेसातींत आरंभीं किंवा शेवटीं ६।७ महिने शनि शुभाशुभ फळ देतो.

## जन्म टिप्पणाचा नमुना.

शके १८३२ माघशुक्ल ५ शनिवार रात्रीं ७ वाजून १० मिनिटांनीं एकाचा जन्म झाला आहे असें कल्पून पुढील जन्मटिप्पण लिहिलें आहे.

श्री.

श्रीगणेशायनमः ॥ स जयति सिंधुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम् ॥ वासरमणिरिवतमसां राशिन्नाशयति विघ्नानाम् ॥ १ ॥ अथ स्वस्ति श्रीमन्नृपविक्रमार्कसमयातीतसंवत् १९६७ दुंदुभिनामसंवत्सरे तथाच श्रीमन्नृपशालिवाहन शके १८३२ साधारणनामसंवत्सरे उत्तरायणे शिशिरर्तौ माघमासे शुक्लपक्षे तिथौ ५ घट्यः १२ पलानि ४८ पर पष्ठी जन्मतिथौ शनिवासरे रेवती जन्मनक्षत्रे घ. ४७ प. ४६ साध्य जन्मयोगे घ. ५१ प. ४० तात्कालिके कौलवकरणे मीनराशिस्थितेचंद्रे गजयोनौ देवगणे विप्रवर्णे सिंहवर्गे श्रीसूर्यभाद्दिनभं पुरपाकारचक्रे भुजस्थिते पूर्वभागयुंजायां नारिहंसके अंत्यनाडीस्थिते श्रीफणीश्वरचक्रे मकरसंक्रांतेर्गतांशाः २१ कलाः ४१ विकलाः ५१ एवं पंचांगशुद्धावत्रदिने श्रीमन्मार्तंडमंडलोदयादिष्टघ. ३१ प. ३३ तथा रात्रिगतासु घटिषु ३ पलेषु २० समये सिंहलग्ने वहमानायामस्यां शुभग्रहनिरीक्षितकल्याणवतीवेलायां ब्राह्मणकुलोत्पन्नस्य मेघश्यामशर्मणः भार्यां भपकुलशुद्धकर्त्री सौदामिनी नाम्नी कुक्षौ पुत्ररत्नमजीजनत् । अस्य शिशोः रेवती

१ पत्रिकेंत आरंभीं लिहावयाचीं मंगलाचरणाचीं पद्यें जातकाभरणग्रंथांत अनेक दिलेलीं आहेत. २ सूर्योदयीं जी तिथि असेल ती जन्मकालापूर्वींच संपली असतां प्रथम सूर्योदयाच्या वेळची तिथि घटिकापळांसह दाखवून नंतर पुढील जन्मतिथि पत्रिकेंत लिहितात. याचप्रमाणें नक्षत्रयोगाविषयीं जाणावें. ३ कोणत्या नक्षत्राचा कोणता गण, नाडी वगैरे असते हें या पुस्तकांत मागें पृष्ठ ७९ मध्यें सांगितलें आहे. ४ रेवतीपासून मृगापर्यंत ६ नक्षत्रें पूर्वभाग, पुढें अनुराधापर्यंत १२ नक्षत्रें मध्यभाग व शेवटीं उत्तराभाद्रपदापर्यंत ९ नक्षत्रें अंत्यभाग याप्रमाणें नक्षत्रांच्या युंजा जाणाव्या. त्यास वचन–'अंत्यभाद्रसभंपूर्वा रौद्राद्द्वादशमध्यमा । ज्येष्ठादेर्नवभान्यंत्यायुंजैवं त्रिविधा मता' ५ मेषापासून मीनापर्यंत अनुक्रमानें अग्नि, भूमि, वायु आणि जल हींच १२ राशींचीं तत्वें पुनः पुनः मोजावीं. त्यास वचन–'मेषादग्निर्मही वायुर्नीरं चेति यथाक्रमम् । गणयेद्रामवर्गो च सुहृद्वैरमतोऽन्यथा' ।

जन्मनक्षत्रस्य तृतीयचरणानुगमवकहडाचक्रानुसारेणाभिधानं धारूदत्तः । अस्य बालकस्य घातवारः शुक्रः, घाततिथयः ५।१०।१५ घातनक्षत्रं आश्लेषा, घातचंद्रः १२ एतानि प्रयाणनूतनवस्त्रालंकारादिधारणेषु वर्ज्यम् । असौ देवप्रसादाद्बालको दीर्घायुर्भूयात् ॥ शुभंभवतु ॥

वंशो विस्तरतां यातु कीर्तिर्यातु महद्यशः ॥ आयुर्विपुलतां यातु यस्यैषा जन्मपत्रिका ॥ शुभंभवतु ॥

---

## मुहूर्तादिमिश्रप्रकरणम् ४.

व्यवहारांतील प्रत्येक कृत्य करण्याविषयीं आमच्या धर्मशास्त्रकारांनीं ज्या कांहीं नियमित वेळा ठरविल्या आहेत त्यांस मुहूर्त अशी संज्ञा आहे. आणि उक्त मुहूर्तांवर विवक्षित कृत्यें केलीं असतां इष्टफलप्राप्ति होते, असें सांगितलेलें आहे; म्हणून मुहूर्त पाहून प्रत्येक महत्वाचें कृत्य करावें. पुढें निरनिराळ्या कामांकरितां जे मुहूर्त सांगितले आहेत, त्यांत ज्या ठिकाणीं फक्त नक्षत्रेंच दिलीं असतील त्या ठिकाणीं असें समजावें कीं, इतर कुयोग म्हणजे व्यतीपात, वैधृति, दग्धयोग, मृत्युयोग, मंगळवार, शनिवार, रिक्तातिथि, अमावास्या इत्यादि नसतील तरच तीं नक्षत्रें त्या त्या कार्यास उक्त आहेत. कोणत्याही कार्यास मुहूर्त पहाणें असल्यास पहिल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें शुभाशुभ तिथिवारनक्षत्रादिक पाहून नंतर मुहूर्त ठरवावा. तात्पर्य, सर्व कार्यांस पंचांगशुद्धि असावी.

### प्रयाणास मुहूर्त.

महत्वाच्या कामाकरितां एका स्थलाहून दूर दुसऱ्या स्थलीं जाणें ह्याला प्रयाण म्हणतात. प्रयाणास खालीं लिहिलेल्या तिथि, नक्षत्रें व वार उक्त आहेत असें जाणावें. एका दिवसाच्या प्रवासास मुहूर्ताची आवश्यकता नाहीं.

नक्षत्रें-धनिष्ठा श्रवणो हस्तोऽनुराधा रेवतीद्वयम्
मृगः पुनर्वसुः पुष्यः श्रेष्ठान्येतानि भानि च ॥ १ ॥
मूलं पूर्वात्रयं ज्येष्ठा रोहिणी शततारका ।
उत्तराणां त्रयं याने मध्यान्येतानि भानि च ॥ २ ॥
चित्रात्रयं मघाश्लेषा कृत्तिकार्द्रा भरण्यपि ।
वर्ज्यान्येतानि धिष्ण्यानि यात्रायां जन्मभं तथा ॥ ३ ॥
वार-अर्के क्लेशमनर्थकं च गमने सोमे च बंधुप्रियं ।
भौमेऽनलतस्करज्वरभयं प्राप्नोति चार्थं बुधे ॥
क्षेमारोग्यसुखं करोति च गुरुर्लाभं च शुक्रः शुभो ।
मंदे बंधनहानिरोगमरणान्युक्तानि गर्गादिभिः ॥ ४ ॥

---

१ अवकहडाचक्र पृष्ठ ८६ पहा. २ पुढें मुहूर्तप्रकरणीं घातचक्र पहा.

तिथि–न षष्ठी नच द्वादशी नाष्टमी नो ।
सितायातिथिः पूर्णिमामानरिक्ता ॥

धनिष्ठा, श्रवण, हस्त, अनुराधा, रेवती, अश्विनी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हीं नऊ नक्षत्रें प्रयाणास उत्तम मानिलेलीं आहेत. तसेंच मूळ, तिन्ही पूर्वा, ज्येष्ठा, रोहिणी, शततारका आणि तिन्ही उत्तरा हीं नक्षत्रें मध्यम होत. यावांचून बाकी जीं नक्षत्रें राहिलीं म्हणजे चित्रा, स्वाती, विशाखा, मघा, आश्लेषा, कृत्तिका, आर्द्रा, भरणी व तसेंच जन्मनक्षत्र हीं मात्र प्रयाणास वर्ज्य करावीं. परंतु विशेष अडचणीच्या प्रसंगीं ह्या कनिष्ठ नक्षत्रीं जाणे असतां निदान पहिल्या २१ घटिका तरी वर्ज्य करून नंतर प्रयाण करावें. प्रयाणाला सोम, बुध, गुरु आणि शुक्र, हे वार प्रशस्त होत. ह्यावांचून इतर वारीं प्रयाण करणें अनिष्ट मानिलेलें आहे. तसेंच, आपल्या घातवारींही प्रयाण करूं नये. घातचक्राची माहिती पाच प्रकरणांत पुढें दिली आहे. कित्येक ठिकाणीं बुधवारीं प्रयाण करणें अनिष्ट समजतात, परंतु ज्योति.शास्त्रांत बुधवार शुभ मानिलेला आहे. जरूरीच्या प्रसंगीं अशुभवारीं प्रयाण करणें असल्यास रात्रीं प्रयाण करावें, म्हणजे वाराचा दोष रहात नाहीं. तिथींपैकीं षष्ठी, अष्टमी, द्वादशी, शुक्लप्रतिपदा, पूर्णिमा, अमावास्या आणि रिक्तातिथि म्हणजे ४।९।१४ इतक्या तिथि प्रयाणास नेहमीं वर्ज्य कराव्या. प्रयाण दिवशीं आपल्या जन्मराशीला चंद्रबल असावें. चंद्रबलाविषयीं पृष्ठ ३४ मध्यें मागें लिहिलें आहेच तसेंच वैधृति, व्यतीपात, दग्धयोग, मृत्युयोग, इत्यादि वर्ज्य करून पंचांगशुद्धि असेल त्या दिवशीं प्रयाण करावें. म्हणजे कार्यसिद्धि होऊन मनुष्य सुखानें स्वस्थानीं लवकर परत येतो.

## प्रयाणास दिशापरत्वें चंद्रमुख.

मेषे च सिंहे धनु.पूर्वभागे वृषे च कन्या मकरे च याम्ये ।
तुले च कुंभे मिथुने प्रतीच्यां कर्कालिमीने विधुरुत्तरस्याम् ॥ ५ ॥
संमुखोह्यर्थलाभाय दक्षिणे सुखसंपदे ।
पृष्ठतः प्राणनाशाय वामे चंद्रे धनक्षयः ॥ ६ ॥

प्रयाणदिवशीं कोणत्या राशीस चंद्र आहे हें प्रथम पहावें मेष, सिंह, धनु या राशींचा चंद्र असला म्हणजे पूर्वेस असतो. वृषभ, कन्या, मकर या राशींचा दक्षिणेस, कुंभ, तूळ, मिथुन यांचा पश्चिमेस, आणि कर्क, वृश्चिक आणि मीन या राशींचा चंद्र उत्तरेस असतो. सन्मुख चंद्र असतां प्रयाण केलें तर अर्थलाभ व सौख्यप्राप्ति, उजव्या बाजूस चंद्र असतां सुखसंपदा, पृष्ठभागीं चंद्र असतां प्राणनाश व डाव्या बाजूस चंद्र असतां प्रयाण केलें तर धनक्षय होतो, याकरितां चंद्रमुख पाहून गमन करावें. संमुखचंद्र म्हणजे ज्या दिशेस

आपणाला जावयाचें असेल त्या दिशेचा चंद्र असला म्हणजे तो संमुख चंद्र होतो. उदाहरणार्थ, प्रयाण दिवशीं धनु राशीचा चंद्र आहे, व आपणास उत्तरेकडे जावयाचें आहे, असें समजा. धनुराशीचा चंद्र पूर्वेस असतो हें वर सांगितलेंच आहे, तेव्हां उत्तरेकडे जाणाऱ्या मनुष्याला पूर्वेचा चंद्र उजव्या बाजूस आला किंवा पूर्वेसच जाणें असेल तर संमुख आला. याचप्रमाणें इतर दिशांचे चंद्र पहावे. संमुख चंद्र असतां प्रयाण केलें तर नक्षत्र, वार व इतर कुयोग यांचा दोष रहात नाहीं.

## घबाडमुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रं त्रिगुणं तिथिमिश्रितम् ।
नवभिस्तु हरेद्भागं त्रीणि शेषं घबाडकम् ॥ ७ ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत मोजून जीं नक्षत्रें येतील त्यांची तिप्पट करावी. त्या अंकांत त्या दिवशीं जी तिथि असेल ती मिळवावी आणि त्या बेरजेस नवांनीं भागावें. बाकी तीन उरले तर घबाड मुहूर्त आहे असें समजावें. घबाडमुहूर्तावर प्रयाण केलें असतां कार्यसिद्धि होऊन मोठा लाभ होतो.

## अडल, भ्रमण आणि हैवर योग.

रविभात्साभिजिच्चांद्रे सप्तह्यद्रिशेषके ।
आडलोथ त्रिषट्शेषे भ्रमो नेष्टौ यमे त्विमौ ॥ ८ ॥
चंद्रभं सूर्यभाद्युक्तं पक्षादितिथिवासरैः
नवाप्तं सप्तशेषे तु हैवरैः स्याच्छुभागमे ॥ ९ ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत अभिजित्नक्षत्रासह नक्षत्रें मोजून जितके अंक होतील त्या संख्येला ७ नीं भागावें. बाकी २ अथवा ७ राहिली तर अडलदोष आणि ३ किंवा ६ बाकी असतां भ्रमणदोष आहे असें समजावें. प्रयाणाला भ्रमणदोष अशुभ आणि अडलदोष मध्यम जाणावा.

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून त्या अंकांत चालू पंधरवड्याच्या प्रतिपदेपासून तिथि आणि वाराचे अंक मिळवून त्या बेरजेला ९ नीं भागावें. बाकी ७ राहिली तर हैवरनामकयोग होतो. हा योग प्रयाणास फारच शुभ मानिलेला आहे. येथें वाराचे अंक मोजणें ते रविवार १ सोमवार २ या पद्धतीनें मोजावे.

## त्र्यंक मुहूर्त.

तिथयः पक्षगुणिताः सप्तभिर्भाजिताश्च ताः ।
वाराः स्युर्वह्निगुणिता वसुभिश्चैव भाजिताः ॥ १० ॥

चतुर्गुण्यानि भान्यंगमाजितानि यथाक्रमम् ।
पीडा स्यात्प्रथमे शून्ये मध्यशून्ये महद्भयम् ।
अंत्यशून्ये तु मरणं त्र्यंके च विजयो भवेत् ॥ ११ ॥

ज्या तिथीस प्रयाण करणें असेल त्या तिथीची दुप्पट करून त्या अंकांस सातांनीं भागावें. त्या दिवशीं जो वार असेल त्याची तिप्पट करून त्या अंकांस आठांनीं भागावें. नंतर त्या दिवशीं जें नक्षत्र असेल त्या नक्षत्रासुद्धां अश्विनी नक्षत्रापासून नक्षत्रें मोजून जे अंक येतील त्यांची चौपट करून त्या अंकांस सहांनीं भागावें. जी बाकी राहील तिचीं फळें. तिथीला भागतांना बाकी शून्य असेल तर मार्गांत पीडा, वाराला भागतांना शून्य राहिलें तर भीति आणि नक्षत्राला भागतांना शून्य राहिलें तर मृत्युसम दुःख प्राप्त होईल असें जाणावें; परंतु तिन्ही ठिकाणीं बाकी अंक राहिले तर त्यास त्र्यंक मुहूर्त म्हणतात. त्यावर प्रयाण केलें असतां विजय प्राप्त होतो.

## घातचक्र.

घातचंद्रो घातवारो घातनक्षत्रमेव च ।
यात्रायां वर्जयेत्प्राज्ञो ह्यन्यकर्मसु शोभनम् ॥ १२ ॥

घातचंद्र, घातवार, घाततिथि घातनक्षत्र हीं प्रयाणाला व नवीन वस्त्र, नवीन अलंकार इत्यादि धारण करण्याला वर्ज्य करावीं. कोणत्या राशीचा कोणता घातवार वगैरे असतो हें खालीं दिलेल्या कोष्टकावरून ध्यानांत येईल.

मेषे रविर्मघा मोक्ता षष्ठी प्रथमचंद्रमाः ।
वृषभे पंचमो हस्तश्चतुर्थी शनिरेव च ॥ १३ ॥
मिथुने नवमः स्वाती अष्टमी चंद्रवासरः ।
कर्के द्विरनुराधा च बुधः षष्ठी प्रकीर्तिता ॥ १४ ॥
सिंहे षष्ठश्चंद्रमाश्च दशमी शनिमूलके ।
कन्यायां दशमश्चंद्रः श्रवणः शनिरष्टमी ॥ १५ ॥
तूले गुरुर्द्वादशी स्यात् शतं तृतीयचंद्रमाः ।
वृश्चिके रेवती सप्त दशमी भार्गवस्तथा ॥ १६ ॥
धने चतुर्थो भरणी द्वितीया भार्गवस्तथा ।
मृगेऽष्टमो रोहिणी च द्वादशी भौमवासरः ॥ १७ ॥
कुंभे एकादशश्चार्द्रा चतुर्थी गुरुवासरः ।
मीने च द्वादशः सार्पं द्वितीया भार्गवस्तथा ॥ १८ ॥

| राशि. | मेष | वृषभ | मिथुन | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक | धन | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र | १ | ५ | ९ | २ | ६ | १० | ३ | ७ | ४ | ८ | ११ | १२ |
| वार | रवि | शनि | सोम | बुध | शनि | शनि | गुरु | शुक्र | शुक्र | मंग. | गुरु | शुक्र |
| नक्षत्र | मघा | हस्त | स्वाती | अनु | मूळ | श्रवण | शत. | रेव. | भर. | रोहि. | आर्द्रा | आश्ले. |
| तिथि | ६ | ४ | ८ | ६ | १० | ८ | १२ | १० | २ | १२ | ४ | २ |

## गर्गादि ऋषिमतें प्रयाणास मुहूर्त.

उषः प्रशस्यते गर्गः शकुनं च बृहस्पतिः ।
अंगिरा मनउत्साहं विप्रवाक्यं जनार्दनः ॥ १९ ॥

सूर्योदयाच्यापूर्वी पहाटेच्या ज्या पांच घटिका त्याला उषःकाल असी संज्ञा आहे, त्या वेळीं गर्गऋषीच्या मताप्रमाणें प्रयाण करणें शुभ होय. बृहस्पतीच्या मताप्रमाणें गमनकाळीं शुभ शकुन होणें हाच मुहूर्त होय. अंगिराऋषीच्या मतानें मनाला उत्साह वाटेल तीच वेळ गमनास प्रशस्त समजावी. आणि जनार्दनमतें विप्रवाक्यानुसार प्रयाण करावें.

## प्रयाणास दिशापरत्वें वारदोष.

न मंदेंदुदिने प्राचीं न गच्छेद्दक्षिणां गुरौ ।
शुक्रार्कयोर्न प्रतीचीं नोदीचीं बुधभौमयोः ॥ २० ॥

शनि आणि सोम ह्या वारीं पूर्वदिशेस गमन करूं नये. गुरुवारीं दक्षिणेस प्रयाण करूं नये. शुक्र आणि रवि ह्या वारीं पश्चिम दिशेकडे गमन करूं नये. बुध आणि मंगळ ह्या वारीं उत्तरेस जाऊं नये. ज्या दिशेस ज्या वारीं गमन करूं नये असें सांगितलें आहे त्या वारीं त्या दिशेस वारशूळाचा दोष असतो असें जाणावें.

## प्रयाणास लग्नें.

चरलग्ने प्रयातव्यं द्विस्वभावे तथा नरैः ।
लग्ने स्थिरे न गंतव्यं यात्रायां क्षेममीप्सुभिः ॥ २१ ॥

चरलग्नें म्हणजे मेष, कर्क, तूळ, मकर; आणि द्विस्वभाव म्हणजे मिथुन, कन्या, धन, मीन; अशीं आठ लग्नें कोठेंही गमन करण्यास प्रशस्त आहेत. बाकी रा-हिलेलीं चार लग्नें म्हणजे वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ हीं स्थिरलग्नें आहेत म्हणून त्या लग्नांवर प्रयाण करूं नये. विशेषतः कुंभलग्नीं किंवा कुंभांशावर मुळींच जाऊं नये. अमुक वेळेस अमुक लग्न आहे हें समजण्याची रीति मागें तिसऱ्या प्रकरणांत दिली आहे. प्रयाणसमयीं निष्पंचक लग्न असावें. निदान चोरपंचक व मृत्युपंचकरहित अशा लग्नीं गमन करावें. पंचक पाहण्याचा प्रकार मागें विवाहप्रकरणीं पृष्ठ ९२ मध्यें सांगितला आहे.

## गमनास लग्नीं शुभाशुभ ग्रह.

हित्वा सप्तमगं शुक्रं केंद्रकोणे शुभाः शुभाः ।
पापाश्चोपचये शस्ता याने नो दशमः शनिः ॥ २२ ॥
चंद्रस्तु गमने नेष्टो लग्नारिव्ययरंध्रगः ।
द्यूने पष्ठाष्टरिःफस्थो लग्नेशोपि न शोभनः ॥ २३ ॥

ज्या लग्नीं प्रयाण करावयाचें असेल त्या लग्नापासून केंद्रीं (१।४।७।१०) आणि कोणीं (९।५) शुभग्रह असतां प्रयाणाला इष्ट होत. परंतु शुक्र सप्तम स्थानीं अशुभ होय. तसेंच पापग्रह उपचयस्थानीं (३।११।६।१०) इष्ट होत; परंतु दशमस्थानचा शनि अशुभ जाणावा. १।६।८।१२ ह्या स्थानीं चंद्र असतां अशुभ समजावा; आणि लग्नस्वामी ७।६।८।१२ ह्या स्थानीं अनिष्ट होय.

## प्रस्थानविचार.

यज्ञोपवीतकं वस्त्रं मधु च स्थापयेत्फलम् ।
विप्रादिक्रमतः सर्वे स्वर्णधान्यांबरादिकम् ॥ २४ ॥
राजा दशाहं पंचाहमन्योऽहिप्रस्थितो वसेत् ।
अंग प्रस्थानके पूर्ण वस्तुप्रस्थानकेऽर्धकम् ॥ २५ ॥

आवश्यकतेमुळें अमक्याच दिवशीं गेलें पाहिजे असें असेल आणि तो दिवस प्रयाणास प्रशस्त मानिलेला असेल तर शुभदिवशीं पूर्वी प्रस्थान ठेवावें. पुढें लिहिलेल्या वस्तु दुसऱ्या ठिकाणीं ठेवून, त्या जातेवेळीं गमन कर्त्यानें बरोबर घेऊन जाणें या विधीला प्रस्थान म्हणतात. प्रस्थानवस्तु जातिपरत्वें ठरविलेल्या आहेत. असें, ब्राह्मणांनीं यज्ञोपवीत, क्षत्रियांनीं शस्त्र, वैश्यांनीं मध आणि शूद्रांनीं नारळाचें फळ ठेवावें. अथवा कोण्या वस्त्रांत स्वर्ण, धान्य, सुपारी बांधून ठेवणें हा प्रस्थानाचा दुसरा प्रकार आहे. हा ब्राह्मणादि सर्व जातींस प्रशस्त आहे. राजांनीं ठेविलेलें प्रस्थान दहा दिवस व इतरांनीं ठेविलेलें पांच दिवस उपयोगी पडतें. अंगप्रस्थान (घर सोडून अन्यत्र राहणें) केल्यास संपूर्ण फलप्राप्ति व वस्तुप्रस्थान केल्यास अर्धफल मिळतें.

## प्रस्थान ठेवण्याचें स्थळ.

गर्गो गेहांतरं गेहात् भृगुः सीमांतरं जगुः ।
प्रस्थानं तु भरद्वाजो बाणविक्षेपणावधिम् ॥ २६ ॥
पुराद्बहिर्वसिष्ठोऽन्ये धनुषां शतपंचकम् ।
केचिच्छतद्वयं चैके धनुर्दशमितं जगुः ॥ २७ ॥

प्रस्थान किती दूर ठेवावें याविषयीं निरनिराळीं मतें आहेत. आपल्या घराच्या बाहेर एखाद्या ठिकाणीं प्रस्थान ठेवावें असें गर्गाचार्यांचें मत आहे.

गांवाच्या सीमेपलीकडे ठेवावें असें भृगुऋषीचें मत आहे. साधारणपणें बाण जितका दूर जातो तितकें दूर प्रस्थान ठेवावें असें भरद्वाज म्हणतात. वसिष्ठाचें मत नगराबाहेर प्रस्थान असावें असें आहे. आणि कित्येकांचें मत तर पांचशें, दोनशें, निदान दहा धनुष्यांवर प्रस्थान असावें असें आहे. ४ हात म्हणजे १ धनुष्य होतें. ह्यांत पहिलें गर्गऋषीचें मत सोईचें दिसतें, म्हणून प्रस्थान घराच्या बाहेर शुद्धस्थलीं ठेवावें म्हणजे झालें.

## प्रयाणसमयीं शकुनांचें महत्व.

नक्षत्रवारैस्तिथिभिश्च लग्नैः कार्यं न किंचिच्छकुने विरुद्धे ।
दोषेपि तेषां शकुनेऽनुकूले सदैव सिध्यंति समीहितार्थाः ॥ २८ ॥

नक्षत्र, वार, तिथि, लग्न इत्यादि योग शुभ असून निघते वेळीं जर अशुभ शकुन झाले तर त्या शुभ योगांचा कांहींच उपयोग होत नाहीं आणि नक्षत्रवारादि पंचांगशुद्धि नसूनही जर गमनसमयीं शुभ शकुन झाले तर त्या शकुनांच्या सूचनेनें इष्टकार्य घडून येतें; म्हणून शुभाशुभ शकुनांविषयीं कांहीं सांगतों.

## शुभशकुन.

विप्राश्वेभफलान्नदुग्धदधिगोसिद्धार्थपद्मांबरं ।
वेश्यावाद्यमयूरचाषनकुला बद्धैकपश्वामिषं ॥
सद्वाक्यं कुसुमेक्षुपूर्णकलशच्छत्राणि मृत्कन्यका ।
रत्नोष्णीषसितोक्षमद्य ससुतस्त्री दीप्तवैश्वानराः ॥ २९ ॥
आदर्शांजनधौतवस्त्ररजका मीनाज्यसिंहासनं ।
शावं रोदनवर्जितं ध्वजमधुच्छागास्त्रगोरोचनम् ॥
भारद्वाजनृयानवेदनिनदा मांगल्यगीतांकुशा ।
दृष्टाः सत्फलदाः प्रयाणसमये रिक्तो घटः स्वानुगः ॥ ३० ॥

एकाहून अधिक ब्राह्मण, अश्व, हत्ती, फळें, शिजलेलें अन्न, दुध, दहीं, धेनु, सिद्धार्थ म्हणजे शुभ्र शिरस, कमल, पांढरें वस्त्र, वेश्या, वाद्यें, मोर व चाषपक्षी, मुंगुस, बांधलेला पशु, मांस, शुभवाक्यें कानावर येणें, फुलें, ऊंस, भरलेला कलश, छत्र, ओलीमाती, कन्या, रत्न, उष्णीस म्हणजे पागोटें, पांढरा बैल, मद्य, सवत्स सुवासिनी स्त्री, प्रदीप्त अग्नि, आरसा, काजळ, धूतवस्त्रांसह परीट, मासे तूप, सिंहासन, वरोवर असलेले लोक रडत नसतील असें प्रेत, पताका, मध, छाग म्हणजे बोकड, धनुष्यादि अस्त्रें, गोरोचन, भारद्वाजपक्षी, मेणा, पालखी वगैरे नरयानें, वेदघोष, मंगल पदार्थ, गायन, हत्तीचा अंकुश, इत्यादि शकुन गमन समयीं शुभ होत. गमनकर्त्याच्या मागें रिकाम्या घागरी आल्या असतांही शुभ होत. हे शकुन आपोआप झाले असतां निश्चयेंकरून इष्ट फलदायक होतात आणि मुद्दाम घडवून आणले असतां मात्र गौण समजावें.

## अशुभ शकुन.

वंध्या चर्म तुषास्थिसर्पलवणांगारेंधनक्लीबविट् ।
तैलोन्मत्तवसौषधारिजटिलप्रावृट्तृणव्याधिताः ॥
नग्नाभ्यक्तविमुक्तकेशपतितव्यंगक्षुधार्ता असृक् ।
स्त्रीपुष्पं सरटः स्वगेहदहनं मार्जारयुद्धं क्षुतं ॥ ३१ ॥
काषायीगुडतक्रपंकविधवाकुब्जाः कुटुंबे कलिः ।
वस्त्रादेः स्खलनं लुलायसमरं कृष्णानि धान्यानि च ।
कार्पासं वमनं च गर्दभरवो दक्षेतिरट् गर्भिणी ।
मुंडार्द्राम्बरदुर्वचोऽन्धबधिरोदक्या न दृष्टाः शुभाः ॥ ३२ ॥

वंध्या स्त्री, पश्वादिकांचे चर्म, धान्याचा कोंडा, हाडें, साप, मीठ, अर्धवट विझालेले निखारे, लाकडें, नपुंसक, विष्टा, तेल, मद्यादिकांनीं उन्मत्त झालेला, चरबी, औषध, आपला शत्रु, जटा वाढविलेला, संन्यासी, यवन, रोगी मनुष्य, नग्न मनुष्य, अंगाला तेल लावलेला, केश मोकळे असलेला, जातिभ्रष्ट, व्यंग, भुकेलेला, रक्त, स्त्रियांचें आर्तव, सरडा, स्वगृहाचें दहन, मांजरांचें भांडण, शिंक, भगवें वस्त्र परिधान केलेला, गुड, तक्र, चिखल, विधवा स्त्री, कुबडा मनुष्य, कुटुंबांत भांडण, वस्त्रात पाय अडखळणें, रेड्याचें युद्ध, काळें धान्य, कापूस, वांती, उजवीकडे गाढवांचा शब्द, अकस्मात् कोणी रागावणें, गर्भवती स्त्री, क्षौर केलेला, ओलें वस्त्र नेसलेला, दुष्ट भाषण बोलणें किंवा ऐकणें, आंधळा, बहिरा, रजस्वला स्त्री इत्यादिकांचें दर्शन हीं प्रयाणकाळीं अशुभ होत.

## अपशकुनांचा परिहार.

आद्येऽपशकुने स्थित्वा प्राणानेकादश व्रजेत् ।
द्वितीये षोडशप्राणांस्तृतीये न क्वचिद्व्रजेत् ॥ ३३ ॥

प्रयाणाला निघतेसमयीं प्रथम अपशकुन झाला तर ११ प्राणांपर्यंत थांबून नंतर, अवश्य गेलेंच पाहिजे असें असेल तर, जावें. १० दीर्घ अक्षरें उच्चारण्यास जो अवधि लागतो त्यास "प्राण" असें म्हणतात. दुसऱ्या खेपेस अपशकुन झाला असतां १६ प्राणांपर्यंत थांबून नंतर जावें. तिसऱ्या खेपेस अपशकुन झाला असतां मात्र कधींही जाऊं नये. कित्येकांच्या मतें पहिल्या खेपेस ८ व दुसऱ्या खेपेस १६ प्राणायाम हातपाय धुवून करावे व नंतर जावें. प्रणवपूर्वक त्रिरावृत्ति गायत्रीमंत्र पठन केला असतां एक प्राणायाम होतो. कित्येकांच्या मतें 'धाराणस्यां दक्षिणे भागे कुर्कुटोनाम वै द्विजः । तस्य स्मरणमात्रेण भवेद्दुःशकुनः शुभं' ॥ या मंत्राचा जप करावा म्हणजे दुःशकुनांचा परिहार होतो. अपशकुन झाला असतां निदान विष्णुस्मरण करून नंतर पुढें जावें.

## प्रयाणसंबंधीं नवम वाराचा निषेध.

प्रवेशान्निर्गमं तस्मात्प्रवेशं नवमे तिथौ ।
नक्षत्रे च तथा वारे नैव कुर्यात्कदाचन ॥ ३४ ॥

प्रयाण करून पुनः घरीं परत येणें तें प्रयाण दिवसापासून नवव्या दिवशीं, नवव्या नक्षत्रावर आणि नवव्या तिथीवर येऊं नये. निदान नवव्या वारीं तरी गृहप्रवेश करूं नये. तसेंच पहिल्या प्रयाणदिवसापासून किंवा प्रयाणाहून घरीं परत आल्या दिवसापासून नवव्या वारीं, नवव्या तिथीस व नवव्या नक्षत्रीं पुनः प्रयाण करूं नये.

## वास्तुमुहूर्तविचार.

### ग्रामयोजना.

स्वनामराशितो ग्रामराशिर्व्येकपुरिकुशिवैः ।
संमितश्चेत्तदा स्वस्य तद्ग्रामे वास उत्तमः ॥ ३५ ॥
एकभे सप्तमे ग्रामे वैरं हानिस्त्रिषष्ठगे ।
तुर्याष्टद्वादशे रोगो ग्रामराशौ स्वनामभात् ॥ ३६ ॥

घर बांधणाराच्या व्यावहारिक नांवाच्या राशीपासून, ज्या गांवांत घर बांधावयाचें असेल, त्या गांवाच्या राशीपर्यंत मोजून २।९।५।१०।११ इतकी संख्या आली असतां तो गांव घर बांधावयास शुभ होय. १।७ असतां वैर, ३।६ असतां हानि आणि ४।८।१२ असतां रोगोत्पत्ति याप्रमाणें जाणावें.

## गृहारंभास मासतिथिनक्षत्रें.

वैशाखे फाल्गुने पौषे श्रावणे मार्गशीर्षके ।
गृहारंभप्रवेशौ स्तः स्तंभोच्छ्रायश्च शस्यते ।
ज्येष्ठकार्तिकमाघांश्च शुभदान्प्राह नारदः ॥ ३७ ॥
त्यक्त्वा चतुर्दशीं षष्ठीं चतुर्थीमष्टमीममाम् ।
नवमीं च रविं भौमं गृहारंभो विधीयते ॥ ३८ ॥
पुष्ये मृगेऽनुराधायां धनिष्ठायुगुलोत्तरे ।
हस्तत्रये च रोहिण्यां रेवत्यां गृहमारभेत् ॥ ३९ ॥

वैशाख, फाल्गुन, पौष, श्रावण, मार्गशीर्ष हे महिने प्रथमतः गृहारंभ करण्यास, गृहप्रवेश करण्यास आणि घराचा खांब उभा करण्यास, प्रशस्त होत. त्याचप्रमाणें हीं कृत्यें करण्यास ज्येष्ठ, कार्तिक व माघ हेही महिने शुभ होत असें नारदमत आहे. चतुर्दशी, षष्ठी, चतुर्थी, अष्टमी, अमावास्या आणि नवमी ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथींस व रवि आणि मंगळ हे वार वर्ज्य

करून अन्य वारीं गृहारंभ करावा पुष्य, मृग, अनुराधा, धनिष्ठा, शततारका तिन्ही उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, रोहिणी आणि रेवती हीं नक्षत्रें गृहारंभास शुभ होत वैधृति, व्यतीपात, दग्ध, यमघंट व मृत्युयोग इत्यादि वर्ज्य करून चंद्रबल असेल तो दिवस गृहारंभास घ्यावा.

## गृहारंभास वृषवास्तुचक्र.

रविभात्सप्त नेष्टानि शुभान्येकादशाग्रमात् ।
दश दोषाण्यनिष्टानि साभिजित् वृषवास्तुनि ॥ ४० ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं त्यांत पहिलीं ७ नक्षत्रें अशुभ, त्याच्या पुढील ११ नक्षत्रें शुभ आणि त्यापुढील १० नक्षत्रें अशुभ होत. येथें अभिजित् नक्षत्र सुद्धा मोजावें गृहादिकांच्या आरंभाला जीं नक्षत्रें उक्त आहेत तीं, ह्या वृषवास्तुचक्राप्रमाणें शुभ असतील तरच योजावीं

## घराचा पाया खणणें इत्यादिकांस मुहूर्त.

अधोमुखैर्भैर्विदधीत खातं शिलास्तथा चोर्ध्वमुखैश्च पट्टं ।
तिर्यङ्मुखैर्द्वारकपाटयान गृहप्रवेशो मृदुभिर्ध्रुवर्क्षैः ॥ ४१ ॥

अधोमुख नक्षत्रावर म्हणजे भरणी, कृत्तिका, आश्लेषा, मघा, तिन्ही पूर्वा, विशाखा, आणि मूळ ह्या नक्षत्रावर, इतर दुष्ट योग वर्ज्य करून, घराचा पाया खणावा तसेंच, शुभ वारीं व शुभ तिथीला असलेलीं ऊर्ध्वमुख नक्षत्रें, म्हणजे आर्द्रा, पुष्य, श्रवण, तिन्ही उत्तरा, शततारका आणि रोहिणी हीं नक्षत्रें पायाची पहिली कोणशिला दगडविण्यास शुभ होत तसेंच, ज्येष्ठा, पुनर्वसु, हस्त, अश्विनी, मृग, अनुराधा, रेवती, स्वाती व चित्रा हीं नक्षत्रें घराचीं द्वारें व खिडक्या करण्यास प्रशस्त होत आणि गृहप्रवेश करण्यास मृदु नक्षत्रें म्हणजे मृग, चित्रा अनुराधा, रेवती आणि ध्रुवनक्षत्रें म्हणजे रोहिणी व तिन्ही उत्तरा हीं शुभ होत.

## पाया खणण्यास शेषमुख पाहणें

धन्यालिंहे तुलायां भुजगपतिमुखं शंभुकोणेऽग्निखातं ।
वायव्ये खातदास्यं त्वलिधनमकरे ईशखातं वदंति ॥
कुंभे मीने च मेषे निर्ऋतिदिशि मुखं खातवायव्यकोणे ।
चाग्नेकोणे मुखं वै वृषमिथुनगते कर्कटे रक्षखातम् ॥ ४२ ॥

कन्या सिंह आणि तूळ ह्या राशीं सूर्य असतां शेषाचें मुख ईशान्येच्या कोप-ऱ्याकडे असतें म्हणून त्या राशीं पाया खणावयाचा असतां प्रथम आग्नेय दि-शेच्या कोणीं पाया खणावा वृश्चिक, धन व मकर ह्या राशीं शेषमुख वायव्येस

असतें ह्मणून ईशान्य कोणीं खणावें. कुंभ, मीन व मेष ह्या राशी शेषमुख नैर्ऋति दिशेस असतें ह्मणून वायव्येस खणावें. वृषभ, मिथुन, व कर्क ह्या राशी शेषमुख आग्नेय दिशेस असतें ह्मणून नैर्ऋति दिशेस खणावें. तात्पर्य, शेषाच्या मुखाकडे पाया न खणतां पृष्ठभागीं खोदावा.

## कोणशिलास्थापन. (गीति.)

दक्षिणपूर्वे कोणे कृत्वा पूजां शिलां न्यसेत् प्रथमाम्।
शेषाः प्रदक्षिणेन स्तंभाश्चैवं प्रतिष्ठाप्याः ॥ ४३ ॥
ध्रुव दृष्ट्वाऽथवा स्मृत्वा कर्तव्यं वास्तुरोपणं ।
सायाह्नवर्ज्यंदिवसे रात्रौ त्यक्त्वा महानिशां ॥ ४४ ॥

दक्षिण दिशेच्या अलीकडील कोपऱ्यात ह्मणजे आग्नेयेच्या कोणावर प्रथम शिलेची पूजा करून ती तेथें पुरावी. बाकीच्या शिला प्रदक्षिण मार्गें पूर्वेकडे बसवीत यावें. ह्मणजे पूर्व, उत्तर, पश्चिम या अनुक्रमें शिलास्थापन करावें आणि दक्षिणदिशेकडील शिला शेवटीं बसवाव्या. शिलास्थापन करितेवेळीं ध्रुवाकडे पहावें अथवा त्याचें स्मरण करावें. शिलास्थापन प्रात:काळीं करावें. सायंकाळीं अथवा रात्रीं करूं नये.

## स्तंभस्थापनास कूर्मचक्र व आठरास मुहूर्त.

तिथिस्तु पंचगुणिता कृत्तिकाद्यृक्षसंयुता ।
तथा द्वादशमिश्रा च नवभागेन भाजिता ॥ ४५ ॥
जले वेदाब्धिनिधिंद्वस्थले पञ्चद्वयवसु ।
त्रिषड्नवाकाशे त्रिविधं कूर्मलक्षणम् ॥ ४६ ॥
जले लाभस्तथा प्रोक्तः स्थले हानिस्तथैव च ।
आकाशे मरणं प्रोक्तमिदं कूर्मस्य चक्रम् ॥ ४७ ॥

ज्या तिथिला स्तंभस्थापना करावयाची असेल त्या तिथिला ५ नीं गुणावें, आणि कृत्तिका नक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून ते अंक त्यांत मिळवावे. नंतर त्या बेरजेंत १२ मिळवावे. आणि त्या सर्व बेरजेला नवानीं भागावे. बाकी ४।१।३ असेल तर कूर्म जलांत आहे. तसेंच बाकी ५।२।८ असतां कूर्म पृथ्वीवर आहे व ३।६।९ असतां कूर्म आकाशांत आहे असें जाणावें. यांतून कूर्म जलांत असतां शुभ व अन्यत्र असतां हानिकारक होय. प्रथम स्तंभाची पूजा करून त्यावर छत्री बांधून सुमुहूर्तावर आग्नेयदिशेकडे स्थिर व मृदु नक्षत्रीं स्तंभ उभा करावा. आढ घालण्याकरितां सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं. त्यांत पहिलीं ३ नक्षत्रें अशुभ, पुढील १३ शुभ,

पुढील ८ अशुभ व शेवटचीं ३ शुभ याप्रमाणें मोजून त्यांमध्यें शुभफलात्मक नक्षत्रें असतील त्या दिवशीं व गृहप्रवेशोक्त नक्षत्र पाहून आढें घालावें.

## गृहारंभास लग्नशुद्धि.

लग्ने शुक्रे गुरौ, षष्ठे भौमसूर्यौ सुखे भृगौ ।
त्रिगे मंदे रवौ, द्यूने बुधे, वा पंचमे गुरौ ॥ ४८ ॥
केंद्रे गुरौ, बुधे चंद्रे दशमे, लाभे रवौ तथा ।
मंदे कुजे, कृते तिष्ठेन्मंदिरं शरदां शतम् ॥ ४९ ॥
शुक्रे स्वोच्चे तनौ वापि, गुरौ पातालगेऽथवा ।
शनौ स्वोच्चे लाभगे वा लक्ष्म्यायुक्तं गृहं चिरम् ॥ ५० ॥

चरलग्नें सोडून स्थिर आणि द्विस्वभाव लग्नांवर गृहारंभ करावा. गृहारंभसमयीं लग्नीं गुरु किंवा शुक्र, षष्ठस्थानीं मंगळ किंवा रवि, चतुर्थस्थानीं शुक्र, तृतीय स्थानीं शनि किंवा सूर्य सप्तमस्थानीं बुध किंवा पंचमस्थानीं गुरु असे ग्रह असावे. अथवा केंद्रीं गुरु, दशमस्थानीं बुध चंद्र, एकादशस्थानीं रवि, शनि किंवा मंगळ असा योग असतांही तें घर दीर्घकाल टिकतें. लग्नीं उच्चीचा शुक्र, चतुर्थस्थानीं उच्चीचा गुरु किंवा एकादशस्थानीं उच्चीचा शनि असे ग्रह गृहारंभसमयीं असतां तें घर चिरकाल लक्ष्मीयुक्त नांदतें. चंद्र १।६।८।१२ या स्थानीं नसावा. ३।६।११ या स्थानीं पापग्रह शुभ होत.

## गृहांचीं द्वारें.

द्वारस्योपरि यद्द्वारं द्वारस्यान्यच्च संमुखम् ।
व्ययदं तु यदा तच्च न कर्तव्यं शुभेप्सुभिः ॥ ५१ ॥

तळमजल्यावरील एका द्वारावर माडीवरचें दुसरें द्वार किंवा घरामध्यें कोठेंही समोरासमोर द्वार ठेवणें हा योग व्ययदायक होय असें मानिलेलें आहे; म्हणून स्वहितेच्छु जनांनीं अशीं द्वारें घराला ठेवूं नयेत.

## दाराची चौकट बसविण्यास नक्षत्रें.

अश्विन्यामुत्तराहस्तपुष्यश्रुतिमृगेषु च ।
रोहिण्यां स्वातिभे चैव द्वारशाखां प्ररोपयेत् ॥ ५२ ॥

अश्विनी, तिन्ही उत्तरा, हस्त, पुष्य, श्रवण, मृग, रोहिणी, स्वाती व रेवती ह्या नक्षत्रीं शुभवारीं व स्थिरलग्नीं प्रथम द्वाराची चौकट बसवावी.

## गृहाची विभागयोजना.

स्नानागारं दिशि प्राच्यामाग्नेय्यां पंचनालयम् ।
याम्यायां शयनागारं नैर्ऋत्यां शस्त्रमंदिरम् ॥ ५३ ॥

वायव्यां पशुगेहं च प्रतीच्यां भोजनालयम् ।
भांडकोशं चोत्तरस्यां ईशान्यां देवमंदिरम् ॥ ५४ ॥

घराच्या पूर्वदिशेस स्नानाची जागा असावी. आग्नेय दिशेस स्वयंपाकगृह, दक्षिणेस शयनस्थान, नैर्ऋत्य दिशेस शेतकीची व संसारोपयोगी हत्यारें ठेवण्याची जागा, पश्चिमेस जेवावयास बसण्याची जागा, वायव्येस गुरांचा गोठा, उत्तरेस भांडार व धान्यादि वस्तुसंग्रह करण्याची जागा व ईशान्येस देवमंदिर असावें.

## वास्तु वगैरे शांतींस व गृहप्रवेशास मुहूर्त.

त्र्युत्तरा रोहिणी हस्त धनिष्ठा शततारका ।
पुनर्वसु मघा स्वाती अश्विनी रेवती श्रुतिः ॥ ५५ ॥
पुष्यानुराधा प्रोक्तानि ऋक्षाणि शांतिकर्मणि ॥
माघफाल्गुनवैशाखज्येष्ठाः शस्ता नवे गृहे ॥ ५६ ॥
प्रवेशे श्रावणो मार्गः कार्तिकोपि प्रशस्यते ॥
चैत्रो मासः कुजार्कौ च रिक्तादग्धास्त्यमा मृतिः ॥ ५७ ॥
दुष्टचंद्र इमे त्याज्या नवगेहप्रवेशने ।
चरे लग्ने चरांशस्थे प्रवेशो न शुभावहः ॥ ५८ ॥
शुभैः केंद्रत्रिकोणायद्विगैरायत्रिषष्ठगैः ।
पापैः शुद्धेष्टमे तुर्ये विजन्मर्भाष्टमैरके ॥ ५९ ॥

तिन्ही उत्तरा, रोहिणी, हस्त, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, मघा, स्वाती, अश्विनी, रेवती, श्रवण, पुष्य व अनुराधा हीं नक्षत्रें वास्तुशांतीस किंवा इतर कोणत्याही शांतीस शुभ होत. तसेंच, माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ, श्रावण, मार्गशीर्ष व कार्तिक हे महिने शुभ होत. चैत्रमास, मंगळ व रविवार, रिक्ता-तिथि, दग्ध व मृत्युयोग, अमावास्या, दुष्ट चंद्र, जन्मस्थ चंद्र व जन्मलग्न हे योग नव्या घरांत जाण्यास फारच वाईट आहेत. तसेंच, चर म्हणजे मेष, कर्क, तूळ व मकर हीं लग्नें व ह्यांचे नवांश गृहप्रवेशास अशुभ होत. गृहप्रवेश ज्या लग्नीं करावयाचा त्या लग्नापासून शुभग्रह केंद्रांत, त्रिकोणांत, किंवा ११।२।३ या स्थानीं असावे. ३।६।११ या स्थानीं पापग्रह असावे व ४।८ या स्थानीं एकही ग्रह नसावा. गृहप्रवेश दिवसा करणें शुभ होय, म्हणून रात्रीं नव्या घरांत जाऊं नये. दिवसा मुहूर्त नसतां अडचणीच्या प्रसंगीं मात्र रात्रीं सुमुहूर्तावर गृहप्रवेश करावा.

## गृहप्रवेशास वामगत सूर्य.

रंध्रात्मजकुटुंबायांत्यपंचमे भास्करे स्थिते ।
पूर्वाशादि गृहे श्रेष्ठं क्रमाद्वारा मुखो रविः ॥ ६० ॥

प्रवेशाच्या द्दष्टलग्नापासून ८।९।१०।११।१२ ह्या पांच स्थानीं सूर्य असतां पूर्वेकडील द्वारानें गृहांत प्रवेश करणाराला तो वामगत होतो. तसेच, दक्षिणद्वार असलेल्या गृहांत प्रवेश करणाराला ५।६।७।८।९ ह्या पांच स्थानीं सूर्य असतां पश्चिमाभिमुख गृहांत प्रवेश करणाराला २।३।४।५।६ या ५ स्थानीं सूर्य असतां आणि उत्तरद्वार असलेल्या गृहांत ११।१२।१।२।३ ह्या पांच स्थानीं सूर्य असतां तो वामगत असतो असें जाणावें. वामगत सूर्य गृहप्रवेशसमयीं शुभ जाणावा.

## गृहप्रवेशास कलशचक्र.

प्रवेशे कलशेऽर्कक्षांत्पंचैर्नागैरष्टैर्षट्क्रमात् ।
अशुभं च शुभं ज्ञेयमशुभं च शुभं तथा ॥ ६१ ॥
कृत्वार्कं वामतो गेहे विधायाग्रे द्विजन्मनः ।
जलपूर्णं घटं धृत्वा मांगल्येन गृहं विशेत् ॥ ६२ ॥

गृहप्रवेशसमयीं कलशचक्र असावें. सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून पहिलीं ५ नक्षत्रें अशुभ. त्यापुढें ८ नक्षत्रें शुभ. पुढील ८ नक्षत्रें अशुभ व पुढील ६ नक्षत्रें शुभ होत. यालाच कलशचक्र म्हणतात. पूर्वोक्त नक्षत्रांपैकीं गृहप्रवेशास जें नक्षत्र घ्यावयाचें तें कलशचक्रयुक्त असावें. गृहप्रवेशसमयीं वर लिहिल्याप्रमाणें सूर्य वाममार्गी करून, पुढें अनेक सदाचरणी व विद्वान् ब्राह्मण असून हातांत जलपूरित घागर घेऊन मंगलमंत्र व मंगलवाद्ययुक्त गृहाधिकारी पुरुषानें पत्नीसह व कुटुंबजनांसह प्रथम गृहप्रवेश करावा. गृहप्रवेश केल्यानंतर घर बांधणारे शिल्पकार व इतर जन आणि पुरोहित यांची यथाशक्ति संभावना करावी असें सांगितलेलें आहे.

## शांतीस अग्नि व आहुती पाहणें.

सैका तिथिर्वारयुता कृताप्ता शेषे गुणेऽग्ने भुवि वह्निवासः ।
सौख्याय होमे शशियुग्मशेषे प्राणार्थनाशौ दिवि भूतले च ॥६३॥

ज्या तिथीला पुण्याही शांति करावयाची असेल त्या तिथीपर्यंत शुक्ल प्रतिपदेपासून सर्व तिथी मोजून जी संख्या येईल तीमध्यें १ मिळवावा आणि त्या मिळवणींत वारांचे अंक मिळवावे व त्या बेरजेस चोहोंनीं भागावें. भागाकाराची बाकी ३ किंवा ० असतां अग्नि भूलोकीं असून त्याचें फळ सुखप्राप्ति असें जाणावें. शेष एक उरला तर अग्नि आकाशांत आहे व २ उरले तर पातालीं असून दोहोंचेंही फळ हानिकर होय असें जाणावें म्हणून आकाशीं किंवा पातालीं अग्नि असतां शांति करूं नये. कोणतीही शांति करावयाची असतां त्या दिवशीं

अग्नि व आहुति असावी. निदान दोहोंतून एक तरी योग असावा. आतां आहुति कशी पहावी हें सांगतों.

> रवौ बुधे भृगौ मंदे चंद्रे भौमे गुरौ तमे ।
> केतौ च सूर्यभात् ज्ञेयं प्रत्येकं भत्रयं न्यसेत् ।
> होमाहुतिः खले नेष्टा शुभदा शुभखेचरे ॥ ६४ ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून पुढील अनुक्रमाप्रमाणें प्रत्येक ग्रहाला तीन तीन नक्षत्रें विभागून द्यावीं, म्हणजे ९ विभाग होतात. ग्रहांचा अनुक्रम सूर्य, बुध, शुक्र, शनि, चंद्र, मंगळ, गुरु, राहु व केतु याप्रमाणें जाणावा. रवि, शनि, मंगळ, राहु व केतु यांच्या मुखांत आहुति असतां अशुभ होय म्हणून त्या दिवशीं शांति करूं नये. उदाहरण; सूर्यनक्षत्र ज्येष्ठा आहे व दिवसनक्षत्र शततारका आहे असें समजा. म्हणजे ज्येष्ठापासून शततारकापर्यंत मुकंदर ७ नक्षत्रें होतात. त्यांत वरील अनुक्रमाप्रमाणें पहिलीं तीन नक्षत्रें सूर्याचीं, पुढील तीन बुधाचीं व नंतर तीन शुक्राचीं होत. आपलें नक्षत्र तिसऱ्या विभागांत आहे म्हणून शुक्रमुखांत आहुति येते ती शुभ होय, असें जाणावें. शांतीच्या दिवशीं पापग्रहाच्या मुखीं आहुति नसावी.

## देवालय व मठ इत्यादिकांच्या आरंभास नक्षत्रें.

> गृहारंभोक्तनक्षत्रैर्मठं कुर्यात्तु साश्विभैः ।
> सर्वदेवालयं तैस्तु पुनर्भश्रवणान्वितैः ॥ ६५ ॥

अश्विनी नक्षत्र आणि गृहारंभास सांगितलेलीं सर्व नक्षत्रें यांवर मठाचा आरंभ करावा. गृहारंभाचीं नक्षत्रें आणि पुनर्वसु व श्रवण यांवर देवालयाचा आरंभ करावा.

## देवप्रतिष्ठेस मुहूर्त.

> प्रतिष्ठा सर्वदेवानां वैशाखज्येष्ठफाल्गुने ।
> चैत्रे तु स्याद्विकल्पेन माघे विष्ण्वन्यमूर्तिषु ॥ ६६ ॥
> सौम्यायने शुभा प्रोक्ता निन्दिता दक्षिणायने ॥
> देव्या माघेऽश्विने विष्णोः शस्ता चैत्रेऽश्विने नभे ॥ ६७ ॥
> हस्तत्रये मित्रहरित्रये च पौष्णद्वयादित्यसुरेज्यभेषु ।
> तिस्रोत्तराधातृशशांकभेषु सर्वामरस्थापनमुत्तमं स्यात् ॥ ६८ ॥

वैशाख, ज्येष्ठ, फाल्गुन या महिन्यांत सर्व देवांच्या अर्चा करणें प्रशस्त होय. कित्येकांच्या मतें चैत्र महिनाही शुभ होय. माघ मासांत विष्णुमूर्तीवांचून अन्य देवतेची प्रतिष्ठा करावी. देवप्रतिष्ठा उत्तरायणांत करणें शुभ आहे. देवीच्या प्रतिष्ठेला माघ व आश्विन आणि विष्णुमूर्तीच्या अर्चेला चैत्र, आश्विन व श्रावण

हे महिने प्रशस्त सांगितलेले आहेत. हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, तिन्ही उत्तरा, रोहिणी व मृग हीं नक्षत्रें कोणत्याही देवप्रतिष्ठेस उत्तम आहेत, रिक्ता तिथि व अमावास्या वर्ज्य करून इतर तिथींला व मंगळवारशिवाय इतर सर्व वारीं स्थिरलग्नांवर देवांची प्रतिष्ठा करावी.

## विहिरी तलावादिकांस मुहूर्त.

चित्रास्वातिपुनर्वसूमृगशिरो मूलाश्विनी रोहिणी ।
हस्तः पुष्यधनिष्ठकं शतभिषक्त्रिश्रोत्तरा रेवती ॥
एतेषु श्रवणान्वितेषु मकरे लग्ने च कुंभे झषे ।
वापीकूपजलाशयादिखननं शस्तं प्रशस्ते दिने ॥ ६९ ॥

चित्रा, स्वाती, पुनर्वसु, मृग, मूळ, अश्विनी, रोहिणी, हस्त, पुष्य, धनिष्ठा, शततारका, अनुराधा, तिन्ही उत्तरा, रेवती ह्या नक्षत्रांवर, मकर, कुंभ व मीन ह्या लग्नीं व पंचांगशुद्धि असेल अशा शुभ दिवशीं विहिरी, तलाव इत्यादि खणण्यास आरंभ करावा. तसेंच, ह्याच नक्षत्रांवर आणि २।३।५।१०।१३।१५ ह्या तिथींस, बुधगुरुशुक्र ह्या वारीं, मेष, सिंह आणि धन हीं तीन लग्नें वर्ज्य करून इतर लग्नीं, माघापासून पुढील सहा महिन्यांत किंवा मार्गशीर्ष महिन्यांत विहीर, वापी, तळीं इत्यादि जलाशयाचा संस्कार करून नंतर तें पाणी प्यावें असें सांगितलेलें आहे

## नूतन वस्त्रालंकारादिवस्तुधारणास नक्षत्रें.

हस्तादिपंचके पुष्ये धनिष्ठा रेवतीद्वये ।
त्र्युत्तरे च पुनर्वसौ रोहिण्यां च शुभे तिथौ ॥ ७० ॥
बुधशुक्रेज्यवारेषु नूतनांबरधारणम् ।
प्रागुक्तधिष्ण्यवारेषु स्वर्णाद्याभरणादिकम् ॥ ७१ ॥

हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, पुष्य, धनिष्ठा, रेवती, अश्विनी, तिन्ही उत्तरा, पुनर्वसु, रोहिणी ह्या नक्षत्रांवर, अमावास्या, रिक्तातिथि, षष्ठी ह्या तिथि सोडून इतर शुभतिथींस बुध, गुरु व शुक्र ह्या वारीं नवीन वस्त्रें, नवीन दागिने धारण करावे. नवीन शय्या, नवीन आसन इत्यादि नवीन वस्तूंचाहि ह्याच मुहूर्तांवर संग्रह करावा.

## शिल्पविद्यारंभास मुहूर्त.

हस्तत्रये श्रवण्यर्क्षे त्र्युत्तरे रोहिणी मृगे ।
रेवत्यामश्विनीपुष्ये पुनर्वस्वनुराधयोः ।
शस्ते तिथौ शुभे वारे शिल्पविद्यां समाचरेत् ॥ ७२ ॥

हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, तिन्ही उत्तरा, रोहिणी, मृग, रेवती, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, अनुराधा ह्या नक्षत्रांवर शुभ तिथींला आणि शुभवारीं शिल्पविद्येचा म्हणजे कोणत्याही कारागिरीच्या विद्येचा आरंभ करावा. लहान मुलांस विद्यारंभ करण्याविषयीं मागें १०८ पृष्ठामध्यें मुहूर्त सांगितला आहे. किंवा पुढे दिलेल्या साडेतीन मुहूर्तांतून एखादा दिवस घ्यावा.

## गीतनृत्यारंभास मुहूर्त.

रेवत्यामनुराधायां धनिष्ठादिद्वये करे ।
रोहिणीयुगुले पुष्ये त्र्युत्तरे गीतनर्तने ॥ ७३ ॥

रेवती, अनुराधा, धनिष्ठा, शततारका, हस्त, रोहिणी, मृग, पुष्य, व तिन्ही उत्तरा ह्या नक्षत्रांवर गायनविद्येस आरंभ करावा.

## पशूंचा क्रयविक्रय करण्यास नक्षत्रें.

विशाखा रेवती पुष्ये धनिष्ठा शतभेऽश्विभे ।
हस्ते पुनर्वसुज्येष्ठे पशूनां क्रयविक्रयौ ॥ ७४ ॥

विशाखा, रेवती, पुष्य, धनिष्ठा, शततारका, अश्विनी, हस्त, पुनर्वसु, व ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर पशूंचा क्रयविक्रय करावा.

## घर, भूमि विकत घेण्यास व विकण्यास मुहूर्त.

जीवे शुक्रे च नंदासु पूर्णायां मूलभे मृगे ।
पूर्वाश्लेषामघांत्ये च विशाखाग्निभे तथा ॥
पुनर्भे मुनिभिः प्रोक्तं क्रयविक्रयणं भुवः ॥ ७५ ॥

गुरुवार व शुक्रवार, नंदा म्हणजे १।६।११ व पूर्णा म्हणजे ५।१०।१५ ह्या तिथींला, मूळ, मृग, तिन्ही पूर्वा, आश्लेषा, मघा, रेवती, विशाखा, अनुराधा आणि पुनर्वसु ह्या नक्षत्रांवर गृह व भूमि ह्यांचा क्रयविक्रय करावा.

## व्यापार दुकान इत्यादिकांस मुहूर्त.

अनुराधोत्तरापुष्ये रेवतीरोहिणी मृगे ।
हस्तचित्राऽश्विभे कुर्याद्वाणिज्यं दिवसे शुभे ॥ ७६ ॥

अनुराधा, उत्तरा, पुष्य, रेवती, रोहिणी, मृग, हस्त, चित्रा, अश्विनी, ह्या नक्षत्रांवर चंद्रबलयुक्त शुभदिवशीं वाणिज्य, उद्दीम इत्यादिकांचा आरंभ करावा.

## भूमि नांगरण्यास नक्षत्रें.

पुनर्वसुद्वये मूले त्र्युत्तरे रोहिणीद्वये ।
हस्तत्रयेनुराधायां रेवत्यां श्रवणत्रये ।
तिथौ वारे शुभेऽश्विन्यां हलप्रवहणं शुभम् ॥ ७७ ॥

पुनर्वसु, पुष्य मूळ, तिन्ही उत्तरा, रोहिणी, मृग, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, रेवती, श्रवण, धनिष्ठा, शततारका आणि अश्विनी ह्या नक्षत्रांवर शुभतिथींस म्हणजे रिक्तातिथि व ६।८।३० ह्या वर्ज्य करून, अन्य तिथींवर प्रथम भूमि नांगरणें शुभ होय. वृषभ, मिथुन, कन्या, वृश्चिक, धन व मीन ह्या लग्नीं भूमि नांगरावी. तसेंच भूमि नांगरण्यास खालीं लिहिल्याप्रमाणें हलचक्र पहावें.

## नांगरण्यास हलचक्र.

सूर्यस्य भुक्तनक्षत्राद्रामोऽर्कनवार्ककम्।
अशुभं च शुभं ज्ञेयं हलचक्रे क्रमेण भम् ॥ ७८ ॥

जें चालू सूर्यनक्षत्र असेल त्याच्या पूर्वीच्या नक्षत्रापासून ( म्हणजे सूर्यनक्षत्र रोहिणी असतां कृत्तिकापासून ) दिवस नक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं. त्यांत पहिलीं ३ अशुभ, पुढें ८ शुभ, पुढील ९ अशुभ व शेवटचीं ८ नक्षत्रें शुभ होत.

## धान्य पेरण्यास व लावणीस नक्षत्रें व फणिचक्र.

हस्तत्रये मघापुष्ये ह्युत्तरे रोहिणीद्वये।
धनिष्ठारेवतीयुग्मे तथा मूलानुराधयोः ॥ ७९ ॥
शुभे वारे तिथौ श्रेष्ठा बीजोप्तिस्त्वथ राहुभात्।
अष्टाग्नीन्दुर्गुणैकं चैकं त्र्येकत्रयैकचतुष्टयम्।
असच्छुभं क्रमाज्ज्ञेयं दिनर्क्षे फणिचक्रकम् ॥ ८० ॥

हस्त, चित्रा, स्वाती, मघा, पुष्य, तिन्ही उत्तरा, रोहिणी, मृग, धनिष्ठा, रेवती, अश्विनी, मूळ, अनुराधा ह्या नक्षत्रीं व शुभतिथीला व शुभवारीं सर्व प्रकारचें बीज पेरणें शुभ जाणावें. बीज पेरण्यास फणिचक्र पहातात तें असें. राहु ज्या नक्षत्रीं असेल त्या नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजून पहिलीं ८ अशुभ, त्यापुढील ३ शुभ १ अशुभ ३ शुभ १ अशुभ ३ शुभ १ अशुभ ३ शुभ ४ अशुभ ह्या अनुक्रमानें फणिचक्र जाणावें. सस्यारोपणास ह्मणजे एकाठिकाणाहून दुसरीकडे धान्य नेऊन लावण्यासही वरील नक्षत्रेंच उक्त आहेत. ह्याला कोंकणांत तरवा किंवा लावणी ह्मणतात.

## धान्य कापण्यास नक्षत्रें.

पूर्वोत्तरामघाश्लेषाज्येष्ठार्द्राश्रवणद्वये।
भरणीद्वितये मूले मृगे पुष्ये करत्रये।
धान्यच्छेदः शुभो रिक्तां त्यक्त्वा भौमशनैश्चरौ ॥ ८१ ॥

तीन्ही पूर्वा, तीन्ही उत्तरा, मघा, आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा, श्रवण, धनिष्ठा, भरणी, कृत्तिका, मूळ, मृग, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती ह्या नक्षत्रांवर धान्य कापावें. रिक्तातिथि व भौम आणि शनिवार वर्ज्य करावे.

## धान्य मळण्यास नक्षत्रें.

अनुराधाश्रवोमूले रेवत्यां च मघात्रिभे ।
ज्येष्ठायां चैव रोहिण्यां शुभं स्यात्कणमर्दनम् ॥ ८२ ॥

अनुराधा, श्रवण, मूळ, रेवती, मघा, तीन्ही पूर्वा व तीन्ही उत्तरा, ज्येष्ठा व रोहिणी या नक्षत्रांवर धान्य मळावें.

## कोठारांत धान्यसंग्रह करण्यास मुहूर्त.

पुनर्भे मृगशीर्षेत्स्येनुराधा श्रवणत्रये ।
हस्तत्रयेऽश्विनीपुष्ये रोहिण्यामुत्तरात्रये ।
गुरौ शुक्रे रवींद्वोः स्यात्कोष्ठादौ धान्यरक्षणम् ॥ ८३ ॥

पुनर्वसु, मृग, रेवती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा शततारका, हस्त, चित्रा, स्वाती, अश्विनी, पुष्य, रोहिणी, तिन्ही उत्तरा या नक्षत्रांवर आणि गुरु, शुक्र रवि व सोमवारीं कोठारांत धान्य संग्रह करावा.

## नवान्नभक्षणास नक्षत्रें.

हस्तचित्रानुराधांत्ये रोहिणीश्रवणद्वये ।
मृगाश्विन्युत्तरास्वर्के शुभे वारे तिथावपि ।
नवान्नस्य विधानं च प्राशनं फलमूलयोः ॥ ८४ ॥

हस्त, चित्रा, अनुराधा, रेवती, रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, मृग, अश्विनी, तिन्ही उत्तरा हीं नक्षत्रें व रविवार आणि इतर शुभवार व शुभतिथि पाहून धान्य नवें भक्षण करावें. कोकणप्रांतीं आश्विनशुद्ध पौर्णिमेस नवान्न भक्षण करण्याचा सर्वत्र प्रचार आहे.

## बाग करण्यास मुहूर्त.

हस्तचित्रोत्तरामूलेनुराधारेवतीद्वये ।
विशाखारोहिणीपुष्येप्यारामोसिर्मृगे शुभा ॥ ८५ ॥

हस्त, चित्रा, तिन्ही उत्तरा, मूळ, अनुराधा, रेवती, अश्विनी, विशाखा, रोहिणी, पुष्य, या नक्षत्रीं उदगयनांत मंगळ व शनिवार आणि अमावास्या व रिक्ता तिथि वर्ज करून नवीन झाडें लावावीं.

## गलबताचा मुहूर्त.

ज्येष्ठोभयं विशाखार्द्रा रोहिणी भरणीद्वयम् ।
आश्लेषां च विहायान्यनक्षत्रेऽर्के गुरौ भृगौ ।
सल्लग्ने सत्तिथौ नावां घट्टनं तारणं शुभम् ॥ ८६ ॥

## पालखी, गाडी, घोडा, हत्ती इत्यादि वाहनांस नक्षत्रें.

ह्युत्तरारोहिणीयुग्मे पुष्ये हस्तत्रये तथा ।
श्रवत्रयेऽनुराधायां ज्येष्ठायां च पुनर्वसौ ॥ ९६ ॥
शनिभौमान्यवारेषु शुभे लग्ने शुभे तिथौ ।
गजाश्वरथमुख्यानां शिबिकायाश्च रोहणम् ॥ ९७ ॥

तिन्ही उत्तरा, रोहिणी, मृग, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अनुराधा, ज्येष्ठा, पुनर्वसु हा नक्षत्रांवर, शनि व भौम हे वार खेरीज-करून स्थिरलग्नीं व शुभतिथींवर गाडी, घोडा, हत्ती पालखी इत्यादि वाहनाचा प्रथम उपयोग करणे शुभ होय. गाडी व पालखी बांधण्यास हींच नक्षत्रें उक्त होत.

## चारणीवर गुरें पाठविण्यास.

सूर्यभादुडुगणं पुनःपुनर्गण्यतामिति चतुष्टयं त्रयम् ॥
अंतरंगबहिरंगसंज्ञकं तत्र कर्म विदधीत तादृशम् ॥ ९८ ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं. त्यांपैकीं पहिलीं चार नक्षत्रें आंतचालीचीं व नंतर तीन नक्षत्रें बाहेरचालीचीं होत, या प्रमाणें जितकीं नक्षत्रें असतील तेथपर्यंत मोजीत जावें. आंतचालीचीं नक्षत्रें चारणी-वरून गुरूं घरीं आणण्यास व बाहेर चालीचीं नक्षत्रें चारणीवर गुरूं पोहोंचवि-ण्यास उक्त आहेत. उदाहरणार्थ, सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत एकंदर तेरा नक्षत्रें झालीं असें समजा. त्यांपैकीं पहिलीं चार नक्षत्रें आंतचालीचीं, पुढलीं तीन नक्षत्रें बाहेरचालीचीं, पुन. चार नक्षत्रें ओंतचालीचीं व तीन बाहेर-चालीचीं याप्रमाणें चवदा नक्षत्रें झालीं, म्हणजे बाराव्या नक्षत्रापासून चव-दाव्या नक्षत्रापर्यंत जीं तीन नक्षत्रें ती बहिरंग नक्षत्रें असल्यामुळे चारणीवर गुरूं पाठविण्यास उक्त होत. शुभतिथींस व शुभवारीं वरील रीतीप्रमाणें नक्षत्रें मोजून पशू चारणीवरून आणावे किंवा चारणीवर पाठवावे.

## वैद्य व गारुडीविद्यारंभास नक्षत्रें.

हस्तत्रयेनुराधायां पुनर्भे श्रवणत्रये ।
मूले चांत्येऽश्विनीपुष्ये ज्येष्ठाश्लेषार्द्रमे मृगे ।
वैद्यविद्या कुजेज्यार्के ज्येष्ठाहीनेत्र गारुडी ॥ ९९ ॥

हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका, मूल, रेवती, अश्विनी, पुष्य, ज्येष्ठा, आश्लेषा, आर्द्रा, मृग हीं नक्षत्रें वैद्यकी शिकण्यास व वैद्यकी धंद्याचा आरंभ करण्यास शुभ होत. गारुडीविद्या शिकण्यास ज्येष्ठा नक्षत्र सोडून हींच नक्षत्रें उक्त होत.

## अग्निहोत्र घेण्यास नक्षत्रें.

त्र्युत्तरारेवतीपुष्ये विशाखाकृत्तिकाद्वये ।
सौम्यायने च ज्येष्ठायां अग्न्याधानं शुभे तिथौ ॥ १०० ॥

उत्तरायणांत, रिक्त व अमावास्या तिथि वर्ज्य करून तिन्ही उत्तरा, रेवती, पुष्य, विशाखा, कृत्तिका, रोहिणी, मृग, आणि ज्येष्ठा ह्या नक्षत्रीं प्रथम अग्निहोत्र घ्यावें.

## नारायणबलीस व नागबलीस मुहूर्त.

बलिर्नारायणाख्यो वै पंचम्यां श्रवणेऽथवा ।
एकादश्यां च शुक्लायां नरैः कार्यो सुतेप्सुभिः ॥ १०१ ॥
आश्लेषार्क्षसंयुक्तायां नवम्यां पंचमीदिने ।
पौर्णमास्याममावास्यां कार्यो नागबलिः शुभः ॥ १०२ ॥

शुक्ल अथवा कृष्णपक्षांतील पंचमी, किंवा शुक्ल एकादशी, या दिवशीं किंवा श्रवण नक्षत्रीं पुत्रेच्छु मनुष्यानें नारायणबलि करावा. तसेंच, नवमी, पंचमी, पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवशीं किंवा आश्लेषा नक्षत्रीं नागबलि करावा. हे विधि केले असतां संततिप्रतिबंधक पिशाचोपद्रव दूर होऊन दीर्घायु सुसंतति होते असें सांगितलेलें आहे.

## सर्वशुभकार्यांची लग्नशुद्धि.

व्ययाष्टशुद्धोपचये लग्ने शुभदृग्युते ।
चंद्रे त्रिषडूदशायस्थे सर्वारंभः प्रसिध्यति ॥ १०३ ॥

ज्या लग्नीं कांहीं कृत्य करावयाचें असेल त्या लग्नापासून १२।८ ह्या दोन स्थानीं कोणतेही ग्रह नसावा. तसेंच, उपचय म्हणजे ३।६।१०।११ ह्या स्थानीं शुभग्रह विशेषतः चंद्र, आणि लग्नीं, केंद्रीं व त्रिकोणीं शुभग्रह असून तेथें पापग्रहांची दृष्टि नसतां कार्यसिद्धि होते.

## साडेतीन मुहूर्त.

प्रतिपद्वत्सरादिर्या तृतीयाक्षय्यसंज्ञिका ।
दशमीविजयाख्या च मुहूर्तास्त्रय ईरिताः ॥ १०४ ॥
प्रतिपत्कार्तिके शुक्ला स मुहूर्तार्धसंज्ञकः ।
सर्वसिद्धा इमे ज्ञेयाः सर्वकार्यप्रसाधकाः ॥ १०५ ॥

चैत्रशुद्ध प्रतिपदा, अक्षय्य तृतीया आणि विजयादशमी (दसरा) हे पूर्ण तीन मुहूर्त व कार्तिकशुद्ध प्रतिपदा हा अर्धा मुहूर्त असे साडेतीन स्वयंसिद्ध मुहूर्त आहेत. म्हणजे ह्या दिवशीं कोणतेंही कर्म करावयास पंचांगशुद्धि पाहण्याची आवश्यकता नाहीं. ह्या दिवशीं बालकांकडून विद्यारंभ करवावा.

## प्रश्नविचार.

### गांवाहून मनुष्य किंवा पत्र येण्याचा पंथाप्रश्न.

तिथिः प्रहरसंयुक्ता तारकावारमिश्रिता ।
सप्तभिस्तु हरेद्भागं शेषं तु फलमादिशेत् ॥ १०६ ॥
एकशेषं तथा स्थाने द्वितीये पथि वर्तते ।
तृतीयेऽप्यर्धमार्गे तु चतुर्थे ग्राममादिशेत् ॥ १०७ ॥
पंचमे पुनरावृत्तिः षष्ठे व्याधियुतं वदेत् ।
शून्यं ज्ञेयं सप्तमे वै चैतत्प्रश्नस्य लक्षणम् ॥ १०८ ॥

**रीति पहिली**—ज्या तिथीला प्रश्न केला असेल त्या तिथीसुद्धां तिथि मोजून त्या अंकांत प्रश्नकाळचा प्रहर, वार व नक्षत्र यांचे अनुक्रमांक मिळवून त्या सर्व बेरजेला ७ नीं भागावें, आणि भागाकाराची जी बाकी राहील तिचें फळ पुढें लिहिल्याप्रमाणे जाणावें. शेषांक १ असता स्वस्थानीं, २ असता घर सोडून मार्ग चालू लागला, ३ असता अर्धमार्ग चालून आला, ४ असता गावाजवळ आला, ५ असल्यास परत गेला, ६ असता व्याधिग्रस्त आणि शून्य असता लवकर येणार नाहीं असें जाणावें. पत्रासंबंधीं प्रश्न पाहते वेळीं ५।६।० बाकी राहिली तर पत्र लवकर येणार नाहीं असें जाणावें.

वर्तमानं च नक्षत्रं गणयेत्कृत्तिकादितः ।
सप्तभिश्च हरेद्भागं शेषं प्रश्नस्य लक्षणम् ॥ १०९ ॥

**रीति दुसरी**—प्रश्नकाळीं जें नक्षत्र असेल त्या नक्षत्रापासून कृत्तिकापर्यंत नक्षत्रें मोजून त्या अंकास सातानीं भागावें आणि जी बाकी राहील तिचें फळ वरच्याप्रमाणें जाणावें. सातानीं भाग जात नाहीं अशी संख्या असेल तर तीच भागाकाराची बाकी समजून फळें पहावीं.

प्रश्नाक्षरं रुद्रयुक्तं सप्तभिर्भाजितं तथा ।
फलमेवं क्रमाज्ज्ञेयं सर्वेषां हि शुभाशुभम् ॥ ११० ॥

**रीति तिसरी**—प्रश्नाचीं अक्षरें मोजून त्यांत ११ मिळवून त्या बेरजेस ७ नीं भागावें. जी बाकी राहील तिचें फळ वर पहिल्या प्रकारांत लिहिल्याप्रमाणे जाणावें.

**रीति चवथी**—प्रश्नकाळची एक कुंडली मांडावी आणि कुंडलींत लग्नीं किंवा द्वितीयस्थानीं शुक्र, तृतीय किंवा चतुर्थस्थानीं गुरु अथवा बुधचंद्र एकाच स्थानीं असता, कार्यसिद्धि होऊन मनुष्य किंवा पत्रोत्तर शीघ्र येईल. प्रश्नलग्नीं शुभग्रह असून धनेश व पराक्रमेश यानीं दृष्ट असतां, ५।७ या स्थानीं चंद्रयुक्त गुरुशुक्र असतां, चरलग्नीं सूर्य, बुध, शुक्र किंवा यातून कोणीही ग्रह असता प्रवासी अथवा

पश्नोत्तर मार्गांत असून शीघ्र येईल. प्रश्नकालीं स्थिरलग्न असून वरीलप्रमाणें ग्रहयोग असेल तर अवकाशानें येईल. द्विस्वभाव लग्न असतां येण्याचा बेत रहित झाला असें जाणावें. ह्या रीतीनें प्रश्न पाहिला असतां बराच अनुभव येतो.

## कार्यप्रश्न.

*दिशाप्रहरसंयुक्ता तारकावारमिश्रिता ।
अष्टभिस्तु हरेद्भागं शेषं प्रश्नस्य लक्षणम् ॥ १११ ॥
पंचैके त्वरिता सिद्धिः षट्तुर्ये च दिनत्रयम् ।
त्रिःसप्तके विलंबश्च द्वौ चाष्टौ नच सिद्धिदौ ॥ ११२ ॥

**रीति पहिली**—पृच्छकाचें मुख ज्या दिशेस असेल त्या दिशेचे अंक, तसेंच प्रश्न समयींचे प्रहर, नक्षत्र आणि वार या सर्वांचे अंक एकत्र करून त्या बेरजेस आठांनीं भागावें. बाकी १ किंवा ५ उरले तर त्वरित कार्यसिद्धि होईल, ६ किंवा ४ उरले तर तीन दिवसांनंतर कार्य होईल, ३।७ उरले तर विलंबकरून कार्य होईल, व २।८ उरले तर कार्य होणें कठीण असें समजावें.

सप्तत्र्यंके कथयंति वार्ता नवैकपंचत्वरितं वदंति ।
अष्टौद्वितीये नहि कार्यसिद्धी रसाश्च वेदा घटिकात्रयं च ॥११३॥

**रीति दुसरी**—बाजूस दाखविल्याप्रमाणें एक नवगृहात्मक यंत्र करून त्यांतील एका अंकावर पृच्छकाला हात ठेवण्यास सांगावा. हात ठेवलेला अंक ७ अथवा ३ असले तर कार्यसिद्धीबद्दल वार्ता ऐकण्यांत येईल. ९।१।५ असले तर कार्य लवकर होईल. ८।२ असले तर कार्य होणें कठीण. आणि ४।६ असले तर तीन घटिकांनीं कार्य होईल.

| | | |
|---|---|---|
| ४ | ३ | ८ |
| ९ | ५ | १ |
| २ | ७ | ६ |

अष्टोत्तरशतांकेषु प्रश्निकोन्यूनमाचरेत् ।
सर्वं द्वादशभिर्भक्तं शेषं चैव शुभाशुभं ॥ ११४ ॥
एकं दुर्गासप्तके वै विलंबश्चागेतुर्यंविधुभूतेपुंनाशः ।
चंद्रेसिद्धिःकार्यवृद्धिश्च नेत्रे शीघ्रंकार्यस्यात्रिषट्द्वादशेषु ॥११५॥

**रीति तिसरी**—प्रश्न करणाऱ्या मनुष्यास १०८ अंकांतून एका अंकाचें नांव घ्यावयास सांगावें व त्या अंकास बारांनीं भागून बाकी जी राहील तिचीं फळें पुढें लिहिल्याप्रमाणें समजावीं. १।७।९ उरले तर विलंबानें कार्य होईल.

*दिशांचे अंक मोजणें ते पूर्वेचा १, अग्नेयीचे २, दक्षिणेचे ३, नैर्ऋत्येचे ४, पश्चिमेचे ५, वायव्येचे ६, उत्तरेचे ७, आणि ईशान्येचे ८ याप्रमाणें मोजावे.

८।४।१०।५ उरले तर कार्यनाश आणि २।३।६।११।० उरले तर शीघ्र कार्यसिद्धि होईल असें समजावें.

अंकं द्विगुणितं कृत्वा फलनामाक्षरैर्युतं ।
त्रयोदशयुतं कृत्वा नवभिर्भागमाहरेत् ।
शेषांके विषमे सिद्धिः समे नाशश्च जायते ॥ ११६ ॥

पृच्छकाला नऊ अंकांतून एका अंकाचें नांव घ्यावयास सांगावें. त्या अंकाची दुप्पट करून त्यांत एखाद्या फळाच्या नांवाचीं अक्षरें मिळवावीं व त्यांत दुसरे १३ मिळवावे. त्या बेरजेस नवांनीं भागावें. बाकी विषम अंक असेल तर कार्यसिद्धि आणि सम असेल तर कार्यनाश असें जाणावें.

**रीति पांचवी**—चंद्र व लग्नस्वामी हे चर राशीस असतां किंवा त्यांची पूर्ण दृष्टि लग्नावर असतां त्वरित कार्यसिद्धि होईल व इतर लग्नीं अशी स्थिति असतां विलंबकरून कार्य होईल. प्रश्नकालचा लग्नस्वामी, धनेश व चंद्र हे परस्परयुक्त किंवा दृष्ट असतील किंवा २।५।९।१०।११ ह्या स्थानांवर त्यांच्या त्यांच्या स्वामींची किंवा चंद्र, बुध, गुरु, शुक्र किंवा लग्नेश यांची दृष्टि असेल तर कार्यसिद्धि लवकरच होईल.

## नष्टवस्तुप्रश्न.

अंधके लभते शीघ्रं मंदके च दिनत्रयम् ।
मध्यके च चतुःषष्टी न प्राप्नोति सुलोचने ॥ ११७ ॥
अंधके पूर्वतो वस्तु मंदके दक्षिणे तथा ।
पश्चिमे मध्यनेत्रे च उत्तरे तु सुलोचने ॥ ११८ ॥

**रीति पहिली**—अंधनक्षत्रीं वस्तु नष्ट झाली असतां शीघ्र मिळेल. मंदनक्षत्रीं हरवली असतां प्रयत्नकरून तीन दिवसांनंतर मिळेल. मध्यलोचन नक्षत्रीं सांडली [illegible] दोन महिन्यांनीं दीर्घ प्रयत्न केले तर सांपडेल. आणि सुलोचन नक्षत्रीं वस्तु गेली तर मिळणें अत्यंत कठीण. तसेंच, अंधनक्षत्रीं पूर्वेस, मंदनक्षत्रीं दक्षिणेस, मध्यनक्षत्रीं पश्चिमेस व सुलोचननक्षत्रीं वस्तु गेली असतां उत्तरेस पहावी.

मघादिश्रयमांतं च समीपे वस्तु दृश्यते ।
हस्तादिवसुपर्यंतमन्यहस्ते च दृश्यते ॥ ११९ ॥
शततारादिमांतं तु स्वगृहे वस्तु दृश्यते ।
अश्व्यादिसार्पपर्यंतमदृष्टं दूरगं तथा ॥ १२० ॥

**रीति दुसरी**—जर मघानक्षत्रापासून उत्तरानक्षत्रापर्यंत वस्तु सांडली तर जवळच दृष्टीस पडेल. हस्तनक्षत्रापासून धनिष्ठापर्यंत सांडली तर परहस्तीं

## गर्भिणीप्रश्न.

तत्पृच्छलग्ने रविजीवभौमास्तृतीयसप्ते नवपंचमे च ।
गर्भः पुमान्वै ऋषिभिः प्रणीतश्चान्यग्रहे स्त्री विबुधैः प्रणीता ॥१२५॥

पहिली रीति.—गर्भिणीसंबंधी ज्या वेळीं कोणी प्रश्न करील त्या वेळची लग्नकुंडली तयार करून ग्रह पहावे. ३।५।७।९ ह्या स्थानीं रवि, भौम अथवा गुरु असता पुत्र व अन्य ग्रह असतां कन्या होईल.

नामाक्षराणि गर्भिण्याः कृत्वा त्रिगुणितं तथा ।
तिथिर्देशयुतं चैव अभ्वनामाक्षरैर्युतं ॥
अष्टभिस्तु हरेद्भागं समे स्त्री विषमे सुतः ॥ १२६ ॥

दुसरी रीति—गर्भिणीच्या नावाच्या अक्षरांची तिप्पट करून त्यांत शुक्लप्रतिपदेपासून तिथि मोजून प्रश्नसमयचीं तिथि मिळवावी. त्या अंकात एखाद्या देशाच्या नावाचीं व अश्वाच्या नावाचीं अक्षरें मिळवावीं. आणि ह्या सर्व बेरजेस आठानीं भागून बाकी सम अंक ह्म० २।४।६।० राहिले तर कन्या आणि विषम अंक ह्म० १।३।५।७ असता पुत्र होईल असें जाणावें.

## रोगसंबंधी प्रश्न.

तिथिवारं च नक्षत्रं लग्नं प्रहर पव च ।
अष्टभिस्तु हरेद्भागं शेषं तु फलमादिशेत् ॥ १२७ ॥
हैंयाग्नौ देवताबाधा पैत्री वै नेत्रदंतिंषु ।
पंद्र्वेंतुपु भूतबाधा न बाधा पैकपंचके ॥ १२८ ॥

प्रश्न समयींची तिथि, वार, नक्षत्र, लग्न व प्रहर या सर्वांची बेरीज करून त्या बेरजेस आठानीं भागावें ७।३ उरले तर देवतेची बाधा, २।८।४।६ उरले तर पितृबाधा किंवा पिशाचबाधा. १।५ उरले तर दुसरी काहीं बाधा नसून केवळ शारीरपीडा आहे असें जाणावें आर्द्रा, आश्लेषा, पूर्वा, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा आणि रेवती ह्या नक्षत्रांवर, तसेंच १।४।६।९।११ १४।३० ह्या तिथींवर आणि रवि, भौम, शनि ह्या वारीं, व व्यतीपात, वैधृति इत्यादि कुयोगांवर प्रथम ज्वरादि रोग उत्पन्न झाल्यास रोग दूर होण्यास कष्ट पडून दीड महिन्यानीं रोगी बरा होईल उत्तराषाढा किंवा मृग या नक्षत्रीं रोगोत्पत्ति झाली असेल तर एक महिना पीडा भोगावी लागेल मघा नक्षत्रावर प्रथम रोग उत्पन्न झाला असेल तर वीस दिवस, हस्त नक्षत्रावर पंधरा दिवस, अश्विनी, कृत्तिका, विशाखा, मूळ आणि धनिष्ठा या नक्षत्रांवर नऊ दिवस, भरणी, चित्रा, श्रवण आणि शततारका या नक्षत्रावर अकरा दिवस, आणि उत्तरा, उत्तराभाद्रपदा, पुष्य, पूर्वा, अभिजित् या नक्षत्रीं रोग उत्पन्न झाला असेल तर सात दिवस

पीडा भोगावी लागेल. सोमवारीं किंवा बुधवारीं रोग उत्पन्न झाल्यास बारा दिवसांनीं, गुरुवारीं उत्पन्न झाल्यास दहा दिवसांनीं व शुक्रवारीं उत्पन्न झाल्यास तेवीस दिवसांनीं पीडा दूर होईल. ज्वराची शांति होण्यास ज्वरशांति किंवा शंकरावर अभिषेक करवावा. रोग प्रबल असेल तर मृत्युंजयाचा जप किंवा सप्तशतीचा पाठ विद्वान्, सच्छील व सदाचरणी ब्राह्मणाकडून करवावा असें धर्मशास्त्रग्रंथांत लिहिलेलें आहे.

## जनावर चुकल्याचा प्रश्न.

द्युमणिभात्त्रयमेषु वने पशुं तदनु षट्सुतु कर्णपथे स्थिरम् ।
अचलभेषु गतं गृहमागतं द्वयगतं गतमद्य मृतं त्रिषु ॥ १२९ ॥

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजावीं. दिवसनक्षत्र नऊ नक्षत्रांच्या आत असेल तर गुरूं रानांत आहे. नऊ नक्षत्रांच्या पुढें व पंधरा नक्षत्रांच्या आंत असलें तर गुरूं रस्त्यांत आहे. सोळापासून बावीसांच्या आंत असलें तर घरीं लवकर परत येईल. बावीस नक्षत्रापुढें तीन नक्षत्रें म्हणजे पंचवीस नक्षत्रापर्यंत सांपडण्यास श्रम पडतील व पंचविसापुढच्या दोन नक्षत्रांत दिवस नक्षत्र असेल तर गुरू संकटांत आहे.

कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहुसहस्रवान् ।
तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ॥ १३० ॥

ह्या श्लोकाचा अष्टोत्तरशत जप केला असतां कोणतीही हरपलेली वस्तु एकदर सांपडते असें ग्रंथांतरीं लिहिलेलें आहे.

## दुष्टदृष्टि लागल्यास उपाय.

बालकाला मनुष्याची दृष्टिबाधा झाली असतां सायंकाळीं हातपाय धुवून पुढील मंत्रानें विभूत अभिमंत्रून त्याला लावावी, असें धर्मसिंधु ग्रंथांत लिहिलें आहे. मंत्र.—

'वासुदेवो जगन्नाथः पूतनातर्जनो हरिः ॥ रक्षतु त्वरितो बालं मुंच मुंच कुमारकं ॥ कृष्ण रक्ष शिशुं शंखमधुकैटभमर्दन ॥ प्रातःसंगवमध्याह्न सायाह्नेषु च संध्ययोः ॥ महानिशि सदा रक्ष कंसारिष्टनिषूदन ॥ यद्गोरजः पिशाचांश्च ग्रहान् मातृग्रहानपि ॥ बालग्रहान् विशेषेण छिंधि छिंधि महाभयान् ॥ त्राहि त्राहि हरे नित्यं त्वद्रक्षाभूषितं शिशुं' ॥ या मंत्रेकरून अभिमंत्रण केलेलें भस्म बालकाच्या कपाळाला व सर्वांगाला लावावें. विभूत लावणें ती प्रथम डाविकडे लावूं नये. अथवा 'रक्ष रक्ष महादेव नीलग्रीव जटाधर ॥ ग्रहैस्तु सहितो रक्ष मुंच मुंच कुमारकं' ॥ हा मंत्र भूर्जपत्रावर

लिहून तें भूर्जपत्र काळ्या सुतानें बांधून तो काळा दोरा धुपवून घातवार वगैरे वर्ज्य करून मुलाच्या उजव्या व मुलीच्या डाव्या बाहूस बांधावा असें केलें असतां दुष्टदृष्टि लागली असेल तर ती पीडा दूर होते व मुलांचें रडणें बंद होतें.

## शिंकाप्रश्न.

युधैर्दिक्प्रकारवं श्रुत्वा पादच्छायां च कारयेत् ।
त्रयोदशयुतां कृत्वा चाष्टभिर्भागमाहरेत् ॥ १३१ ॥
लाभः सिद्धिर्हानिशोकौ भयं श्रीर्दुःखनिष्फले ।
क्रमेणैवं फलं ज्ञेयं गर्गेण च यथोदितम् ॥ १३२ ॥
आसने शयने चैव दाने चैव तु भोजने ।
वामांगे पृष्ठतश्चैव पट्टछिंकाश्च शुभावहाः ॥ १३३ ॥

आपली छाया आपल्या पावलांनीं मोजावी. जितकीं पावलें होतील त्यांचीं तिप्पट करून त्यांत तेरा मिळवावे त्या बेरजेस आठांनीं भागावें. बाकी १।२।६ उरले तर लाभ आणि ३।४।५।७।० उरले तर कार्य होणार नाहीं असें समजावें. आसनावर, शयनस्थानावर, दान देतेवेळीं, भोजनाचे वेळीं, डाव्या बाजूस किंवा पाठीमागें अशा सहा ठिकाणच्या शिंका शुभ मानिल्या आहेत. आपण महत्वाची गोष्ट बोलत असतां कोणी शिंकले तरच प्रश्न पहावा. एका शिंकेपेक्षां अधिक शिंका एकदाच वेळीं आल्यास प्रश्न पाहूं नये.

शिंकाप्रश्नं प्रवक्ष्यामि पूर्वस्यामशुभं फलं ।
आग्नेयां शोकदुःखं स्यादरिष्टं दक्षिणे तथा ॥ १३४ ॥
नैर्ऋत्यां च शुभं प्रोक्तं पश्चिमे मिष्टभक्षणं ।
वायव्ये धनलाभस्तु उत्तरे कलहस्तथा ॥ १३५ ॥
ईशान्यां च शुभं ज्ञेयमात्मशिंका महद्भयं ।
ऊर्ध्वं चैव शुभं ज्ञेयं मध्ये चैव महद्भयम् ॥ १३६ ॥

दिशापरत्वें शिंकाफल-पूर्वेची शिंका अशुभ, आग्नेयीची दुःखकारक, दक्षिणेची अरिष्टकारिणी, नैर्ऋत्येची शुभ, पश्चिमेची मिष्टान्न भक्षण देणारी, वायव्येची धनदायक, उत्तरेची कलहकारिणी, ईशान्येची शुभ, आपल्याला शिंक आली तर भीति, ऊर्ध्व ( वर ) झाली तर शुभ, आणि मध्यें झाली तर मोठें भय याप्रमाणें समजावें.

## काकशब्दशकुन.

काकस्य वचनं श्रुत्वा पादच्छायां च कारयेत् ।
त्रयोदशयुतां कृत्वा पड्भिर्भागमाहरेत् ॥ १३७ ॥

लाभः खेदस्तथा सौख्यं मिष्टान्नं च धनागमः ।
अशुभं च क्रमेणैव गर्गस्य वचनं तथा ॥ १३८ ॥
मस्तके वायसस्पर्शे दारिद्र्यं मरणं कलिः ।
योषितां मस्तके भर्तुररिष्टं वा सुतस्य च ॥ १३९ ॥
वृक्षाधो वाथ सिद्धान्नभक्षे दध्यादियोगतः ।
काकस्पर्शो न दोषाय न पश्येत् काकमैथुनम् ॥ १४० ॥

आपण एखादी महत्त्वाची गोष्ट बोलत असतां कावळा ओरडला तर प्रश्न पहावा. तो असा कीं, आपली छाया पावलांनीं मोजून त्यांत १३ मिळवावे आणि त्या बेरजेस सहांनीं भागावें; शेष राहील त्याचें फळ. १ उरेल तर लाभ २ खेद ३ सौख्य ४ भोजन ५ धनलाभ आणि शून्य उरलें तर अशुभ जाणावें, असें गर्गऋषीचें मत आहे. प्रत्यक्ष कोणाला काकस्पर्श घडेल तर त्यापासून धनचिंता, रोग किंवा कलह हीं उत्पन्न होतात. स्त्रियांच्या मस्तकाला काकस्पर्श होईल तर पतीला किंवा अपत्याला अनिष्ट होय. परंतु शिजलेलें अन्न भक्षण करीत असतां किंवा दहीं इत्यादि पदार्थ घेऊन जात असतां काकस्पर्श घडेल तर मात्र दोष नाहीं. काकमैथुन दृष्टीस पडेल तर तें अत्यंत अनिष्ट होय. म्हणून त्याबद्दल शांति करावी असें शांतिग्रंथांत सांगितलें आहे.

## नेत्रस्फुरण.

नेत्रस्योर्ध्वं हरति सकलं मानसं दुःखजालं ।
नेत्रोपांते लभति च धनं नासिकांते च रोगः ।
नेत्रस्याधः स्फुरणमसकृत्संगरे भंगहेतुः ।
वामे चैतत्फलमविफलं दक्षिणे वैपरीत्यम् ॥ १४१ ॥

थोडा वेळपर्यंत थांबून थांबून जर डोळा लवत असला तरच प्रश्न पहावा. क्वचित्‌कधीं दोनतीन दिवसपर्यंत देखील एकसारखा डोळा लवत असतो तो बहुत-करून वातविकारानें लवत असतो. अशा वेळेस प्रश्न पाहूं नये. नेत्राच्या वरील पापण्या स्फुरण झाल्या तर मनाचें दुःखहरण किंवा धनप्राप्ति, भिंवयांचा मध्य स्फुरण होईल तर प्रियाची भेट, नासिकाजवळची स्फुरण झाली तर रोग व अधर-प्रांत स्फुरण झाल्यास अपजय, असें जाणावें. पुरुषाचा उजवा डोळा लवत असला तर हीं फळें घ्यावीं; डावा लवत असला तर याच्या उलट फळें घ्यावीं. तसेंच स्त्रियांचा डावा लवत असला तर शुभ, आणि उजवा लवत असला तर अशुभ होय असें जाणावें.

## पल्लीपतन.

अंगावर पाल पडली तर सचैल ( त्यावेळेस अंगावर जीं वस्त्रें असतील त्यां-सुद्धां ) स्नान करावें. आणि शंकराचे देवळांत जाऊन तुपाचा दिवा लावून 'ॐ

नमः शिवाय' या षडाक्षरी मंत्राचा अक्षरांनीं निदान १०८ जप करावा, म्हणजे दोष दूर होतो असें ग्रंथांतरीं सांगितलेलें आहे

**शरीरस्थानपरत्वें शुभाशुभ फळें**—मनुष्य प्रयाणास निघाला असता जर अंगावर पाल पडली तर त्याचीं फळें खालीं लिहिल्याप्रमाणे समजावीं. अशुभ फळ असता प्रयाण करूं नये

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| शीर्ष | राज्यप्राप्ति | स्तन | दुर्भाग्य | उजवा मणगट | धनक्षय |
| कपाळ | बंधुदर्शन | उदर | आश्रयप्राप्ति | डावा मणगट | धनकीर्तिलाभ |
| भिंवया | राजसन्मान | दक्षिणबाहु | रानाश्रय | नखें | धान्यलाभ. |
| वरील ओठ | धनक्षय | वामबाहु | राजक्षोभ. | मुख | मिष्टान्नभोजन. |
| खालचा ओठ | ऐश्वर्यलाभ | पाठ | बुद्धिनाश | गुल्फ | बंधन. |
| नासिक. | व्याधि | ढोंपर, पोटऱ्या | शुभ | केश | रोग |
| उजवा कान | आयुष्य | दोन्ही हात | वस्त्रलाभ | दक्षिणपाद | मार्ग चालणें |
| डावा कान | लाभ | खांदा | विजय | वामपाद | बंधुनाश |
| नेत्र | बंधन | नाभि | बहुधन. | पावलाचा मध्य | स्त्रीनाश. |
| कंठ.. | शत्रुनाश | मांड्या | वाहन लाभ | पावलांचा अंत | रोग |

## स्वप्नविचार.

सर्वेंद्रियव्युपरतौ मनोनुपरतं यदा ।
विषयेभ्यस्तदा स्वप्नं नानारूपं प्रपश्यति ॥ १४२ ॥

स्वप् ह्या संस्कृत धातूपासून स्वप्न शब्द उत्पन्न झाला आहे स्वप् धातूचा अर्थ झोप घेणे असा आहे अर्थात् ज्या अवस्थेचा झोपेशीं संबंध आहे तें स्वप्न झोपेंत ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें ह्यांचे व्यापार बंद पडून मनाचे व्यापार मात्र जेव्हां सुरू असतात तेव्हांच स्वप्नें पडतात वस्तुत प्रत्येक क्षणीं आपल्याला स्वप्नें पडत असतात, परंतु इंद्रियांचे व्यापार चालले असतांना त्यांत मन मग्न असल्यामुळे त्यावेळीं त्याच ज्ञान मनाला होत नाहीं परंतु आपल्या मेंदूमध्यें जी विद्युच्छक्ति आहे तिच्या प्रभावानें, प्रत्येक क्षणीं घडणाऱ्या क्रियेचा किंवा संस्काराचा मेंदूवर ठसा उमटून रहातो, आणि मनाचा व मेंदूचा परस्पर निकट संबंध असल्यामुळे जेव्हां मन व्यापारमुक्त होऊन स्वस्थ असतें तेव्हां म्हणजे झोपेंत त्या क्रियांची मेंदूच्या साहाय्यानें मनाला स्मृति होते, तेंच स्वप्न होय सतत अतिशय वाचण्यानें अपचनामुळे, शरीराच्या अस्वास्थ्यामुळें, मन चिंताग्रस्त किंवा विचारमग्न असल्यामुळे किंवा कांहीं अन्य कारणामुळें शरीरामध्यें निद्राविघातक क्रिया उत्पन्न होऊन इंद्रियांना वासनाजागृति किंवा पूर्व संस्कारांचे स्मरण होतें म्हणून स्वप्नें पडतात स्वप्नांची सुरुवात होण्यापूर्वी मनुष्य प्रथम अर्धवट जागा होतो, व स्वप्नें पडूं लागलीं म्हणजे पुन अर्धवट असलेली जागृति अवस्था जाऊन, झोंप अधिक प्रबल होते मनाची प्रवृत्ति नेहमीं इंद्रियांकडेसच असल्यामुळे इंद्रियवासना-

विषयक जें जें मनाला गम्य असतें तें सारें स्वप्नांत दिसतें. उदाहरणार्थ, पोटांत अन्नसंचय प्रमाणापेक्षां कमी असल्यामुळें जर झोंपेंत क्षुधा लागली तर भक्ष्य पदार्थांचें मनाला स्मरण होऊन पूर्वी पाहिलेल्या भोजनसमारंभाचीं स्वप्नें पडतात. किंवा कोठ्यांत जलसंचय पुरेसा नसल्यामुळें झोंपेंत तहान लागली तर तृषेचा विषय कल्पनेपुढें येऊन तहान भागविण्याचीं सर्व साधनें म्हणजे घरांतील रोजचीं पाणी पिण्याचीं भांडीं विहीर, आसपासची नदी किंवा पाण्याचा पाट हीं दिसूं लागतात. जर तृषा प्रबल होऊन कंठ सुकला किंवा क्षुधा प्रखर होऊन पोटांत दाह झाला तर मात्र त्या विस्तारापुढें झोंपेचें प्राबल्य अगदीं न चालून मनुष्य एकदम जागा होतो. अशाच प्रकारच्या कांहीं कारणांनीं इतर स्वप्नें पडतात. ह्या सदर विवेचनावरून स्वप्नांची उत्पत्ति इंद्रियवासनेमुळें होते हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. जें पूर्वी कधीं जागृतावस्थेंत आपण पाहिलेलें, चिंतिलेलें किंवा ऐकिलेलें असतें तेंच बहुतेक प्रसंगीं स्वप्नांत दिसतें. असें आहे तरी कांहीं स्वप्नें अगदीं अपूर्व असून भविष्यसूचकही असतात व अनेक प्रसंगीं तीं खरीं ठरतात असा पुष्कळ अनुभव आहे. आणि त्यामुळेंच ह्या विषयाचा ऊहापोह आमच्या आर्यलोकांनीं करून आपले अनुभव ग्रथित करून ठेविले आहेत. तसेंच इतर राष्ट्रांतील कांहीं विद्वान् शोधकांनींही ह्या विषयाकडे लक्ष पुरविलें आहे. हा विषय मानसशास्त्राचा असल्यामुळें त्याचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. म्हणून त्याविषयीं येथें अधिक लिहीत नाहीं. असो. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें किंवा गाढ झोंप न लागून जीं स्वप्नें पडतात त्यांचा कोणी विचार करूं नये. उत्तर रात्रीं म्हणजे पहांटेस किंवा अरुणोदयाबरोबर गाढ झोंपेंत जीं स्वप्नें पडतील त्यांचीं पुढें लिहिल्याप्रमाणें शुभाशुभ फळें पहावीं. जे मिताहारी असतात व कफवातपित्त ह्या त्रिदोषांपैकीं एकाद्या दोषानें ज्यांची प्रकृति विशेष दूषित असते त्यांना मात्र कमी स्वप्नें पडतात; आणि त्यांचींच कांहीं स्वप्नें बहुधा भविष्यसूचक असतात. आणि ज्यांस अन्नपचन बरोबर होत नाहीं, त्याला नित्य अनेक निरर्थक स्वप्नें पडतात; आणि जेवल्याबरोबर निजूं नये असें म्हणतात त्याचें कारण तरी हेंच. असो.

शुभस्वप्नें—नदी, समुद्र, तलाव वगैरे पाहणें किंवा तरणें; सूर्यचंद्रमंडळ यांचें दर्शन; मोठ्या राजवाड्यावर, माडीवर किंवा पर्वतावर चढणें; मद्यपान, मांसभक्षण; विष्ठा वगैरे अमंगल लागणें; रक्ताचें स्नान; दहींभाताचें व खिरीचें भोजन; पांढरें वस्त्र, गंध, पुष्पें, रत्नें, अलंकार हीं स्वप्नांत पाहिलीं असतां मोठा लाभ मिळून कार्यसिद्धि होते. देव, ब्राह्मण, राजा, हत्ती, घोडा, सोनें व उत्तम अलंकार घातलेल्या व शुभ्रवस्त्र परिधान केलेल्या स्त्रिया यांचें अवलोकन; सिंह, अश्व, बैल, पर्वत, उंबर, ताडमाड व इतर फळपुष्पयुक्त वृक्ष यांवर चढणें; आरसा, मांस, कमळपुष्पें यांची प्राप्ति; श्वेतसर्पानें उजव्या हातास दंश केलेला पहाणें;

पाण्यात उभे असता सुसर चावणे, तसेंच विंचू वगैरे चावणे, आपल्यास बाध लेलें पहाण, शरीर, घर, पालखी, गाडी, इत्यादिकांना आग लागलेली पाहण, कोयडी, बेडूक, मोर वगैरे दृष्टीस पडण, जगलात भटकणे इत्यादि गोष्टी स्वप्नात पाहिल्या असता धनलाभ, स्त्रीलाभ व कार्यसिद्धि होते रोदन, वीणावादन, नौकेंत बसणें, आपल्या शरीरातून रक्तस्राव पहाण, जलस्नान करण, आपला मृत्यु, दीप, धान्य, कन्या, पक्षी यांचें दर्शन, गाय, म्हैस, व्याघ्री, सिंही यांचे दुग्धपान, राजदर्शन, तृण, दूर्वा असलेल्या भूमीवर चालण, पिता माता व मित्र यांचे दर्शन हीं स्वप्नें आनंदजनक होत निरभ्र आकाश, स्वत चे नाचणे, पुलावरून न अड खळता पार चालत जाणें, प्रेतदर्शन, मेजवानीचा समारभ फक्त पहाण, स्वत धावणे, स्वर्णप्राप्ति, दुसऱ्यास फाशीं देताना पाहणे, घर बांधणे, जिना, शिडी यावर चढण, गायनवादन ऐकण, पशुचा वध्रप पाहण, हीं स्वप्नें पाहिलीं असता मनाप्रमाण कार्यसिद्धि होते मुग्या पाहण, स्वत उत्तम पोशाख केलेला पाहण, आपल्याला पकडलेल पाहण, धान्य, कापड खरेदी करण, किल्ला पहाण, हीं शुभसूचक स्वप्नें होत कापूस, भस्म, भात, ताक यांवाचून इतर सर्व पांढरे पदार्थ स्वप्नांत दृष्टीस पडले असता चागले आणि गाय, देव, ब्राह्मण आणि हत्ती यावाचून इतर सर्व काळे पदार्थ स्वप्नात वाईट समजावे

अशुभस्वप्नें—पळस, वारुळ व कडुनिंब यावर चढणे, तेल, लोखड व कापूस यांचा लाभ हीं स्वप्नात पाहिलीं असता शरीराला क्लेश होतात, लग्न किंवा घड्याळ यंत्र पडलेलें पाहिलें असता कोणाची तरी मृत्युवार्ता ऐकण्यात येते कोळसे, तांबड वस्त्र व तांबड्या फुलांच्या माळा, आकाशातून तारे पडण, घृत, तेल अंगास लावण, केश व दात गळणे, श्वान, गर्दभ, उट, टोणगा, म्हैस, डुक्कर यांचे दर्शन, प्रेताचें आलिंगन, कृष्ण व नग्न पुरुष यांचें दर्शन नाक व कान तुटणें, पाण्यात व चिखलात बुडण ह्या गोष्टी स्वप्नांत पाहिल्या असता धनहानि, सकट किंवा शरीराला क्लेश हीं प्राप्त होतील असे समजाव श्मश्रु करविण, नखछेदन, पक्वान्नभोजन, काळे पुरुष पाहण, अमगळ व कृष्णवस्त्रयुक्त स्त्रियेचें दर्शन किंवा आलिंगन, कोणाचे पत्र येण, कावळा, कोल्हा, घुबड, गिधाड व मार्जार यांचें दर्शन, उसावरून खालीं पडणें, आपल्यापासून कोणी बलात्कार व भलपुर्णे हिरावून घेतलेली पाहण, ऊन पाणी पिणे, श्राद्धपिंडदान करणे, स्वत गाण, हसणे, रागावणं व दोराळ्यावर बसण, ढग आलेले पाहणे, राजद्वारीं दंड होणे, गुहेंत किंवा अंध कारांत जाणें, बाळतिणीच्या खोलींत किंवा स्वयपाकगृहात जाण इत्यादि गोष्टी स्वप्नात पाहिल्या असता हानिप्रद होत मधमाशा उडताना पाहणें, भूमीवरील द्रव्य गोळा करण, कर्ज घेण, बहुधीचे आवाज ऐकणें, खाच्या सोडणें, हातांत धाकू घेण, हीं सर्व स्वप्न दु:खसूचक जाणावीं. ज्या मनुष्याचा मृत्यु स्वप्नात दृष्टीस पडेल त्या मनुष्याला तें शुभ जाणावं

दुष्ट स्वप्न पडलें असतां सप्तशतीचा पाठ, विष्णुसहस्रनाम किंवा महाभारतांतील गजेंद्रमोक्ष या स्तोत्रांचा पाठ करावा, किंवा दुसऱ्याकडून वाचवून आपण श्रवण करावें म्हणजे दुःस्वप्नदोषपरिहार होतो, असें सांगितलें आहे.

---

## प्रकरण ५.

### तिथिनिर्णय.

स्थलसंकोचास्तव येथें सर्व तिथींचा सविस्तर निर्णय न देतां फक्त प्रत्येक महिन्यांतील विशेष कृत्यांच्या तिथींची माहिती दिली आहे. आतां प्रथम दिवसाचे विभाग सांगतों. १ प्रातः २ संगव ३ मध्याह्न ४ अपराह्न आणि ५ सायाह्न असे दिवसाचे पांच विभाग कल्पिलेले आहेत. दिनमानाच्या घटिकांला पांचांनीं भागून ज्या घटिका येतील तितक्या घटिकांचा म्हणजे सामान्यतः सहा घटिकांचा एक विभाग होतो. प्रदोषव्यापिनी तिथि म्हणजे सूर्यास्तापासून सहा घटिका रात्र होईपर्यंत असणारी तिथि. सूर्योदयव्यापिनी म्हणजे सूर्योदयसमयीं असणारी तिथि. पूर्वाह्णव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून १२ घटिकांपर्यंत, मध्याह्नव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून सुमारें १८ घटिकांपर्यंत व अपराह्णव्यापिनी म्हणजे २४ घटिकांपर्यंत असणारी तिथि होय. निशीथव्यापिनी म्हणजे मध्यरात्रीला असणारी व अरुणोदयव्यापिनी म्हणजे ४५ घटिका रात्रीपुढें व सूर्योदयापर्यंत असणारी तिथि याप्रमाणें जाणावें.

### चैत्रमासः.

वर्षप्रतिपदा प्रतिपद्वत्सरारंभे ग्राह्या पूर्वैव सर्वदा। सा सूर्योदयव्यापिनी ग्राह्या । मलमासो यदा चैत्रो वर्षारंभस्तदा मले । नतु शुद्धे । सूर्योदयाला जी प्रतिपदा असेल ती वर्षप्रतिपदेकरितां घ्यावी. दोन्ही दिवस तशी असेल किंवा नसेल तर प्रथम दिवसाचीच घ्यावी. ज्या वर्षी चैत्र अधिकमास असेल त्या वर्षी अधिकमहिन्यांतच वर्षारंभ म्हणजे वर्षप्रतिपदा करावी. याशिवाय इतर सर्व कृत्यें मात्र शुद्धचैत्रांत करावीं. देवीनवरात्रं—अमायुक्ता न कर्तव्या प्रतिपच्चंडिकार्चने । मुहूर्तमात्रा कर्तव्या द्वितीयादिगुणान्विता ॥ कित्येकांच्या कुळांत चैत्रशुद्ध प्रतिपदेपासून देवीचें नवरात्र करण्याचा प्रचार आहे; त्याला प्रतिपदा घेणें ती मुहूर्तमात्र म्हणजे दोन घटिका असली तरी द्वितीयायुक्त घ्यावी. अमावास्यायुक्त घेऊं नये. आंदोलनगौरीव्रतम्—चैत्रशुक्लतृतीयायां शिवगौरीं प्रपूजयेत् । यावन्मासो भवेन्नित्यं नारी पतिमती सदा ॥ मुहूर्तमात्रसत्वेपि दिने गौरीव्रतं परे । चतुर्थीसंयुता ग्राह्या द्वितीयासहिता त्यजेत् ॥ चैत्र शुद्ध

तृतीयेपासून वैशाखशुक्ल तृतीयेपर्यंत एक महिनाभर सुवासिनी स्त्रियांनीं गौरीची पूजा करावी असें स्कंद पुराणांत सांगितलें आहे. दोन दिवस तृतीयेचा योग असतां दुसऱ्या दिवसाची म्हणजे चतुर्थीयुक्त असेल ती घ्यावी. ती मुहूर्तमात्र म्हणजे दोन घटिका असली तरी चालेल. पण द्वितीयायुक्त जी तृतीया ती निषिद्ध म्हणून कदापि घेऊं नये. रामनवमी—चैत्रशुक्ले तु नवमी पुनर्वसुयुता यदि । सैव मध्याह्नयोगेन महापुण्यतमा भवेत् ॥ नवमी चाष्टमीविद्धा त्याज्या विष्णुपरायणैः । उपोषणं नवम्यां च दशम्यां चैव पारणम् ॥ इयं मलमासे न कार्या ॥ चैत्रशुक्ल नवमीला रामजयंती म्हणतात. ह्या दिवशीं जगदीशानें रामावतार घेतला. दोन दिवस नवमीचा योग असतां पुनर्वसु नक्षत्रयुक्त मध्याह्नव्यापिनी जी असेल त्या दिवशीं रामजयंती करावी. दोन दिवस तशी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पण अष्टमीयुक्त असेल ती घेऊं नये. कारण नवमीच्या उपोषणाचें पारणें दशमीत व्हावें. अधिक चैत्र असतां शुद्धचैत्रांत नवमी करावी. हनुमज्जयंती—सा सूर्योदयव्यापिनी ग्राह्या । सामान्यनिर्णयात् ग्राह्या पौर्णमासी परैव च ॥ ही सूर्योदयाला असेल ती घ्यावी दोन्ही दिवस तशी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दमनारोपणं—ऊर्जे व्रतं मधौ दोलां श्रावणे तंतुपूजनम् । चैत्रे च दमनारोपमकुर्वाणो व्रजत्यधः ॥ कार्तिकामध्यें व्रताचरण, चैत्रास आंदोलन, श्रावणांत पोवती आणि चैत्रांत दवणा वाहणें हीं कृत्यें जो भावत्या कुलदेवतेसंबंधानें प्रतिवर्षी करीत नाहीं तो अधोगतीला जातो असें सांगितलेलें आहे. दवणा वाहणें तो गौरीला तृतीयेस, गणपतीला चतुर्थीस, देवीला अष्टमीस किंवा नवमीस, विष्णूला द्वादशीस व शंकराला चतुर्दशीस वहावा. कित्येक ठिकाणीं चैत्री पौर्णिमेस कुलदेवतेला दवणा वाहण्याची चाल आहे. या पूजनाला तिथि घेणें ती सूर्योदयापासून निदान ६ घटिकांपर्यंत असणारी तिथि घ्यावी. ह्याला गुरुशुक्रास्ताचा दोष नाहीं. अधिक मासांत मात्र करूं नये.

## वैशाखमासः.

अक्षय्यतृतीया—वैशाखे शुक्लपक्षे तु तृतीया रोहिणीयुता । पूर्वाह्णव्यापिनी ग्राह्या, परा यदि दिनद्वये । दुर्लभा बुधवारेण सोमेनापि युता तथा । रोहिणीबुधयुक्तापि पूर्वविद्धा विवर्जिता । वैशाख शुक्लतृतीयेला केलेलें दान अक्षय्य राहतें म्हणून हिला अक्षय्यतृतीया म्हणतात. हा साडेतीन मुहूर्तांपैकीं एक मुहूर्त आहे. ही तृतीया पूर्वाह्णव्यापिनी म्हणजे सूर्योदयापासून निदान बारा घटिकांपर्यंत असेल ती घ्यावी. दोन्ही दिवस पूर्वाह्णव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. रोहिणी नक्षत्र, बुधवार किंवा सोमवारादि योगांनीं युक्त असेल तर ती फार पुण्यकारक आहे.

पण रोहिणी, बुधवार ह्या योगांनीं युक्त असून जर द्वितीयायुक्त आहे तर मात्र घेऊं नये; दुसऱ्या दिवसाची चतुर्थीयुक्त असेल तीच घ्यावी. परशुरामजयंती—वैशाखस्य सिते पक्षे तृतीयायां पुनर्वसौ। निशायाः प्रथमे यामे रामाख्यः समये हरिः। स्वोच्चगैः षड्ग्रहैर्युक्ते मिथुने राहुसंस्थिते। रेणुकायास्तु यो गर्भादवतीर्णो प्रभुः स्वयम्। सा प्रदोषव्यापिनी ग्राह्या। दिनद्वये तद्व्याप्तावव्याप्तौ समव्याप्तौ च परा। अन्यथा पूर्वैव। अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं रात्रीं प्रथम प्रहरीं पुनर्वसु नक्षत्रावर रेणुकेच्या उदरीं परशुरामानें अवतार घेतला म्हणून ही परशुरामजयंतीची तृतीया होय. दोन्ही दिवस तृतीया प्रदोषव्यापिनी असेल किंवा सारखी असेल तर जयंतीकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. असें नसेल तर प्रथम दिवसाचीच वक्त होय. नृसिंहजयंती—वैशाखे शुक्लपक्षे तु चतुर्दश्यां निशामुखे। जातो नृसिंहो भगवान् दैत्यानां मर्दनाय च। सा प्रदोषव्यापिनी ग्राह्या। दिनद्वये तद्व्याप्तावव्याप्तौ समव्याप्तौ च परा। स्वातीनक्षत्रयोगेन शनिसोमेन संयुता। प्रशस्ता सिद्धियोगेन वणिजेन तथैव च॥ वैशाखशुक्लपक्षामध्यें चतुर्दशीच्या दिवशीं प्रदोषकाळीं नृसिंहावतार झाला. ही चतुर्दशी प्रदोषव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस तशी असेल, नसेल किंवा सारखी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. शनिवार, सोमवार, स्वाती नक्षत्र, सिद्धि योग आणि वणिज करण इत्यादि योगांनीं किंवा यांपैकीं एखाद्या योगानें युक्त असेल तर ती प्रशस्त होय.

## ज्येष्ठमासः.

ज्येष्ठशुक्ल दशमी दशहरा इति प्रसिद्धा। हरते दशपापानि तस्माद्दशहरा स्मृता। ज्येष्ठे मासि सिते पक्षे दशम्यां बुधहस्तयोः। व्यतीपाते गरानन्दे कन्याचंद्रे वृषे रवौ। दशयोगे नरः स्नात्वा सर्वपापैः प्रमुच्यते। यत्रैव योगबाहुल्यं ग्राह्या यदि दिनद्वये। अत्र दशमीव्यतीपातयोर्मुख्यत्वं। मलमासे यदा ज्येष्ठे द्वयं तत्रैव कारयेत्॥ ज्येष्ठशुक्ल दशमीला दशहरा म्हणतात. ह्या तिथीचे दहा योग सांगितले आहेत ते असे:—१ ज्येष्ठमास २ शुक्लपक्ष ३ दशमी ४ बुधवार ५ हस्तनक्षत्र ६ व्यतीपात ७ गरकरण ८ आनंदयोग ९ कन्येचा चंद्र आणि १० वृषभराशीचा सूर्य अशा दहा योगांनीं युक्त जी दशमी तिचेठायीं गंगास्नान केलें असतां महत्पुण्यकारक मानिलेलें आहे. दोन दिवस दशमी असेल तर वरील योगांपैकीं अधिक योगांनीं युक्त जी दशमी असेल ती घ्यावी. त्यांत दशमी आणि व्यतीपात हे दोन योग मुख्य आहेत. ज्येष्ठ अधिकमास असतां दशहराव्रत, अधिक ज्येष्ठांतच करावें. शुद्ध ज्येष्ठांत करूं नये. वटसावित्री—ज्येष्ठे मासि सिते पक्षे

पूर्णिमायां वटव्रतम् । पूर्वविद्धैव सावित्रीव्रते, पंचदशी तिथिः । नाड्योष्टादशभूतस्य स्युश्चेतश्च परेहनि । अत्र त्रिरात्रव्रते पूर्णिमा सूर्यास्तात्प्राक् त्रिमुहूर्तापि ग्राह्या । त्रिमुहूर्तेन्यूनत्वे परैव । अत्र रजस्वलादिदोषे पूजादिब्राह्मणद्वारा च स्वयमुपवासादिकं कार्यम्। ज्येष्ठशुद्ध पौर्णिमेला वटपूर्णिमा म्हणतात. त्या दिवशीं सुवासिनी स्त्रियांनीं वटवृक्षाची पूजा करावी. कोणी त्रिरात्रव्रत करितात. त्रिरात्रव्रताकरितां पूर्णिमा येणें ती सूर्यास्तापूर्वी सहा घटिका जरी पौर्णिमा लागत असेल तरी तीच घ्यावी. म्हणजे त्या दिवसापूर्वी त्रिरात्रव्रताला दोन दिवस आरंभ करावा. केवळ पूजेकरितां पूर्णिमा येणें ती जर दोन दिवस पौर्णिमेचा योग असेल तर प्रथम दिवसाचीच घ्यावी. तथापि चतुर्दशी अठरा घटिकांहून ज्यास असून नंतर लागणारी पूर्णिमा मात्र प्रथम दिवसाची घेऊं नये. अशा वेळीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. स्त्री रजस्वला वगैरे असेल तर तिनें ब्राह्मणद्वारा पूजा करवून आपण उपोषण मात्र करावें.

## आषाढमासः.

कर्कसंक्रांतिः—'त्रिंशत्कर्कटके पूर्वे' इति वचनात् कर्कसंक्रांतौ पूर्वं त्रिंशन्नाड्यः पुण्यकालः । तत्रापि संक्रांतिसन्निहिता नाड्यः पुण्यतमाः । रात्रौ तु निशीथात्प्राक् संक्रमेपि पूर्वदिने पुण्यकालः । तदूर्ध्वं परदिने पंचनाड्यः पुण्यकालः । कर्कसंक्रांतीचा पर्वकाल संक्रांत लागण्यापूर्वी तीस घटिका असतो. तथापि संक्रांतिकालाच्या जवळच्या पांच घटिका विशेष पुण्यकारक आहेत. मध्यरात्रीच्या पूर्वी संक्रांत निघत असेल तर पूर्व दिवशींच पर्वकाळ धरावा. मध्यरात्रीनंतर निघत असेल तर दुसऱ्या दिवशीं सकाळीं पांच घटिकांपर्यंत पर्वकाळ समजावा. कोकिलाव्रतम्— आषाढौ द्वौ यदा स्यातां कोकिलायास्तदार्चनम् । शुद्धाषाढे तु कर्तव्यमवश्यं पुण्यकारकम् ॥ ज्या वर्षी दोन आषाढ असतील त्या वर्षी शुद्ध आषाढांत कोकिलाव्रत करावें.

## श्रावणमासः.

सोमवारः—सोमवारव्रतं कार्यं श्रावणे वै यथाविधि । शक्तेनोपोषणं कार्यमथवा निशिभोजनम् ॥ श्रावण मासांत सोमवारीं उपोषण करावें. ज्यांस अहोरात्र उपोषण करवणार नाहीं त्यांनीं सायंकाळपर्यंत उपोषित राहून रात्रीं भोजन करावें. मंगलागौरी—श्रावणे मंगलागौरीं पूजयेद्विधिना व्रती । प्रथमे वत्सरे मातुर्गृहे कर्तव्यमेव च ॥ ततो भर्तृगृहे कार्यमवश्यं स्त्रीभिरादरात् । पंचमे वत्सरे प्राप्ते कुर्यादुद्यापनं शुभम् ॥ लग्न झाल्यानंतर प्रथम वर्षापासून मुलींनीं श्रावणांतील प्रत्येक मंगळवारीं मंगलागौरीचें पूजन करावें.

प्रथम वर्षी ही पूजा माहेरीं करावी. हें व्रत पांच वर्षेपर्यंत करून पांचव्या वर्षी
उद्यापन करावें असें भविष्यपुराणांत सांगितलें आहे. अधिक श्रावण असतां
त्यांत मंगळागौरीचें पूजन करूं नये. शुद्ध श्रावणांत करावें, अलिकडे
प्रौढकन्यांचे विवाह होऊं लागल्यामुळें लग्नानंतर फक्त प्रथम वर्षी पांच मंगळवारींच
मंगळागौरीचें पूजन करण्याचा प्रघात कित्येक ठिकाणीं पडत चालला आहे.

**नागपंचमी**—श्रावणे पंचमी शुक्ला संप्रोक्ता नागपंचमी। चतुर्थी-
सहितां त्यक्त्वा ग्राह्या षष्ठीसमन्विता। वल्मीके पूजयेन्नागान् दुग्धं
चैव तु पाययेत्। सा त्रिमुहूर्तव्यापिनी षष्ठीयुता ग्राह्या। परेद्युस्त्रिमुहूर्त-
न्यूना यदि दिनद्वये सति तदा उदयात् पंचमी पूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूना
चतुर्थीविद्धा तदा पूर्वैव। त्रिमुहूर्ताधिकचतुर्थीवेधे द्विमुहूर्तापि
परैव। श्रावणशुक्ल पंचमीला नागपंचमी म्हणतात. त्या दिवशीं वारुळाची
पूजा करून सर्पाला दूध पाजावें असें सांगितलें आहे. त्याकरितां पंचमी
घेणें ती, दोन दिवस पंचमीचा योग असतां सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत
असणारी षष्ठीयुक्त घ्यावी. चतुर्थीयुक्त घेऊं नये. तथापि दुसऱ्या दिवशीं पंचमी
सहा घटिकांपेक्षांही कमी असेल व जर पूर्व दिवशीं चतुर्थी सहा घटिकांपेक्षां अ-
धिक नसेल तर मात्र पूर्वदिवसाची घेतली असतां चालेल. पण चतुर्थी सहा घटि-
कांहून अधिक असून नंतर लागणारी पंचमी केव्हांही घेऊं नये. अशा वेळीं दुस-
ऱ्या दिवशीं पंचमी दोन मुहूर्त म्हणजे चार घटिका जरी असली तरी तीच घ्यावी.

**पोंवतीं वहाण्याचा निर्णय**—श्रावणशुक्ल द्वादश्यां विष्णोः पवित्रा-
रोपणम्। शिवस्य चतुर्दश्यां देव्याः अष्टम्यां गणेशस्य चतुर्थ्यां सर्वेषां
देवानां पौर्णमास्यां वा कार्यम्। पवित्रारोपणं विप्राश्च्छ्रावणे न भवे-
द्यदि। कार्तिक्यावधि शुक्लासु कर्तव्यमिति नारदः॥ अत्र सूर्योदयात्
त्रिमुहूर्तव्यापिनी तिथिर्ग्राह्या। श्रावणशुक्ल द्वादशीस विष्णूला, चतुर्दशीस
शंकराला, अष्टमीस देवीला व चतुर्थीस गणपतीला याप्रमाणें पोंवतीं वहावीं;
किंवा सर्व देवांला पोंवतीं वहाण्याला पौर्णिमा ही उक्त आहे. याविषयीं
जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें करावें. कांहीं अडचणीमुळें श्रावणांत पोंवतीं
वहाणें घडलें नाहीं तर कार्तिकपूर्णिमेपर्यंत पवित्रारोपण करावें. पोंवतीं ज्या
तिथीला वहावयाचीं ती तिथि सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत तरी असावी.

**श्रावणी**—श्रावणमहिन्यांत श्रवणनक्षत्रयुक्त दिवशीं अथवा पूर्णिमेस एक विशेष
विधि करितात त्याला श्रावणी म्हणतात. या विधीचें खरें रहस्य न समजून
केवळ पंचगव्य घेऊन व नवीन यज्ञोपवीत धारण संवत्सरकृतपापांपासून
आपण पुनीत होऊं असें कांहीं लोक समजतात, पण ती समजूत यथार्थ नाहीं.
कारण याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें आचाराध्यायांतील स्नातकधर्मप्रकरणांत असें

लिहिलें आहे कीं, अध्यायानामुपाकर्म श्रावण्यां श्रवणेन वा । हस्तेनौषध्यभावे वा पंचम्यां श्रावणस्य तु । वनस्पति उगवल्या म्हणजे श्रावणांत श्रवणनक्षत्रयुक्त दिवशीं किंवा हस्तनक्षत्रीं वेदाध्ययनाला आरंभ करावा. वनस्पति उगवल्या नाहींत तर भाद्रपदमासीं उपाकर्म करून साडेचार महिनेपर्यंत अध्ययन चालू ठेवावें व नंतर उत्सर्जन करावें. ही खरी श्रावणी होय. परंतु वर्तमानकाळीं त्या विधीला पापविमोचनविधि समजतात. असो. ऋग्वेद्यांच्या श्रावणीचा निर्णयः—गृह्यसूत्रे । श्रवणेन श्रावणस्य पंचम्यां हस्तेन वा । श्रावणशुक्लपक्षे श्रवणनक्षत्रं मुख्यकालः । तदभावे पंचमी हस्तसंयुता । तदभावे केवलपंचमी वा केवलहस्तः । इति बह्वृचानां कालत्रयम् । श्रवणस्य दिनद्वययोगे धनिष्ठायुक्तं मुहूर्तत्रयं न्यूनं वा परैव ग्राह्यम् । उत्तराषाढासंयुतं न ग्राह्यम् । पंचमी हस्त इति कालद्वयं तु औदयिकं मुहूर्तत्रयव्यापि मुख्यम् । तदलाभे पूर्वनिर्णयमपि । एवं भाद्रपदशुक्लपक्षेपि श्रवणं पंचमी हस्त इति कालत्रयनिर्णयो ज्ञेयः यद्यधंरात्राद्‌र्वाक्तु संक्रांतिर्ग्रहणं तथा । उपाकर्म न कुर्वीत श्रावण्यां श्रवणेऽपि वा । श्रावण शुक्लपक्षांत श्रवण, पंचमी आणि हस्त असे तीन काळ ऋग्वेद्यांना उपाकर्मास म्हणजे श्रावणीस सांगितलेले आहेत. त्यांत श्रवण नक्षत्र मुख्य आहे. श्रवण नक्षत्र न मिळेल तर पंचमीयुक्त हस्त किंवा केवळ पंचमी किंवा केवळ हस्त घ्यावें. दोन दिवस श्रवणाचा योग असतां दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापासून सहा घटिका किंवा त्याहून कमी असेल तरी धनिष्ठायुक्त जें श्रवणनक्षत्र तेंच उपाकर्मास घ्यावें. उत्तराषाढायुक्त घेऊं नये पंचमी व हस्त हेखील, दोन दिवस योग असतां, सूर्योदयापासून सहा घटिकापर्यंत असतील ते घ्यावे. सहा घटिकांहून कमी असतां पूर्व दिवसाचे घ्यावे. याप्रमाणें भाद्रपदांतील श्रवण, हस्त, पंचमी हे काल संकटकाळीं ऋग्वेदी यांस श्रावणी करण्यास उक्त आहेत. पौर्णिमेस श्रावणीच्या दिवशीं मध्यरात्रीच्या पूर्वी ग्रहण किंवा संक्रांति असेल तर त्या दिवशीं श्रावणी करू नये. यजुर्वेद्यांच्या श्रावणीचा निर्णयः—हिरण्यकेशितैत्तिरीयकाणां श्रावण्यां पौर्णमास्यां वा हस्ते उपाकर्म कार्यम् । तत्र श्रावणपौर्णमासी सर्वेषां याजुषाणां मुख्यः कालः । श्रावणशुक्लपंचमी तत्तत्सूत्रेऽनुक्तेर्न ग्राह्या । एवं श्रावणे ग्रहणसंक्रांतिदोषात् भाद्रपदेपि कालद्वयमिति । उपाकर्मणि सूर्योदयमारभ्यपूर्णिमा ग्राह्या । यदि पूर्वदिने पूर्णिमा मुहूर्ताद्यनंतरं प्रवृत्ता च द्वितीयदिने षण्मुहूर्तव्यापिनी सति तदा उत्तरैव ।

र्वृद्धियोगात्पूर्वेच । हिरण्यकेशी व तैत्तिरीय शाखेच्या लोकांनीं श्रावणपौर्णिमा किंवा हस्त नक्षत्र यांवर श्रावणी करावी. त्यांत श्रावणपौर्णिमा हा काल सर्व यजुर्वेद्यांना मुख्य आहे. त्यांच्या सूत्रांत पंचमी मुळींच सांगितलेली नाहीं; म्हणून त्या दिवशीं त्यांनीं श्रावणी करूं नये. श्रावणांत पौर्णिमेच्या दिवशीं ग्रहणादी, संक्रांतीची किंवा दुसरी व्यावहारिक अडचण आल्यास भाद्रपदमासीं पौर्णिमेस किंवा हस्तनक्षत्रावर श्रावणी करावी. श्रावणीकरितां पूर्णिमा घेणें ती सूर्योदयाला असेल अशी घ्यावी. दोन दिवस पौर्णिमेचा योग असून प्रथम दिवशीं तीन चार घटिकांनीं पौर्णिमा लागत असेल व दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापासून निदान बारा घटिकांपर्यंत असेल तर दुसऱ्या दिवशींच श्रावणी करावी. पौर्णिमेची वृद्धि असून जर दोन्ही दिवस सूर्योदयीं पूर्णिमा असेल तर प्रथम दिवसाचीच घ्यावी. सामवेदीश्रावणीचा निर्णयः—भाद्रपदशुक्लपक्षे हस्तनक्षत्रे उपाकर्म कार्यं । संक्रांत्यादिदोषेण तत्रासंभवे श्रावणमासे हस्तो ग्राह्यः । सामवेदी यांच्या उपाकर्माचा मुख्य काल भाद्रपदशुक्लपक्षामध्यें ज्या दिवशीं हस्त नक्षत्र असेल तो दिवस होय. संक्रांति वगैरे दोषांनीं भाद्रपदांतील हस्त नक्षत्र दूषित असतां श्रावणांतील हस्त घ्यावें. नूतनश्रावणीः—सिंहस्थे मलमासे च अस्ते च गुरुशुक्रयोः । प्रथमोपाकृतिर्न स्यात्कृतं कर्म विनाशकृत् ॥ सिंहराशीस गुरु असतां, मलमासामध्यें किंवा गुरुशुक्रांच्या अस्तामध्यें नवीन मौंजी झालेल्या मुलाचें उपाकर्म करूं नये. पोवतीः—श्रावणशुक्लाष्टम्यां चतुर्दश्यां पौर्णिमास्यां वा यथाकुलाचारं पवित्रारोपणं कार्यं । पौर्णिमायां तु सर्वेषां विहितं । अत्र त्रिमुहूर्ताधिकोदयव्यापिनी तिथिर्ग्राह्या । श्रावणशुद्ध चतुर्दशी, अष्टमी, पौर्णिमा या दिवशीं पोवती करितात. याविषयीं ज्या कुळाचार असेल तसें करावें. तथापि पोवतीं करण्यास श्रावणपौर्णिमा हा काल सर्वांस उक्त आहे. पोवती ज्या तिथीला करणें असेल ती तिथि सूर्योदयव्यापिनी असून सहा घटिकांपेक्षां जास्त असावी. रक्षाबंधनम्—श्रावणपूर्णिमायां भद्रारहितायां त्रिमुहूर्ताधिकोदयव्यापिन्यामपराह्णे प्रदोषे वा कार्यम् । इदं ग्रहणसंक्रांतिदिनेपि कर्तव्यम् । श्रावणपूर्णिमेला अपराह्ण किंवा प्रदोषकाळीं रक्षाबंधन करावें. त्याला सूर्योदयापासून सहा घटिकांहून अधिक व भद्रारहित पूर्णिमा घ्यावी. त्या दिवशीं ग्रहण किंवा संक्रांति असतांही रक्षाबंधन करण्यास प्रत्यवाय नाहीं. कृष्णजन्माष्टमीः—इयं निशीथव्यापिनी पूर्वा वा परा ग्राह्या । उभयेद्युः निशीथयोगे परैव । अस्यां रोहिणीनक्षत्रयोगे बुधसोमवारयोगे च

फलातिशयः । ही दोनप्रहररात्रीला असेल ती घ्यावी, मग पूर्वी असो किंवा परदिवशीं असो. दोन्ही दिवस अशी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. रोहिणीयुक्त किंवा बुधसोमवारयुक्त अष्टमी असेल ती अवश्य घ्यावी.

## भाद्रपद.

हरितालिका:—*मुहूर्तमात्रसत्त्वेपि तृतीया परा ग्राह्या । क्षयवशाद्भावे द्वितीयायुक्ता ग्राह्या ।* तृतीयेचा दोन दिवस योग असतां दुसऱ्या दिवसाची दोन घटिका असली तर घ्यावी. तृतीयेचा क्षय असतां द्वितीयायुक्त व वृद्धि असतां चतुर्थीयुक्त घ्यावी. गणेशचतुर्थी:—सा मध्याह्नव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये साकल्येन मध्याह्नव्याप्तौ अव्याप्तौ वा पूर्वा । वैषम्येण व्याप्तावधिकव्यापिनी *चेत्परेति । अस्यां चंद्रदर्शने मिथ्याभिदूषणं दोषः ।* ही मध्याह्नव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस सारखी तशी असेल किंवा नसेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. कमी अधिक व्याप्ति असतां दुसऱ्या दिवसाची अधिक असेल तर ती घ्यावी. गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्र पाहूं नये. कारण चोरीचा आळ येतो असें सांगितलेलें आहे. परंतु चुकून चंद्रदर्शन झालें असतां 'सिंहःप्रसेनमवधीत् सिंहो जांबवता हतः सुकुमारक मारोदीस्तव ह्येष स्यमंतकः' । ह्या मंत्राचा जप करावा. म्हणजे दोष परिहार होतो. ऋषिपंचमी:—सा मध्याह्नव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये मध्याह्नव्याप्तौ तदव्याप्तौ च पूर्वा । ही मध्याह्नव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस मध्याह्नीं असतां किंवा नसतां पूर्वदिवसाची घ्यावी. वामनद्वादशी—मध्याह्नव्यापिनी श्रवणयुता ग्राह्या । उभयदिने श्रवणयोगे पूर्वैव । द्वादश्याः सर्वथा श्रवणयोगाभावे एकादश्यामेव । मध्याह्नीं श्रवणयुक्त द्वादशी असेल ती घ्यावी. दोन्ही दिवस तशी असतां पूर्वदिवसाची घ्यावी. द्वादशीत मुळींच श्रवण नक्षत्र नसून एकादशीला असेल तर एकादशीस व्रत करावें. अनंतचतुर्दशी—तत्रोदये त्रिमुहूर्तव्यापिनी ग्राह्या । तदभावे द्विमुहूर्ता ग्राह्या । द्विमुहूर्तन्यूनत्वे पूर्वैव । अत्र पूर्वाह्णो मुख्यः तदभावे मध्याह्नोपि । सूर्योदयव्यापिनी असून सहा घटिकांपेक्षां अधिक असेल ती घ्यावी. दोन्ही दिवस तशी असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. पूर्वदिवशीं सूर्योदयव्यापिनी नसेल व दुसऱ्या दिवशीं असून चार घटिकांपेक्षांही कमी असेल तर पूर्वदिवसाचीच घ्यावी. ह्या व्रताविषयीं पूर्वाह्णकाल मुख्य आहे. महालय-

पितृश्राद्धे अपराह्णव्यापिनी तिथिर्ग्राह्या । पितृकार्याकरितां तिथि घेणें ती अपराह्ण कालीं म्हणजे सूर्योदयापासून अठरा घटिकांपेक्षां जास्त असेल ती घ्यावी.

## आश्विनमासः.

नवरात्रारंभः । उदये तु त्रिमुहूर्तव्यापिनी प्रतिपत् ग्राह्या । अमायुक्ता न कर्तव्या प्रतिपच्चंडिकार्चने । उदये द्विमुहूर्तापि ग्राह्या सोदयगामिनी । मुहूर्तन्यूनत्वे क्षये वा अमाविद्धापि ग्राह्या । वृद्धौ दिनद्वये सूर्योदयव्यापिन्यां पूर्वस्यामपूर्वैव । मलमासे न कार्यं । नवरात्राकरितां प्रतिपदा घेणें ती सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत असेल अशी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन घटिका तशी असतां तीही घ्यावी परंतु अमावास्यायुक्त घेऊं नये. प्रतिपदेचा क्षय असेल तर अमावास्यायुक्त प्रतिपदा घ्यावी. वृद्धि असतां पूर्व दिवसाची घ्यावी. ललितापंचमी–अपराह्णव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये अपराह्णव्याप्तौ पूर्वैव । ही अपराह्णव्यापिनी घ्यावी. दोन दिवस तशी असेल किंवा नसेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. महाष्टमी—इयं घटिकामात्राप्यौदयिकी नवमीयुता ग्राह्या । सप्तमीसंयुता सर्वथा वर्ज्या । भौमवारेऽतिप्रशस्ता । आश्विन-शुद्ध अष्टमीला महाष्टमी म्हणतात. जी अष्टमी सूर्योदयाला असून नवमीयुक्त असेल ती हवनाला घ्यावी. सप्तमीयुक्त असेल ती सर्वथा त्याज्य होय. जी अष्टमी मंगळवारीं असेल ती अति प्रशस्त होय. विजयादशमी—इयं श्रवण-सहिता नवमीयुता चापराह्णव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये श्रवणयोगेपि नवमीयुतैव । उत्तरदिन एव श्रवणयुता तदा तूत्तरैव । श्रवणनक्ष-त्रयुक्त दशमी घ्यावी. श्रवणयोग असतां किंवा नसतां नवमीयुक्त अपराह्णव्या-पिनी घ्यावी. दुसऱ्या दिवशीं श्रवणयुक्त दशमी असतां दुसऱ्या दिवशीं करावी. ही दशमी साडेतीन मुहूर्तांपैकीं एक मुहूर्त असून देशांतरीं प्रयाण करण्यास, वि-द्यारंभास किंवा प्रस्थान ठेवण्यास फार प्रशस्त आहे. त्यांत श्रवण नक्षत्रयुक्त असतां विशेष शुभ होय. ह्या दिवशीं शमीची पूजा करितात. त्याचा मंत्र–शमी शमयते पापं शमी शत्रुविनाशिनी । धारिण्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी ॥ शमीचा वृक्ष नसतां आपट्याच्या झाडाची पूजा करितात. त्याचा मंत्र—अश्मंतक महावृक्ष महादोषनिवारण । इष्टानां दर्शनं देहि शत्रूणां च विनाशनम् ॥ कोजागरी पौर्णिमा—निशीथव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये पूर्वैव निशीथास्पर्शे वा परा । ही पौर्णिमा मध्यरात्रीला असेल ती घ्यावी —

दोन्ही दिवस तशी असता किंवा नसता दुसऱ्या दिवसाची घ्यावी. नरक-चतुर्दशी–चंद्रोदयव्यापिनी ग्राह्या। दिनद्वयेप्येव चंद्रोदयव्याप्त्यलाभे वा अरुणोदयव्यापिनी पूर्वविद्धा ग्राह्या। तत्राप्यलाभे चतुर्थयामव्यापिनी त्रयोदशीयुता ग्राह्या। ही चंद्रोदयव्यापिनी असेल त्या दिवशीं स्नान करावें. दोन्ही दिवस तशी असतां अथवा नसतां अरुणोदयव्यापिनी पूर्व दिवसाची घ्यावी. तशीही नसतां चौथ्या प्रहरीं असणारी त्रयोदशीयुक्त घ्यावी. लक्ष्मीपूजा–लक्ष्मीपूजादौ प्रदोषव्यापिनी अमावास्या ग्राह्या। दिनद्वये सत्त्वे तु परा। अत्र प्रदोषव्याप्त्यभावे पूर्वा। लक्ष्मीपूजनाला अमावास्या प्रदोषव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवशीं तशी असतां दुसऱ्या दिवशीं आणि दोन्ही दिवस तशी नसतां पूर्व दिवशीं लक्ष्मीपूजन करावें.

## कार्तिकमासः.

बलिप्रतिपदा–सूर्योदयव्यापिनी ग्राह्या–ही सूर्योदयाला असेल ती आता-दिकांला घ्यावी. यमद्वितीया–अपराह्णव्यापिनी ग्राह्या। दिनद्वयेप्येवं व्याप्त्यव्याप्त्यादि वा परैव। ही द्वितीया अपराह्णव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस तशी असतां किंवा नसतां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. यमुनेनें आपला भाऊ जो यम त्याला या दिवशीं आपल्या घरीं बोलावून भोजन वगैरे दिलें म्हणून या द्वितीयेला यमद्वितीया किंवा भाऊबीज म्हणतात. या दिवशीं बहीण किंवा बहिणीसमान स्त्रियांच्या हातचें भोजन करून त्यांचा सत्कार करावा. तुलसीविवाह–कार्तिकशुक्लैकादश्यादिदिनपंचके विवाहनक्षत्राणि, विशेषस्तु रेवतीनक्षत्रं, काल उक्तः। तथापि सर्वत्र द्वादश्यामेव अनुष्ठीयते। कार्तिकशुद्धएकादशी-पासून पौर्णिमेपर्यंत पांच दिवसांत विवाहनक्षत्रयुक्त दिवशीं, विशेषतः रेवती-नक्षत्र असेल त्या दिवशीं, तुलसीविवाह करावा. तथापि द्वादशीच्या दिवशीं तुलसीविवाह करण्याची प्रायः सर्वत्र पद्धति आहे. वैकुंठचतुर्दशी–कार्तिक-शुक्लचतुर्दश्यां पूर्वेद्युरुपवासं कृत्वा अरुणोदयव्यापिन्यां चतुर्दश्यां शिवं संपूज्य। पूर्वदिवशीं उपोषण करून अरुणोदयव्यापिनी अशा चतुर्दशीमध्यें शिवपूजन करावें. कालभैरवाष्टमी–सा प्रदोषव्यापिनी ग्राह्या। दिन-द्वये चेत्पूर्वा–कार्तिककृष्णाष्टमीच्या दिवशीं कालभैरवाची पूजा करितात. ही प्रदोषव्यापिनी घ्यावी. उभय दिवशीं तशी असतां पूर्वदिवसाची घ्यावी.

## मार्गशीर्षमासः.

चंपाषष्ठी.—सा शततारकारविभौमवारवैधृतीनां मध्येऽधिकैर्योग-

गैस्त्रिमुहूर्ताधिकव्यापिनी ग्राह्या । ही सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत असेल ती घ्यावी. उभय दिवशीं अशी असतां रविवार, भौमवार, शततारका, वैधृति इत्यादि योगांपैकीं अधिक योगांनीं युक्त असेल ती घ्यावी. दत्तजयंतीः—इयं प्रदोषव्यापिनी ग्राह्या । मार्गशीर्षपूर्णिमेला रविवारीं दत्तजन्म झाला. ही प्रदोषव्यापिनी असेल त्या दिवशीं दत्तजयंती करावी.

## पौषमासः

मकरसंक्रांतिः । मकरसंक्रमे संक्रांत्यनंतरं चत्वारिंशन्नाड्यः पुण्याः । माघप्रवेशे तु विंशतिः परा । प्रदोषे ह्यर्धरात्रे वा स्नानं दानं परेहनि । तथाप्युत्तरदिने सूर्योदयोत्तरं पंचनाड्यः पुण्यतमाः । ह्या संक्रांतीचा संक्रमणानंतर चाळीस घटिका पर्वकाळ असतो. माघाच्या अगोदर वीस घटिकांपर्यंत उत्तम पर्वकाळ होय. प्रदोषकालीं किंवा रात्रीं संक्रांति प्रवेश असतां दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकाळापर्यंत पर्वकाळ धरावा. त्यांत सूर्योदयापासून पहिल्या पांच घटिका उत्तम पर्वकाळ होय.

## माघमासः

माघशुक्लपंचमीति वसंतपंचमी सा पूर्वाह्णव्यापिनी ग्राह्या । दिनद्वये तथा सत्वे पूर्वा. माघशुक्लपंचमीला वसंतपंचमी म्हणतात. ही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस तशी असतां पूर्वदिवसाची घ्यावी. ह्या दिवशीं कित्येक ठिकाणीं रति व मदन ह्यांची पूजा करून मोठा उत्सव करितात. रथसप्तमी-सा अरुणोदयव्यापिनी ग्राह्या । दिनद्वयेप्येवं पूर्वा । माघशुक्ल सप्तमीला रथसप्तमी म्हणतात. ही अरुणोदयव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस तशी असतां पूर्वदिवशीं करावी. ही सप्तमी अरुणोदयीं असून तीर्थस्नान केलें असतां सूर्यग्रहणासारखें फल आहे. महाशिवरात्रिः—सा निशीथव्यापिनी ग्राह्या । दिनद्वययोगे परा । रविभौमवारसहिता प्रशस्ता । ही मध्यरात्रीला असेल त्या दिवशीं उपोषण करावें. दोन दिवस तशी असतां दुसऱ्या दिवशीं उपोषण करावें. रविमंगळवारयुक्त असतां प्रशस्त होय.

## फाल्गुनमासः

फाल्गुनी पौर्णिमा ग्राह्या प्रदोषव्यापिनी सदा । तस्यां भद्रामुखं त्यक्त्वा दिनद्वये प्रदोषव्याप्तौ समव्याप्तावेकदेशव्याप्तौ अव्याप्तौ वा परा । फाल्गुनी पूर्णिमेला होळीचें पूजन सूर्यास्तावरोबर करावें. त्यास

पौर्णिमा प्रदोषव्यापिनी असेल ती घ्यावी. दोन्ही दिवस तशी असतां किंवा नसतां किंवा एक भागीं असतां दुसरे दिवसाची घ्यावी.

संकष्टचतुर्थी–सा चंद्रोदयव्यापिनी ग्राह्या। दिनद्वये चंद्रोदये सत्वे परा ग्राह्या। दिनद्वयेपि चंद्रोदये न स्यात् तदा प्रदोषव्यापिनी। केचित्तु तृतीयायुतैव ग्राह्येत्याहुः। संकष्टचतुर्थी चंद्रोदयीं असेल ती घ्यावी दोन्ही दिवस तशी असतां तृतीयायुक्त दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन्ही दिवस चंद्रोदयाला नसतां प्रदोषव्यापिनी घ्यावी. कित्येकांच्या मतें तृतीयायुक्त चतुर्थी प्रशस्त होय.

एकादशीः–स्मार्तानां शुद्धाविद्धैकादशीवृद्धौ पूर्वेद्युरुपवासः। वैष्णवानां अरुणोदयवेधे आधिक्ये वा सर्वत्र एकादशीं विहाय द्वादश्यामुपवासः। स्मार्त आणि वैष्णव असे एकादशीचे दोन भेद आहेत. ह्याविषयींचा शास्त्रार्थ निर्णयसिंधु व धर्मसिंधु ह्या ग्रंथांत विस्तारेंकरून सांगितला आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, स्मार्तांनीं शुद्ध किंवा विद्ध (सूर्योदयीं दशमीतिथीनें युक्त ती विद्ध व सूर्योदयीं दशमीतिथीच्या स्पर्शानें रहित ती शुद्ध) अशा एकादशीची वृद्धि असता पूर्वदिवशीं उपोषण करावें. आणि वैष्णवांनीं अरुणोदयीं दशमीचा पलमात्र वेध किंवा आधिक्य असतां ती एकादशी टाकून द्वादशीचे दिवशीं उपोषण करावें

# पुरवणी ५.

## लग्नवेळापत्रक.

मुंबईच्या पंचांगांतील सूर्योदय आणि सूर्यास्त काल व प्रत्येक संक्रांतीचा एकंदर भोग्यकाल प्रमाणभूत धरून तदनुरोधानें गणित करून स्टँडर्ड टाइमाप्रमाणें पुढील स्थूलमानाचें लग्नपत्रक तयार केलें आहे. ह्या लग्नपत्रकावरून प्रत्येक इंग्रजी महिन्याच्या प्रत्येक तारखेला कोणत्या वेळीं कोणतें लग्न आहे हें सहज कळेल. कोणत्याही इंग्रजी तारखेचे सूर्योदयास्ताचे काल किंवा सूर्याचे अंश प्रतिवर्षी जवळ जवळ सारखेच असतात; तसेंच सूर्यासभोंवती पृथ्वीची एक प्रदक्षिणा होण्यास, म्हणजे मेषादि सौरमासांची एक आवृत्ति पूर्ण होण्यास इंग्रजी वर्षाप्रमाणेंच ३६५ दिवस ६ तास व ९ मिनिटें इतका काळ लागतो. अर्थात् तारीख ह्या सौरतिथि होत. एका सौरतिथीला ज्या स्थळीं म्हणजे क्रांतिवृत्ताच्या ज्या भागांत सूर्य असेल त्याच ठिकाणीं त्याच तारखेला दुसऱ्या वर्षी असेल हें उघड आहे. म्हणून तारखांवरून तयार केलेल्या लग्नपत्रकांस म्हणण्यासारखें अंतर पडणें शक्य नाहीं. संवत्सराचें पंचांग बदललें म्हणून सूर्याची स्थिति बदलते असें नाहीं. तात्पर्य, तारखा व सूर्याची स्थिति यांत बराच नियमितपणा आहे. असो. पुढील लग्नवेळापत्रक हें मुंबईशहराचें लग्नवेळापत्रक आहे म्हणून एखाद्या गांवचे सूर्योदयास्त व मुंबईतील सूर्योदयास्त यांत जर कांहीं मिनिटांचें अधिक उणें अंतर असेल तर तितकें अंतर मात्र पुढील पत्रकांतील उदयास्तकालाच्या लग्नवेळेंत पडेल, म्हणून अशा वेळीं जर स्थानिक सूर्योदय मुंबईपेक्षां पूर्वी होत असतील तर तितकीं मिनिटें प्रत्येक लग्नवेळेंत मिळवावीं व मागाहून होत असतील तर कमी करावीं, म्हणजे लग्नवेळा बरोबर येईल. आतां पुढील पत्रकांतील लग्न पाहण्याची रीति सांगतों. जानुआरी तारीख पहिली या दिवसाचें उभें कोष्टक पहा. मेषलग्नासमोर २।५० असे अंक आहेत. त्याचा अर्थ २ वाजून ५० मिनिटें होत तोंपर्यंत मेषलग्न, त्याच्यापुढें ४।४८ पर्यंत वृषभलग्न, नंतर म्हणजे ४·४८ पासून ६·५६ पर्यंत मिथुनलग्न याप्रमाणें मेषादि द्वादशलग्नांची प्रत्येक तारखेची परिभाषा समजावी. तसेंच सूर्योदयींचे म्हणजे सकाळचे तास समजण्याकरितां "उ" ( उदय ) असें अक्षर लिहिलें आहे व अस्तसमयींचे तास समजण्यासाठीं "अ" ( अस्त ) असें अक्षर लिहिलें आहे त्यावरून उदयास्तकाळचें लग्न कळेल. परंतु याचा अर्थ त्या त्या वेळीं उदयास्त होतात, असा मात्र समजूं नये. तर उदयकाळापासून त्या वेळेपर्यंत तें तें लग्न आहे असें जाणावें. हाच नियम अस्तलग्नासंबंधीं जाणावा. उदयकाळचें लग्न धरून नेहमीं सातव्या लग्नीं सूर्यास्त होतो.

| ता | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ | ३० | ३१ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ मे | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १२ | १२ |
| | ५० | ४६ | ४२ | ३९ | ३६ | ३२ | २९ | २५ | २२ | १९ | १६ | १२ | ८ | ४ | १ | ५७ | ५३ | ४८ | ४३ | ३८ | ३३ | २८ | २४ | २० | १६ | १२ | १० | ५ | ० | ५५ | ५० |
| २ वृ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | २ | २ | २ | २ |
| | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ५९ | ५४ | ५० | ४६ |
| ३ मि | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३३ | ३० | २७ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० |
| | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | | | | | | | | | | | | | | | | | | |
| ४ क | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ९ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ |
| | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ |
| | | | | | | | | | | | | | | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ |
| ५ सिं | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ |
| | ३५ | १२ | १८ | १४ | १० | ७ | २ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३३ | २९ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ३ | ० | ५५ | ५१ | ४७ | ४३ | ३९ | ३५ | ३२ | २८ | २३ |
| ६ क | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ |
| | ३० | २५ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ० | ४६ | ४१ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | २९ |
| ७ तु | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ | १ | १ | १ |
| | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ७ | ४ | ० | ५६ | ५२ | ४७ | ४२ |
| ८ वृ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ |
| | ५६ | ५२ | ४८ | ४५ | ४२ | ३८ | ३४ | ३१ | २५ | २१ | १७ | १३ | ९ | ४ | ० | ५५ | १ | ४७ | ४२ | ३९ | ३५ | ३० | २६ | २२ | १९ | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५१ |
| ९ ध | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ |
| | ७ | ३ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४१ | ३६ | ३२ | २८ | २३ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४५ | ४१ | ३७ | ३३ | २९ | २५ | २१ | १७ | १२ | ८ | ४ | ० |
| | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | | | | | | | | | | | | | | | | | | |
| १० म | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ |
| | ९ | ५२ | ४८ | ४३ | ३८ | ३३ | २९ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ३ |
| | | | | | | | | | | | | | | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ | उ |
| ११ कु | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १० | १० | ५० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ |
| | ३६ | ३२ | २९ | २५ | २३ | २० | १६ | १२ | ८ | ३ | ० | ५६ | २ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २७ | २२ | १७ | १२ | ८ | ३ | ० | ५५ | ० | ४५ | ४० | ३५ | ३२ |
| १२ मी | १ | १ | १ | १ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ |
| | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २५ | २० | १५ | १० | ५ | १ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २१ | १७ | १३ | १० |

## फेब्रुवारी.

| ता | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ मे. | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १० |
| | ४६ | ४२ | ३८ | ३३ | २९ | २५ | २२ | १९ | १४ | ११ | ८ | ५ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३५ | ३२ | २८ | २५ | २० | १६ | १२ | ७ | ३ | ० | ५६ |
| २ वृ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १२ | १२ |
| | ४२ | ३८ | ३३ | ३० | २६ | २२ | १८ | १५ | १२ | ९ | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४५ | ४२ | ३८ | ३५ | ३० | २६ | २२ | १८ | १५ | १० | ६ | २ | ५८ | ५४ |
| ३ मि | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| | ५७ | ५३ | ४९ | ४६ | ४२ | ३८ | ३३ | २९ | २५ | २२ | १९ | १५ | १० | ५ | ० | ५५ | ५२ | ४९ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २९ | २५ | २२ | १८ | १५ | १० | ६ |
| ४ क. | ७ | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| | [redacted] | ४ | ५९ | ५५ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३५ | ३१ | २९ | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४५ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २५ | २२ | १९ |
| | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ | अ. | अ | अ | | | | | | | | | | | | | | | | | | |
| ५ सिं. | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ |
| | १८ | १५ | १२ | ९ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २५ |
| | | | | | | | | | | | | अ. | अ. | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ | अ. |
| ६ क. | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ |
| | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५७ | ५४ | ५० | ४५ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ४० | ३५ |
| ७ तु. | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | ११ | ११ | ११ | ११ |
| | ३५ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २५ | २१ | १७ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४९ | ४६ |
| ८ वृ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३५ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | २ | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | ३ | ० |
| ९ ध | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ |
| | ३ | ५८ | ५३ | ४८ | ४४ | ४० | ३५ | ३० | २५ | २२ | १८ | १४ | १० | ५ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २५ | २१ | १७ | १३ | १० | ८ |
| १० म. | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ५ |
| | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २५ | २१ | १७ | १३ | ९ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५७ |
| | उ | उ. | उ | उ | उ | उ | उ. | उ | उ. | उ. | उ | | | | | | | | | | | | | | | | | | |
| ११ कुं | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ |
| | २९ | २५ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ |
| | | | | | | | | | | | | उ | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | [redacted] | उ | उ | उ. | उ. | उ. | उ |
| १२ मी. | [redacted] | ११ | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ |
| | ६ | २ | ५८ | ५५ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३५ | ३० | २५ | २१ | १६ | १२ | ८ | ३ | ५८ | ५४ | ५० | ४५ | ४२ | ३८ | ३५ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | ११ |

| ता | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ | ३० | ३१ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ मे | १० ५२ | १० ४८ | १० ४४ | १० ४० | १० ३५ | १० ३२ | १० २८ | १० २४ | १० २० | १० १६ | १० १२ | १० ८ | १० ४ | १० ० | ९ ५६ | ९ ५२ | ९ ४८ | ९ ४४ | ९ ४० | ९ ३६ | ९ ३२ | ९ २८ | ९ २४ | ९ २० | ९ १६ | ९ १२ | ९ ८ | ९ ४ | ९ ० | ८ ५६ | ८ ५२ |
| २ वृ | १२ ४९ | १२ ४४ | १२ ३९ | १२ ३६ | १२ ३२ | १२ २८ | १२ २४ | १२ २० | १२ १६ | १२ १३ | १२ १० | १२ ६ | १२ ३ | १२ ० | ११ ५६ | ११ ५२ | ११ ४८ | ११ ४४ | ११ ४० | ११ ३६ | ११ ३२ | ११ २८ | ११ २४ | ११ २० | ११ १६ | ११ १२ | ११ ८ | ११ ४ | १० ५९ | १० ५५ | १० ५१ |
| ३ मि | ३ १ | २ ५६ | २ ५३ | २ ४९ | २ ४६ | २ ४२ | २ ३८ | २ ३४ | २ ३० | २ २६ | २ २२ | २ १८ | २ १५ | २ १२ | २ ८ | २ ३ | २ ० | १ ५६ | १ ५२ | १ ४७ | १ ४३ | १ ३९ | १ ३४ | १ ३० | १ २६ | १ २२ | १ १८ | १ १५ | १ ११ | १ ६ | १ २ |
| ४ क | ५ १४ | ५ ९ | ५ ४ | ५ ० | ४ ५८ | ४ ५४ | ४ ५० | ४ ४६ | ४ ४३ | ४ ३९ | ४ ३५ | ४ ३१ | ४ २७ | ४ २३ | ४ २० | ४ १६ | ४ १२ | ४ ८ | ४ ४ | ४ ० | ३ ५६ | ३ ५२ | ३ ४८ | ३ ४३ | ३ ३९ | ३ ३५ | ३ ३१ | ३ २८ | ३ २४ | ३ २० | ३ १५ |
| ५ सिं | ७ २३ अ | ७ १९ अ | ७ १५ अ | ७ ११ अ | ७ ८ अ | ७ ४ अ | ७ ० अ | ६ ५६ अ | ६ ५२ अ | ६ ४८ अ | ६ ४४ अ | ६ ४० | ६ ३६ | ६ ३२ | ६ २८ | ६ २४ | ६ २० | ६ १६ | ६ १२ | ६ ८ | ६ ४ | ६ ० | ५ ५६ | ५ ५२ | ५ ४८ | ५ ४४ | ५ ४० | ५ ३६ | ५ ३२ | ५ २८ | ५ २४ |
| ६ क | ९ ३० | ९ २६ | ९ २२ | ९ १८ | ९ १४ | ९ १० | ९ ६ | ९ २ | ८ ५९ | ८ ५५ | ८ ५१ | ८ ४७ अ | ८ ४४ अ | ८ ४० अ | ८ ३६ अ | ८ ३१ अ | ८ २७ अ | ८ २३ अ | ८ १९ अ | ८ १५ अ | ८ ११ अ | ८ ७ अ | ८ ३ अ | ७ ५९ अ | ७ ५५ अ | ७ ५१ अ | ७ ४८ अ | ७ ४४ अ | ७ ४० अ, | ७ ३६ अ | ७ ३१ अ |
| ७ तु | ११ ४२ | ११ ३८ | ११ ३४ | ११ ३० | ११ २६ | ११ २२ | ११ १८ | ११ १४ | ११ १० | ११ ६ | ११ २ | १० ५८ | १० ५४ | १० ५० | १० ४६ | १० ४२ | १० ३८ | १० ३३ | १० ३० | १० २६ | १० २२ | १० १८ | १० १४ | १० ९ | १० ५ | १० १ | ९ ५८ | ९ ५४ | ९ ५० | ९ ४६ | ९ ४२ |
| ८ वृ | १ ५६ | १ ५२ | १ ४८ | १ ४४ | १ ४० | १ ३६ | १ ३२ | १ २८ | १ २४ | १ २० | १ १६ | १ १२ | १ ८ | १ ४ | १ ० | १२ ५६ | १२ ५२ | १२ ४८ | १२ ४४ | १२ ४० | १२ ३६ | १२ ३२ | १२ २८ | १२ २४ | १२ २० | १२ १६ | १२ १२ | १२ ८ | १२ ४ | १२ ० | ११ ५६ |
| ९ ध | ४ ५ | ४ २ | ३ ५८ | ३ ५४ | ३ ५० | ३ ४६ | ३ ४२ | ३ ३७ | ३ ३२ | ३ २८ | ३ २३ | ३ १९ | ३ १६ | ३ १२ | ३ ८ | ३ ४ | ३ ० | २ ५५ | २ ५० | २ ४६ | २ ४२ | २ ३८ | २ ३३ | २ ३० | २ २६ | २ २३ | २ २० | २ १६ | २ १२ | २ ८ | २ ४ |
| १० म | ५ ५४ | ५ ५० | ५ ४६ | ५ ४२ | ५ ३८ | ५ ३४ | ५ ३० | ५ २६ | ५ २२ | ५ १८ | ५ १४ | ५ १० | ५ ६ | ५ २ | ४ ६ | ४ ५८ | ४ ५५ | ४ ५२ | ४ ४८ | ४ ४४ | ४ ४० | ४ ३५ | ४ ३१ | ४ २६ | ४ २२ | ४ १८ | ४ १४ | ४ १० | ४ ६ | ३ २ | ३ ५८ |
| ११ कुं | ७ ३२ उ | ७ २८ उ | ७ २४ उ, | ७ २० उ | ७ १६ उ | ७ १२ उ | ७ ८ उ, | ७ ४ उ | ७ ० उ | ६ ५६ उ | ६ ५२ उ | ६ ४८ | ६ ४४ | ६ ४० | ६ ३६ | ६ ३२ | ६ २८ | ६ २४ | ६ २० | ६ १६ | ६ १२ | ६ ८ | ६ ४ | ६ ० | ५ ५६ | ५ ५२ | ५ ४८ | ५ ४४ | ५ ४० | ५ ३६ | ५ ३२ |
| १२ मी | ९ ७ | ९ ३ | ९ ० | ८ ५६ | ८ ५२ | ८ ४८ | ८ ४४ | ८ ४० | ८ ३६ | ८ ३२ | ८ २८ | ८ २४ उ | ८ २० उ | ८ १६ उ | ८ १२ उ | ८ ८ उ | ८ ४ उ | ८ ० उ | ७ ५६ उ | ७ ५२ उ | ७ ४८ उ | ७ ४४ उ | ७ ४० उ | ७ ३६ उ | ७ ३२ उ | ७ २८ उ | ७ २४ उ | ७ २० उ | ७ १६ उ, | ७ १२ उ | ७ ८ उ |

# एप्रिल.

| ता. | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ | ३० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ मे. | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ६ | ६ |
| | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २७ | २३ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २९ | २५ | २१ | १७ | १३ | ९ | ४ | ० | ५६ | ५२ |
| | | | | | | | | | | | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. |
| २ वृ. | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ |
| | ४३ | ४२ | ४० | ३५ | ३१ | २७ | २३ | १९ | १५ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ |
| ३ मि. | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ |
| | ५८ | ५४ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ७ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ० |
| ४ क. | ३ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| | १२ | ८ | ३ | ५८ | ५४ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ |
| ५ सिं. | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १७ | १४ | १० | ६ | १ | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३३ | ३० | २६ |
| ६ क. | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ३९ | ३६ | ३२ |
| | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
| ७ तु. | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ७ | ७ |
| | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ७ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ |
| | | | | | | | | | | | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. | अ. |
| ८ वृ. | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | १० | ९ |
| | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५३ | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ५ | ० | ५७ |
| ९ ध. | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ |
| | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३५ | ३१ | २७ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ |
| १० म. | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ |
| | ५० | ४६ | ४२ | ३८ | ३४ | ३० | २६ | २२ | १८ | १४ | १० | ६ | ३ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ |
| ११ कुं. | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २९ | २६ | २२ | १८ | १५ | ११ | ७ | ३ | ० | ५५ | ५१ | ४६ | ४२ | ३८ | ३४ |
| १२ मी. | ७ | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| | ४ | ० | ५६ | ५२ | ४८ | ४४ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ | ५ | २ | ५८ | ५४ | ५० | ४५ | ४० | ३६ | ३२ | २८ | २४ | २० | १६ | १२ | ८ |
| | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | उ. | | | | | | | | | | | | | | | | | | | | |

